मामलत सालमजकुरीं सागितली आहे. लक्ष्मण कोनेर याच्या चिरजीवानी गुदस्ता कारकून येथे पाठविला होता त्यावरून धुरधर याणी त्यास येण्याविसी पत्र दिल्हे होते. कारकून पत्र घेऊन पुण्यास गेला त्यावरून रा त्रिबकराव लक्ष्मण येथे आले आहेत येक मास जाहाला धुरधर याची भेट जाहाली. राहावयास घर दिल्हे आहे खर्चाची सोय करून दिल्ही आहे. नित्य धुरधर याजवल येऊन बसत असतात. कुटुबातर्गत पहिल्यापासून परपरेने आहेत त्या प्रा लोभ करीत आहेत. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ४९

| | | |
|---|---|---|
| रु. न ८८ | श्री | ता. ६ नोवेंबर १७८३ |
| फा. न. १४ | | पौ छ. ६ मोहरम |
| पत्र न. ११८ | | सन आर्बा समानीन |
| | | मार्गशीर्ष मास |

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी सेवक सदासिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ १० जिल्हेज यथास्थित असे विशेष श्रीरामचद्रजीची यात्रा कार्तीक मासी पौर्णिमेस प्रतीवर्षी होत असल्ये राजश्री सेनाधुरधर यास या देवाची भक्ती विशेषाक्कार आहे. धुरधर याचे राहाणे नागपुरी जाहाल्यापासून प्रतिवर्षी आपण यात्रेस जाऊन देवाच्या समीप समारभ चागला करीत असतात गुदस्ता यात्रेस जाणें शरीरप्रकृतीमुले जाहालें नाहीं. प्रस्तुत यात्रेचे दिवस समीप. वराड प्रकर्णी महिपतराव येतेशामजगाकडे आले. तेथील समारभ करावयाकरिता धुरधर दशमीस रात्री निघून राजश्री सेनाबहादर यास समागमे घेऊन गेले आहेत त्रयोदसीस राजश्री सेनासाहेबसुभा सर्वास घेऊन जाणार आहेत. द्वितियेस तृतियेस निघून नागपुरास येतील. महीपतराव दिनकर अलजपुरास येतेशाम-जग याजकडे वराडच्या बदोबस्ताकरिता गेले आहेत. इसमाईलखान याचा जेष्ठ पुत्र सलाबतखान याच्या विद्यमाने जगाची भेट व बोलणे जाहाले. सुदामत आमल इकडील आहे त्याप्रमाणे अमलदारानी करावा या निश्चयात येउन रा. विठ्ठलपत सुभेदार वराडचे इकडून आहेत त्यास सागितले. व जगानी आपल्या अमल्दारास परवानगी दिल्ही दोहीकडून किस्त न पडता सुदामत चालीप्रमाणें चालनें असे जाहाले आणिखी जगाकडील जावसाल उगउन येणे आहेत. याजकरिता सलाबतखान नागपुरास येणार आहेत. जिल्हेजची ईद करून आलजपुराहून निघतील म्हणून महिपतराव याची पत्रें धुरधरास आली आहेत. अलजपुराहून त्यास यावयास पाच सात दिवस मार्गी लागतील. द्वितियेपर्यंत त्याचे येणे घडेल त्या सुमारें धुरधर रामक्षेत्राहून येतील आठचार दिवस कामकाजाच्या बोलण्यास लागतील. नतर निश्चय ठरेल तोपर्यंत कार्तिक-मास जाईल. मार्गशीर्ष शुधात अगर वद्यात निघण्यास मुहूर्त असेल त्या दिवसी धुरधर प्रस्थान करितील मुहूर्ताची योजना हा कालवर जाहाली नाहीं. इकडील कारभारी तेथे आहेत त्याची लिहिली येतील तदनुसार येथून उद्योग होईल व येथील लिहिले कारभारी यास जाईल त्याप्रमाणें ते विनती करून इकडे लिहितीलसे दिसते. येथे निश्चयात जसे येईल त्याप्रमाणे विनती लिहीन शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ५०

| | | |
|---|---|---|
| रु न ८८ | श्री | ता. २७ डिसेंबर १७८३ |
| फा. न १४ | | पौ छ ११ सफर, पौष, |
| पत्र न ११९ | | सन आर्बा समानिन |

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २ सफर यथास्थित असे विशेष. राजश्री सेनाधुरधर मागशीर्ष वद्य ३ गुरुवारी मुहूर्तेकरून डेरियास जाऊन राहिले. वरकड लोकाची तयारी होत चालली, आगखी आठा दिवसाचा गुता येथून निघण्यास होता. शाहा मिर्जास येतेशामजग याणी कैद करून अलजपुरास घेऊन गेले. आजपर्यंत मिर्जा अलजपुरास पोहचले असतील सलाबतखान येथे येऊन राहिले आहेत. जगाकडील सुरलीतपणा चालावा याजविसी बोलणे बोल्त आहेत शाहा मिर्जा येतेशामजग याचे सागणें मानीत नव्हता. अलजपुरास न जाता परभारे आमनेराम जाऊन, निराक्षेपणें राहून वर्तणूक करावी हा मनसुबा योजून राहिला हे बातमी जग याम कळलीयावर याणी लस्कगत त्याच लोकाकरवी धरून कैद करऊन अलजपुरास नेला आहे. त्यास मिर्जाबराबर सिबदी होती ती सर्व तशीच आहे. रोहिला पाचसे जमियततिसी मात्र निघून गेला. वरकड सारे आहेत ते अलजपुरास पोहोचल्यावर, जग सिबदी दूर करितात किंवा ठेवितात हे कळावे जर त्यांनी सिबदी

हशमतजग यास नवाबानी डागोपत याची जागीर होती ती दिल्ही, त्या जागीरीत हशमतजग आपली ठाणी घालीत आहेत, त्याजबा सेनासाहेबाकडील गाव पाटीलकीचे होते तेथे याची ठाणी होती ती उठऊन त्याणी आपली ठाणी घातली. हशमतजग लाखनवाड्याचा घाट उतरून वराडात वाडेगावाकडे जमियत आणवीत आहे. हजार स्वार व हजार गारद आहे. आबडापूर वगैरे डागोपत याची ठाणी उठऊन आपली त्याणी बसविली. अजिमुदौला औरगाबादचा सुभा याचा व सेलगावकर आटोले याचा कजिया पेसजीचा आहे. अजिमुदौलाची फौज आटोले याणी लुटली होती त्याचा प्रतिकार दौला करणार होता. इतकियात शहरसुभा दौलाचा नवाबानी काढला याजमुलें आटोले स्वस्थ होते साप्रत फिरून शहराचा सुभा दौलास नवाबानी सागितला. याजवरून अजिमुदौला याणी स्वार व गारद व तोफा सेलगावावर पाठवावयाची योजना केली. हे वर्तमान आटोले यास कलताच सेलगावची वस्ती उज्याड केली व आणिखी पाचसात गाव उज्याड केले. औरगाबादेहून फौज व गारद व तोफा निघाल्या आहेत म्हणून येथे बातमी आली त्यावरून धुरधर याणी विचार केला जे, हशमतजग याची फौज व गारद व तोफा लाखनवाड्याचा घाट उतरून येणार, अजिमुदौलाची जमियत घाटमाथा येणार व अलजपूरकर जमियतीने तयार आहे तेव्हा सारी जमियत नवाबाचीच आहे, याचा पुढील मनसबा काही कलत नाही याजकरिता आपण पुण्यास गेल्यावर मागे खटला पडला तर परिणाम चागला नाही. याजकरिता हशामतजग याची व अजिमुदौला याची जमियत व येतेशामजग काय विचार करितात तो पाहून ज्यात आपल्यास विरुध न पडे असे असल्यास निघण्याचा उद्योग करावा नवाबाकडील कागदपत्र स्वछतेचे येतात. विरुधभाव काही नाही परतु जागिरदार नवाबाचे याची चाल स्वस्थपणाची दिसत नाही. कदाचित सारे येकत्र वराडात जाहाले तर मोठी मसलत आपल्यास पडेल. त्यासमई फौज बाहीर निघण्यास दिवसगत लागेल याजकरिता भवानी काले याजसमागमे जरिपटक्याचे निशाण व नौबत देऊन वरधेच्या उतरतीरी जवल्यास फौज व तोफा घेऊन ठेवावे, जरकरिता वराडात त्याणी दुरबुध धरून दगा आरभिल्यास याणी जाऊन त्याचे पारपत्य करावें. आपल्या फौजेच्या दबावाने ते आपल्या जागाच सिराले तर आपली फौज माघारे आणवावी हा सिधात करून भवानी काले यास निघण्यास मुहूर्त पौष वद्य प्रतिपदा पाहून ठेविला आहे. धुरधर प्रस्थानेकरून डेरियास गले तेव्हा निशाण व देव नेले आहेत ते हा कालवर आणिले नाहीत. भवानी काले याची रवानगी डेरियात जाहाली म्हणजे आपले निशाण व देव आणावे व लोकासही केवल जात नाहीत असे कळू नये म्हणून डेरे बाहीर निशाण व देव ठेविले आहेत. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ५२

| | | |
|---|---|---|
| रु न. ८८ | श्री | ता. ८ जानेवारी १७८४ |
| फा न. १४ | | पौ छ २७ सफर |
| पत्र न. ७६ | | सन आर्बा समानीन |

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी. सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ. १४ सफर यस्थास्थित असे विशेष राजश्री सेनाधुरधर याणी मार्गसीर्ष वद्य तृतियेच्या मुहूर्ताने अग प्रस्थान करून डेरीयात गेले. त्या मुहूर्ताची दिकत चितात आली याजमुले दुसरा मुहूर्त पौष शुध त्रयोदशीस निघावयास निश्चय करून हवेलीस माघारे डेरीयातून आले त्रयोदसीच्या मुहूर्तास निघावे तो वराडातून बातम्या याच्या आल्या हशामतजग व अजीमुदौला याची फौज घाटमाथा आली याजकडील येक दोन ठाणी होती तेथे आपली ठाणी बसविली. येतेशामजग याणी शाहा मिर्जास धरून अलेजपुरास आणविला असता त्याजवलची जमीयत दूर करावी ते न करता नवे काही हिदुस्थानातून भूपालच्या मार्गे लोक दोनशे स्वार व च्यारसे प्यादे आले ते नवे चाकर ठेविले म्हणून वर्तमान आले. राजश्री व्यंकोजी भोसले याच्या गल्यास उजवीकडे कानाखाली सुज आली. त्याजमुले ज्वर जाहाला त्यास उपाय केले तेणेकरून गुणावह जाहाले विशेष आरोग्यता जाहाली नाही. त्रयोदसीच्या मुहूर्तावर निघावे असा निश्चय होता त्यास घाटमाथा फौज जमा जाहाली. अलजपुरास येतेशामजग याची जमीयत आहे. सारे येकत्र जाहाल्यावर काय करितील याचा मशार चितात आला म्हणून निघाले नाहीत मध्ये बातम्याची पत्रे आली ती दाखविली, याप्रमाणे नागेद असता उपेक्षा याची करून जाणे रूजू नाही म्हणून सागितले. त्यावरून विनंती लिहिली आहे. पुढे जाणे तर येविसींची राजश्री दफ्तरदार विष्णु राम येथे दो लिहिली जातील. व स्वामीनही येथील ध्यानात आणून लिहावे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ५३

ऐ. सं. ८८  
फा. नं १४  
पत्र नं ७२

श्री ता १५ जानेवारी १७८४  
पौ छ १२ रबिलाखर  
सन अर्बा समानीन  
माघमास

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी—सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २ रबिलाखर यथास्थित असे विशेष सलाबत खान यांजकडून मध्यस्थीस आले होते पावणेदोन महिने येथे राहिले, इंग्रजांच्या तर्फेने बोलणे निम्मा इलाख्याविषयीचे बोलणे होते, त्यासी राजश्री सेनाधुरंधर उत्तर करीत होते जे, इंग्रजांचा इतबार, बाकी सिबंदी नमकहलालीशिवाय आहे ती दूर करितील, तेव्हा येईल यासरीज तुम्ही मध्यस्थीस जाल्यां परंतु आम्हास प्रमाण भासत नाहीत त्यावरून सलाबतखान यांणी इंग्रजास येविशी लिहून पाठविले होते जे, तुम्ही नबाबाच्या नेमणुकीसेरीज सिबंदी जाजती ठेविली आहे यामुळे खर्चास पडल्य आहे तर कारण नसतां जाजती सिबंदीचे कामही नाही याहा सिवायरांखेरीज व पहिल्यापेक्षां नेमणुकीसिवाय जमियत बरतरफ करावी म्हणून त्यास उत्तर इंग्रजाकडून आलें त्यानास, तुम्ही आल्यानंतर यविसीचा मजकूर तुम्हासी बोलण्यांत येईल हें पत्र खान यांजकडून धुरधर यांणी पाहावयास आणिलें होते त्यावरून व याहा सिवास बंद करून अलजपुरास आणविले असतां पारपत्याहीर उत्तरदिले होते, तंव जसा याउन भटले, सिवास समारंभाने शहरांत आणून नियली हवेली उतरावयास दिल्ही, कुमराजाच्या जमियतीस सवारास शिवे, तोफखाना होता तो आरस्य भागांतल्यांत ठेविला, सिवाती बहुत भद्र पाठविल्या नवी जमियत पाचसे पायत स्वार व गारदी, मिळून ठेविली, भागिरथी शिष्यतिचास ठेवावयाची उमेद आ५, दुनाजी भारी पाहर्डीत मनास याहता त्यास भिसंद यान यांजकडी आणून त्याचा लेक व भाऊ चाकरीस ठेविल्या ही कर्नी अलजपुराहून व गायकवाडहून धुरधरांशी भार्गी ही सलाबतखान यांस ठेवयिली त्यावरून सलाबत खान गड उठावे जे, इंग्रजांनी आपल्यास सदुस्ताच्या कामास पाठविले त्या मजकूर आम्ही करीत असतां मात्र परस्पर घरांत उत्तर करितात दुलाजी पाशी बस ठेविले तर्फेनी गर्मान्चर शिपाई जबाबी बुद्ध आहे. भिन्नतेच्या ज्यांस दुलाजी याच्या भाव नाही हे प्रत्यक्ष आहे. याकरितां आपल्यास निरोप द्यावा, अलजपुरास जाऊन इंग्रजांस विचाराच्या गोष्टी सांगून मागावर आल्यास आणू येथून लिहिल्यावर गोष्ट मनात नाही यांप्रो बोलणें धुरधरांनी मान्य केलें सलाबतखान यास येकदांपासच अळजपूर परगणा सरंजाम दिल्हा तेव्हा अळजपुरच्या अमलाचा मजकूर धुरधरांसी बोलत होते त्याप्रमाणें धुरधरांनी मान्य केलें नाहीं यावरून भटे जाले छ २७ सफरी निरोप घेऊन सलाबतखान नागपुराहून गेले खिजरखान यांस आष्टेर आष्टाय वगैरे महालची जागीर आहे, ती गावेलच्या किल्ल्यास लगत आहे तेथें किल्ल्याची नेमणूक पहिल्यापासून यांचीच आहे पहिले जागीरदार लहान होते तेव्हां त्यास अमल किल्लेवाले यांणी दिल्हा तो घेऊन राहात होते, त्याप्रमाणें खिजरखानास हे सांगतात ती गोष्ट खिजरखान मानीत नाहीत आम्ही जागीरदार आहों तुमचा हिसा यावयाची होईल या हिशेबाप्रमाणे देऊ म्हणतात किल्लेवाले यांजकडील कमाविसदारास पहिल्याप्रमाणें अमल करू देत नाहीत यावरून खिजरखान यांची कटकट वाढेल असें आहे, इस्मतजंग यांणी गानच्यार ठाणी राजश्री सेनासाहेब-सुभा यांजकडे बहुत दिवस चालत होती ती घेऊन आपली ठाणी बसविली म्हणून बातमी आली आहे प्रस्तुत इस्मतजंग जमियत घेऊन आपल्या आम्हास कारंजियास गेले, घाट माथा जागिरीसेरीज गढ्या पांच सात घेतल्या गढीवाले यांस धरून पैका घेतला, धणी कैदेंत ठेविले आहेत आपल्या जागिरीसेरीज इतरांची जागीर होती तेथें संटणी घेतली त्याप्रमाणेच वराडांतही वर्तणूक करून कारंजियास गेले आहेत सेनासाहेब सुभा यांजकडील विठल बल्लाळ सुभेदार वराडांत दोन हजार फौजनिशी उमरावतीपासून पलीकडे गावा कोसां वर आहेत धुरंधर पौष शुध त्रयोदसीस निघणार होते, ते गोष्ट न घडली यावरून राजश्री भवानी काळो यांस पौष वद्य प्रतिपदेच्या मुहूर्ते करून तीन कोसावर उतरावले होते, फौजेची समजावीस करून पुढे कोठेच्या सुमारे रवाना करणार होते, त्यास भवानीपंत यांनी भाऊची सुन निघून पावली म्हणून मा।रनिले माघार घरास आले आठ दिवस जाहाले, अद्याचितितीची महालीयावर दुसरा मुहूर्त पाहून रवाना करावे ही कल्पना आहे. राजश्री यशवंतराव भवानी गुदस्ता नबाब निमगव आले होते तथा त्यांणी धुरंधरांशी फौज मागितली त्यावरून मा।रनिले फौज देऊन त्याजकडे पाठविले होते निरमलचे काम जाहाल्यावर नबाबांनी फौजेस निरोप देऊन मा।रनिल्हे समागम पाऊन हैदर पारेस गउ ते आजपर्यंत तपेच होते संप्रत यशवंतराव

यास नवाबा(नी) निरोप दिल्हा ते हैदराबादेहून निघून नागपुरास येत आहेत, पधरा दिवस येथे यावयास लागतील. ते येऊन पोहोचल्यावर नवाबाच्या येण्याच्या बोलण्याचे व करण्याचे अर्थ कलतील त्याप्रमाणे विनती लिहीन साराश अलजपुरकराचा व बिलदखान याजकडील जाबसालाचा गुता उरकण्यात आला नाही. सलाबतखान अलजपुरास जाऊन काय निश्चयात आणून लिहितील त्याचा प्रत्यय येईल त्याप्रमाणे जो विचार करावयाचा तो धुरधर करितील राजश्री व्यकोजी भोसले यास आरोग्यता चागली जाहाली आहे. स्वारीसिकारीस जात असतात. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ५४

रु. न. ८८ श्री जानेवारी १८७४
फा. न. १४
पत्र न. ९२

सेवेसी विज्ञापना. येतेशामजग अलजपुराहून नवरोजा करावयाकरिता बाहीर निघून तीन कोसावर रानात डेर देऊन राहिले आहेत जनाना समागमे आहे भोवत्या चौक्या गारदी पाच पाच कोसी ठेऊन आहेत. गावेलचा लता जवळ, याजकरिता गावेलकरानी खबरदारी करून राजश्री धुरधर यास पत्र पाठविले आहे. त्यात मजकूर, पेंढारी भूपालाकडे गेले होते, ते माघारे फिरून आले, त्याणी येतेसमई खाडवे प्रातीचे गाव चार लुटले व बोरगाव प्रात अशेरचा गाव मातबर लुटून, पस्त करून, बराणपुरानजीक कालाचौत्रा आहे तेथे मुकाम करून राहिले आहेत. त्याजकडे जगानी पहिले सुत्र अशेर किला घेण्याविसी करून ठेऊन नवाबास लिहून पाठविले होतें जे, अशेरचा किला आम्ही घेतों त्यावरून नवाबानीं उतर पाठविले जे तुम्ही सूत्र किल्याचें पकेपणें केलें असेल तर चागले आहे. कचें काम जाहाल्यास गोष्ट वाईट आहे तुम्ही उद्योग केल्यावर सिधीस न गेले हें वर्तमान पतप्रधान यास कलल्यावर, त्याजकडून उपाध चालीस लागल्यावर, तुम्हाकडून पुरी पडणार नाही. याजकरिता जें करणें तें पकेपणें काम होऊन येईसे असल्यास आम्हाकडे पकेपणाचा मजकूर लिहून पाठवणे कचें काम न करणे म्हणून त्यावरून त्यावेलेस ती गोष्ट राहिली. हली पेंढार येऊन किल्याजवल राहिले आहेत जगही जमियतसुधा नवरोजाचें निमितेकरून बाहीर निघाले आहेत, याजवरून अशेरचे राजकारण काहीं असेल असे दिसण्यात येते म्हणून पत्रे आली आहेत हें वर्तमान शेवेसी निवेदन असावें याजकरिता लिहिले आहे. जगाची चाल चागली नाही बोलणें व करणें व दाखविणें प्रथकाकारे आहेत, येकास येक मिलत नाही. ढुमाजी कोली किलेजातचा माहीत त्याचा पुत्र व भाऊ चाकरीस ठेविला आहे याविसी सिंद्याकडील कारभारी तेथे असतील त्यास सावधाईविसी सागावयाचे असल्यास आज्ञा करावी सिदे गोहदेचे काम उरकले असता देशास येतील तेव्हा जगाचा परामर्ष केला तर सहजात घडेल शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ५५

रु न. ८८ श्री ता. ३ फेब्रुवरी १७८४
फा न. १४ पौ. छ २९ रविलाबल.
पत्र नं. १३५

श्रीमत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी सेवक सदासिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ. ११ माहे रविलाबल येथास्थित असे विशेष. राजश्री सेनाधुरधर मार्गसीर्ष वद्य तृतियेस मुहूर्ते करून बाहीर निघून डेरियात जाऊन राहिले. निघण्यास मुहूर्त चागला न जाहला म्हणून दुसरा मुहूर्त पौष शुध त्रयोदसीचा करार करून फिरून हवेलीस डेरियातून आले. त्रयोदसीच्या मुहूर्ते करून प्रस्थान करणार आहेत म्हणून विनती पूर्वी लिहिलीच होती. त्यावरून विदीत जाहाले असेल. आलीकडे दुसऱ्या मुहूर्तावर निघावें येविसी सर्व सिधता करून ठेविली असता अलजपुरकर येतेशामजग याजकडून सलाबतखान मध्यस्तीच्या बोलण्यास आले. उभयपक्षीं सौरहस्य करून घ्यावें म्हणून बोलत होते. त्याच्या बोलल्याप्रमाणें परीणाम होईल हा भरोसा येत होता त्यास शहा मिर्जास पहिली येक दोन पत्रें जगानी पाठविली ती त्याणें मानीली नाहीत. जगास उतरें धृष्टतेची लिहीत गेला. त्यावरून जगानी मिर्जाची पुढील वर्तणूक ध्यानात आणून दोघे भले माणूस पाठवून कुमदानाकरवी मिर्जास कैद करउन अलजपुराकडें आणविला. त्यावरून जगाकडील बोलण्याचा इतबार पडत होता येविसीचा तपसील विनती लिहिलीच आहे त्या उपरी मिर्जास आलजपुरास कुमदान घे
त्यावर जगानें बाहीरच उतरविले त्यास
यावयाची परवानगी नाही. असा ब

उदेश रा॥ महिपतराव दिनकर अलजपुरारा पा॥ होते. त्यास महिनाभर ठेउन सलाबतखान यास बोलण्याचा निश्चय नागपुरी करितील म्हणून समागमे देऊन महिपतराव याची रवानगी करून दिल्ही. ते खानास वेऊन आले. इतक्या कार्यात मार्गसीर्ष मास आला. खान येथे आल्यावर त्यासी बोलणी जाहाली. त्या प्रो॥ ठगवात येईल या भरवसीयाने मार्गसीर्ष वद्यात मुहूर्ताने बाहेर निघाले. जगाकडील ठराव होणेचा होता तो घडून आल्यावर खानास निरोप देऊन आपण कूच करावें ही योजना होती. त्यास ज्या दिवसी मुहुर्ताने तिकडे येण्यास निघाले त्याच दिवसी दादासाहेबाचा समातीचा दिवस असे लिहिले पुण्याहून तानकोपताचे आले त्याजवरून धुरधर याच्या चितास प्रशस्तता न वाटली जे, ज्या मुहूर्तावर निघाले तो मुहूर्त दिवस उभयपक्षी आनदाचा शुभदायक असावा असा न जाहाला. याजकरिता जगाकडील बोलण्यास आठ च्यार दिवस लागतच आहेत तोपर्यंत दुसरा मुहूर्त पाहून निघावें हे प्रशस्त आहे म्हणून दुसरा मुहूर्त पाहून ठेऊन वाड्यात आले. मुहूर्ताचे दिवस जवल आले, जगानी मिर्जास धरून आलजपुरास नेतात तेव्हा पुढे सिबदी दूर करितील फदफिसाद करणार नाहीत, प्राचीन आमलदार वराडचे होत गेले त्या प्रो॥ चालतील हा भरोसा होता तो येकीकडे राहून मिर्जास आलजपुरास घेऊन गेले. त्या उपरी सिबदी त्याच्या समागमीची आहे ती दूर करावी ते न करून मिर्जासमागमीच्या लोकाची दिलभरी केली व करितात. व नवी सिबदी आणिखी ठेवितात. व पर्वतवासी कोली यासी सधान करून भेटीस आणितात. तेव्हा जगाचा इतबार कोणत्याही गोष्टीचा पुरतच नाही. हा येक व दुसरा हगमतजग याची जमीयत घाटावर, त्याच्या मागे मिरजुमलाची जमीयत, इतके तयार आहेत. याजखेरीज वराडात बिलदखान वगैरे लहानसाहान जागीरदार आपल्या जागा तयारीनिसी आहेत याचा मनसबा पुढील कर्तव्याचा समजण्यात किमपी येत नाही. इतका समाज मिलाला आहे पुढे काय करितील हे न पाहाता निघून पुण्याकडे जावें, तिकडे गेल्यावर मागे याणी हगामा आरभिल्यास ती गोष्ट चागली नाही याजकरिता च्यार दिवस हे काय मनसबा करितात हा पुर्ता पाहावा तेव्हा जाणे घडे, मध्यतरी गेल्यास जागीरदाराचा इतबार नाही तेव्हा तीढण बसेल हलीच्या येण्यास हा प्रतिबध आला आहे यास इलाज नाही याजकरिता दुसरा मुहूर्त निघावयास योजिला होता तो सिधीस पावला नाहीं नवाबाची पत्रें जगास दोन तीन आली असता पत्राप्रमाणे वर्तणूक करावयास त्यास अनकूल पडतच नाही. धुरधरानीं नवाबास दोन तीन वेल जगाच्या चालीविसी लिहीलें त्याची उतरें नवाबाची आली. जगास आम्ही लिहिले आहे, तुम्हासी दुसरा विचार करणार नाहीत नवाबाचे लिहीणे या प्रकारे, चाल तर असी आहे. तेव्हा नवाबाच्या मनातील मनसबा काय आहे हाही भाव कलत नाही. आपण फौज पाठउन जरबेने राहावे तर सध्या आपणच विरुध वाढविलें असे होऊन मोठया मसलतीस पेच बसेल तेव्हा तो विचार करता येत नाही. याजकरिता राजश्री भवानी काळो यास फौजसुधा बाहेर दहावीस कोसी उतरवावें. जसा त्याजकडून मनसबा द्रिष्टीस पडेल तसा आपण करता येईल याजकरिता अगोधर फौजेची तयारी असावी. हा विचार ध्यानात आणून मशारनिले याची रवानगी होत होती इतकियात मशारनिलेची स्त्रन निधन पावली त्याजमुळें प्रस्यानें करून डेरीयास गेले होते ते भवानीपत घरास आले आहेत सलाबतखान निरोप वेऊन आलजपुरास गेले आहेत. ते जगासी बोलून काय निश्चयात येते, काय लिहून पाठवितात हे कललियासारखा पुढे येथून जो विचार करणें तो करावा ही योजना धुरधर याची आहे. सध्या जगाकडील चाल सुधी नाही ही मसलत येऊण पडली आहे. याचा परिणाम कसा लागावा ही योजना येथे होत आहें सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ५६

रु. न ८८ श्री फेब्रुवारी अखेर १७८४
फा. न. १४
पत्र न. ९४

सेवेसी विज्ञापना राजश्री सेनाधुरधर याणी आपल्या कन्येच्या लग्नाचा निश्चय केला आहे तिथीचा निश्चय नाही परतु वैशाख शुधात करावे असा सिधात नेमला आहे रामनवमीचा उछाह जाहाल्यावर लग्नपत्रें पाठवावी, तावत्काल-पर्यंत देशीहून मोहिते येणार आहेत तेही येतील चैत्र पौर्णिमेपासून गडगनेर करणारानी करावें. मागे पुत्राची लग्न जाहाली तेव्हा येके दिवसीं दोनचार घरी गडगनेर व्यावी लागलीं त्याप्रमाणे या वेलेस करावयाचें नाहीं, नित्य येकाच्या घरीं गडगनेरास जावे, दुसरीयाच्या घरी त्या दिवसी जाऊ नये, म्हणून सर्वास सागून ठेविले आहे. त्यास येथील कारभारी गडगनेर करावयास लागतील तेव्हा मजलाही सागतील त्यावेलेस गडगनेर करावें लागेल याची आज्ञा होईल त्याप्रमाणें करीन. गडगनेर सरकारतर्फेचें करा म्हणतील

त्यावरुन काय करावें ! व त्यासमई अवेर करावा लागल त्याविशीं काय करावें पत्र आपल्याकडे याजकरितां विनंती लिहिली आहे. यविशीं तेथून सर्वांचे गंगथडीचे व वऱ्हाडची पाऱ्हायची असल्यास गंगथडीची सर्वांचे येथ पौर्णिमेकरितां येऊन पावल्यास सर्वांच्या समारंभावरावर करण्यास उपयोगी पडतील. येथें समपत्र तयें आल्यावर मग पाठवावयाची याजना तेथून जाहल्यास यथ प्रसंगास येऊन पावणार नाहींतस स्पष्ट याजकरितां आगोधर विनंती लिहिली आहे, यविशीची जशी आज्ञा येईल तशी वर्तणूक करीन गतवर्षी श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांस गंगथडीचे पर्यांत तर्फेच या मल्हारराव यांणी फर्ल व वऱ्हाडही पर्यांत पर्यांत करभागी गंगथडीचे करा म्हणून सांगतील तर्हां त्यांसी उत्तर काय करावयाचें याची आज्ञा येईल त्याप्रमाणें करीन सदैव लोभ असु देत हे विज्ञापना

## ५७

ह मं ८८ श्री ता. १५ मार्च १७८४
फा मं. १४
पत्र मं ९१

सेवेसीं विज्ञापना राजश्री सेनाधुरंधर आपले कन्येचें लग्न येणार मासीं करणार याजकरितां राजश्री निंबाजी मासले यांणीं सहकुटुंब यथ यावें हे मानस धुरंधराचें आहे याजविशीं त्यास पत्र पाठविल्यानेच यांतील अर्थ घडणार नाहीं यास्तव राजश्री नेमाजी भोसले याची रवानगी छत्तीसगडाकडे रामपुरास पाठवावें, समागम या यशवंतराव मवानी व आणिखी दोनशें स्वार व अंबारियांचे हत्ती व पालख्या, घोडीं, उंट, व ऊंट (?) दुस्या पाठवून त्यांस आणावें, ही याजना केली आहे. फाल्गुन वद्य प्रतिपदेस येथून रवानगी करावयाचा मुहूर्त पाहिला आहे, लिहून गेल्यावर गेले म्हणून लिहून पाठवीन सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ५८

ह. मं ८८ श्री ता १७ मार्च १७८४
फा. मं. १४
पत्र नं २२

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं सेवक रघोजी भोसले कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २४ रबिलाखर यथास्थित असे विशेष राजश्री सेनाधुरंधर यांणीं स्वामींच्या भेटीस यावयाकरितां मुहूर्त पाहून पत्रें राजश्री बळवंतराव यांजकडे पाठविली होती निघण्याची सिद्धता जाहली असतां मुहूर्त निघावयाचा पुढें आहे तो दरम्यान बळवंतराव यांजकडून उत्तर आलें त्यांत मजकूर की, पत्रें श्रीमंतास दाखविली, पत्रें पाहून संतोषास पावून उत्तर केलें की, धुरंधराचें येणें इतक्या दिवसांत होऊन परस्पर बोलणी स्नेहाची व सल्लामसलतीची होऊन हे दिवस येथून निरोप घेऊन नागपुरास जावयाचें होतें त्याप्रमाणें त्यांणीं उद्योग केला असतां विकलील जागीरदारांच्या तिढणी याजमुळें दिवसगत लागत आली असतांही हा काल्पनिक तो म्हणजे उरकला नाहीं तो पत्र तयार ठेऊन व श्रीरामचंद्रजीचा उत्सव पुढें आला त्या दिवसांत मत नियम असतांही निघून येवावें तेव्हां येण्यास मार्गी मास पंधरा दिवस पाहिजेत येथें आल्यावर भेटी होऊन बोलणी सर्व होण्यास तर महिना दोन महिने पाहिजेत त्यास हल्ली श्रीमंत राजश्री पंतप्रधान पुण्यांत, आम्ही सिद्धटेकाच्या सुमारें देवदर्शनास जाणार व राजश्री हरीपंत मुरारपुराच्या सुमारें गेले आहेत असे असतां धुरंधराचें येणें जाहलें तर सर्वांच्या भेटी घडणार नाहींत हरीपंत व आम्ही येकत्र श्रीमंतांजवळ असावें तेव्हां भेटी व्हाव्या म्हणजे सल्लामसलतीस चालण्यास चांगले पडेल याजकरितां सध्या निघून येतात हे ठीक नाहीं विकलील जागीरदार यांचा गुंता उरकून घ्यावा देवाचें नवरात्र करावें व पुढें समयाप्रमाणें वैशाखमासीं संपादून घेऊन मागें यावें इतक्यांत हरीपंत व आम्ही येकत्र होऊन पुण्यास गेल्यावर आषाढ श्रावणमासीं येण्याविशीं पत्र पाठऊं तर्हां निघून यावें ही सल्ला चांगली आमच्या विचारास आली आहे याजकरितां तुम्ही बळवंतराव यांजकडे लिहून पाठवावें म्हणजे निघणें होणार नाहीं मागाहून आम्ही पत्र पाठऊं ते पाठवावें व हरीपंतही विकल्पून यांस प्रमाणें लिहून पाठवितील म्हणून होता त्यावरुन धुरंधर यांणीं निघावें न निघावें हा संदेह घडला होता इतक्यांत आपलीं पत्रें येऊन पोहचलीं व तात्याकडे मुतरस्वार यांचे गेले होते ते उत्तरें घेऊन आले त्यांतील मजकूर जो बळवंतराव यांणी लिहिला तोच आहे. त्यावरुन धुरंधर यांणीं निघून जावयाचा उद्योग होता तो ठेऊन राहावयाचा विचार करून कल्पना घेत होते जे आम्हास सध्या न यावें म्हणून लिहावयाचें कारण काय आहे ! आम्ही तर निघावयाचा कबूल करीत नव्हतों स्वामींनीं लिहिलें तर्हां चिंता काय आहे. आम्ही करार ठरविल्या

आहे त्या प्रो। निघून जातो. आधी ज्याची भेट घडेल त्याच्या विचारानुरूप पुढे जें करणे तसे करावयास येईल. परतु आता राहाणे ठीक नाही म्हणून आग्रह करीत होते. तेव्हा मी सागितले जे येथील व तेथील विचार दोन नाहीत. तेव्हा तेथील पत्रे आली आहेत त्याप्रमाणे करावे हे चागले, त्यावरून मान्य करून राहावे हा निश्चय करून वैशाखमासी कन्येच्या लग्नाचा उद्योग करण्याचा सरजाम करावयास सागितला, व देवाच्या उछावाचा समारभ करिविला आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ५९

रु न. ८८ श्री ता २८ एप्रिल १७८४
फा न. १४
पत्र न ११४

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी सेवक सदासिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ ७ जमादिलाखर यथास्थित असे विशेष स्वामींनीं सिवटेकच्या मुक्कामीहून राजश्री सेनाधुरधर यास पत्रे व सेवकास त्या पत्राची नकलसुधा पत्र पाठविले ते डाकेबरोबर राजश्री बलवतराव विष्णु याणीं आपल्या पत्रासुधा पाठविली, ती येऊन पावली. सेवकाच्या पत्री आज्ञा जे, नवाबाच्या भेटीचा सिधात जाहला आहे, याजकरिता भेटीच्या समारभसमई सेनाधुरधर याणी असावें हें चागले आहे. आजपर्यंत नवाबाच्या भेटीचा निश्चय नव्हता, हली गोविदराव भगवत नवाबाचा निरोप घेऊन आले. ते येत आहेत पोहचले नाहीत, तो नवाबाची पत्रे दोन आली जे, भेटीचा योग जमला पाहिजे. आम्ही कूच करून सुरापूरच्या रुखावर येतो आपण लौकर आले पाहिजे त्यावरून भेटीचा निश्चय करून आम्ही मुकाम मजकुरास आलों, येथें काही मुकाम करून राजश्री हरीपत सुरापुरच्या सुमारे पुढें आहेत त्या सुमारें जाणें घडत आहे पहिली पत्रे धुरधर यास लिहिली आहेत जे तुम्ही या समई तिकडील जागीरदाराच्या तिढणी व रामनवमीचा उछाह घरचा समीप आला आहे व पुढे वैशाखमासी लग्न करावयाचें मानस आहे असे गुते ठेऊन येणार. त्यास आम्ही बाहेर व हरीपत पढरपुरच्या सुमारें व श्रीमत पुण्यात आहेत असे असता सर्वांच्या भेटी येकेस्थली होणार नाहींत याजकरिता आम्ही व हरीपत श्रीमताजवल येकत्र जाहाल्यावर तुम्हास लिहून पाठवू तेव्हा यावयाचे करावें म्हणजे येके जागा भेटी होऊन बोलणे सलामसलत जे होणे ते होईल म्हणून. त्यावरून धुरधर याणी लग्नाचा उद्योग आरभिला असेल. त्यास तेव्हा नवाबाच्या भेटीचा निश्चय नव्हता म्हणून लिहिले. हली भेटीचा निश्चय जाहाला आहे या समयास त्याणी जरूर असावें. यास्तव लग्नकार्य चिरजीवाच्या स्वाधीन करून देऊन आपण लावलाव मजली करून सत्वर समयास येऊन पोहचावें म्हणून तुम्ही धुरधर यासी बोलून लवकर त्याचे निघणे होय ते करणे म्हणून आज्ञा. त्याप्रमाणे धुरधर यासी बोलण्यात आणिलें तेव्हा त्याणी सागितले जे आम्ही तीन वेळ निघण्याचा उद्योग करीत असता सिधीस न गेला. चौथ्याने निघत होतो त्यास पुण्याहून पत्रे आली जे पुढे यावयाचे करावे, सध्या आल्यास सर्वांच्या भेटी एक जागा घडत नाहीत म्हणून त्यावरुन लग्नाच्या कार्यास उद्योग आरभिला. सर्व साहित्य जाहाले आहे. या मुलीचें लग्न आपल्या हाते कर्तव्य आहे नवाबाच्या भेटी होत आहेत. तेव्हा परस्परें प्रेमच विसीष्ट घडेल. स्वराज्याची मसलत जी ठरेल त्यात आम्ही हाजर आहो—श्रीमताच्या दौलतीत ही दौलत आहे. ते जी सला ठरावितील त्यास आम्ही सर्व प्रकारें अनकूल्च आहो लग्नकार्य चिरजीवाच्या स्वाधीन करून जावें असी निकड मोठ्या मसलतीची नाही भारी मसलतच असती तर लग्न ठेउन जाणेच प्राप्त होतें तसा विचार नाही. भेटीचा प्रसग आहे त्या समई तेथे जो निश्चय जाहला आहे त्याप्रमाणे भेटीचा योग घडावा. त्यासमई मात्र परस्परें दारमदार ठरतील त्यात स्वराज्याची दुरुस्ती कैलासवासी माधवरावसाहेब होते त्याप्रमाणें राहावी ही दरज जरूर ठेवावी नबाब काबुची आहेत या समयात भेटीचा आक्षेप त्याणी केला आहे. त्यात काही नफा पाहिला असेल हे पुर्ते चित्तात ठेउन दारमदार होणे तसा व्हावा. आम्ही लग्न जाहाल्यानतर वैशाख सरताच जेष्ठ मासी जाऊन भेट घेऊ. पुढे तेथे गेल्यावर सलामसलत ठरावणे ती ठरण्यात येईल याप्रमाणे बोलणें जाहालें जाहाले याचे येणे भेटीस होत नाही लग्नाचा समारभ मोठा माडला आहे. वैशाख शुध पचमीस वराचे सिमत-पुजन करून जानीवास घरी आणून राहाविले आहेत. ती जागा हवेलीपासून कचा कोसभर आहे. लग्नाचा निश्चय तिथीचा वद्य चतुर्थी शनवारचा योजिला आहे द्वादसीचा मुहूर्त राहिला गडगनेरे गावात नित्य च्यारपाचप्रमाणे चालीस लागली आहेत. वृतदिवस येकादसी सोमवार, अक्ष तृतिया आमावास्या असे रिकामे जातात. वरकड दिवसी दोन

तीन मगज येथून फिरती च्यार पांच, काट मारून, कोठे मिळाल यांस हात आहे गडगनेयास असामी पुष्प बाहेर चालीस पचेचालीस हात आहेत खच मोठाच लागतो मध्याची शामा चोमळी फली आहे छिनमापी छत आहेत फागर्दी शग माटा थार केला आहे आसवन्यामीचा जीनस चढून आहे आज्ञेप्रमाणें आहेर व गडगनेर करितां शवती श्रुत होय हे विज्ञप्ति

६०

| | | |
|---|---|---|
| रु. म ८८ | श्री | ता २ मे १७८४ |
| फा मे १४ | | पौ छ २८ जाखर |
| पत्र म १२० | | सन अर्बा समानीन वैशाख |

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ १२ जमादिलाखर यथास्थित असे विशेष स्वामींनीं पत्रें टांकसमागम, राजश्री बळवंतराव विष्णु यांजकडून राजश्री सेनाधुरंधर यांस, दोन पाठविली तीं येऊन पावलीं व सेवकास पत्र व धुरंधरांच्या पत्राची नक्कल एसें पाठविली ती पावली सेवकाच्या पत्रीं आज्ञा जे, नवाबाच्या भटीचा निश्चय जाहला आहे, तिकडून नबाचार्य कूच होऊन पत्रें आलीं ज, आम्ही कूच करून आराम कूच करून यावे, म्हणून राजश्री गोविंदराव भगवंत येऊन पोहोचले नाहींत तो अगोधर आली, त्यावरून आम्ही कूच करून शिघ्रदपास आलो, नवाबाच्या भेटीच्या प्रसंगास धुरंधर यांनी अगत्यरूप जाहालें पाहिजे यास्तव तुम्ही सांगून त्वरेनें येणे होय तें करून करणें विषयीं निघाले हे वर्तमान पुढें बजद व यतात कोण दिवसीं हे लिहून पाठवणे म्हणून आज्ञा, त्यावरून धुरंधर यांसी बोलणें जाहालें व पत्र त्यांची त्यांणीं पाहून मजकूर ठाम्यविली नंतर धुरंधर यांणीं निश्चय यांस आणिलें ज, पहिलीं पत्रें आलीं त्याच्या अगोधर आम्ही निघण्याचा उद्योग करीत होतो तो त्वरा करून यावे म्हणून पत्र आलीं, त्यावरून दसऱ्यास उद्योग केला, सर्व साहित्य जाहालें, दोन तीन दिवसांनंतर किमोतमूल्याचा निरोप आला, वराडी येऊन गेन कासोवर राहिले, अशा विचार सर्व येऊन राहिले आहे तिकडे तर नवाबाच्या भेटीस पाठविलें, सर्व उचित आहे, परंतु मधून टाकून गस्ताख सर्वांचा बेजार राहावे नाहीं याकरितां योजिलें मार्ग विचित गेल्यावर निघून जाऊ ही दौलत त्या दौलतीच्या पोटांतील आहे, दुसरा अर्थ नाहीं कोणत्याही विचारास आम्ही आपल्याकडून द्वैतार्थ दिसू यावा असें पहिल्यापासून घडत आलें नाहीं, तें पुढेंही द्वैत दिसणार नाहीं याप्रमाणें होऊन स्वामींस पत्राची उत्तरें लिहून पाठविलीं आहेत लग्नप्रसंग होत आहे. वैशाख शुद्ध ४ शनवारीं रात्रौ लग्न आहे यशवंतराव नाईक निंबाळकर वेरीहून दोन अडीच हजार फौज घेऊन नागपुरास येत होते वराडांत कुरंदखेड्यास येऊन पोहोचले धारावर निंबाळकर फौज घेऊन आले म्हणून वर्तमान कळतांच येथून धुरंधर यांणी बिन्लवंत सुभेदार व सलाबतखान यांस लिहून पाठविले होते, निंबाळकरास येऊ न देणे त्यावरून त्यांनीं निंबाळकरास अटकाविलें आहेत पुढें येऊ देत नाहींत निंबाळकर यांस दोनसें स्वारांनिसी चाकरीस यांणी ठेवविले होते त्याणी तीन हजार फौज आणिली म्हणून अटकाविलें आहेत निंबाळकरांनी सुभेदारासी बोलणं लाविलें आहे जे, आम्हांस सुरक्षित माघारें जाऊं देणे, आम्ही नागपुरास जात नाहीं म्हणून वर्तमान आलें आहे, याउपर पुढें कस घडेल हें मागाहून लिहून निवेदन करीन सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

६१

| | | |
|---|---|---|
| रु. मं ८८ | श्री | ता. ९ मे १७८४ |
| फा मं १४ | | |
| पत्र नं १२२ | | |

सेवेसी विज्ञापना राजश्री सेनाधुरंधर यांस गडगनेर व आहेर सरकारचा करण्याविशीं विनंती पेसजी लिहिली होती त्यावरून सरकारची आज्ञा आली, गडगनेर व आहेर सरंजाम खरेदी करून करणें व मागून मुतरस्वारसमागमें दागिना तनमणी पाठविला तो येऊन गडगनेराच्या पूर्वदिवशीं येऊन पोहोचला व मागें दोन वेळ सेनाधुरंधर यांच्या घरीं प्रयोजन जाहालीं त्यावेळेस सरकारांतून आहेर आला त्याची याद नांवनिशीची व सगगाची आंकसुमारीची पाठविली ती येऊन पावली सगग सरकारची पुण्याहून आली त्या सुमारें येथे मिळत नाहींत पेठस व मल्हारपूर पुण्याची तुर्णी यथे पाहिले त्यांत येथील लग्न प्रसंगानुकूल तर अर्धांहून माहगार सगगाची जाहाली त्यांत प्रसंग पाहून, यथाक्रम विचार पाहून, सरंग घेऊन, गडगनेर घरीं आणून आश्रम पाहून केलें आहेर लग्नाच्या

दिवसी केला. दागीना तनमणी दिल्हा. या प्रो सरकारचा. प्रसगास पाहून नतर स्वामींचा आहेर निराला आज्ञेप्रमाणे केला. त्याची याद नावनिसीची व किमतीची साडणीस्वारा-बरोबर शेवेसी पाठविता त्यावरून विदीत होईल. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

६२

रु. न ८८ श्री ता. १६ मे १७८४
फा. न. १४
पत्र न. १२१

श्रीमत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २५ जमादिलाखर यथास्थित असे विशेष राजश्री सेनाधुरधर याणी आपल्ये कन्येचे लग्न वैशाख वद्य ४ शनवारी साईकाली गोधुलिक मुहुर्त-करून केले. समारभाचे दिवस बहुत सतोषाने नेले. साडे सातवे दिवसी करून वरात जानोसघरी समारभाने पोह्चाविली. नवऱ्यास दोन हत्ती व दाहा घोडी व जवाहिर व पोषाख व रुप्याची भाडी दिल्ही. लग्नाचा समारभ आपल्या हातें करून सिधीस जावा हा हेत धुरधर याचा होता तो सिधीस पावला आहे. याउपर पुढे जो विचार ठरावितील तो लिहून पाठवीन. रा यशवतराव नाईक निबालकर चाकरीच्या उदेशे दोन अडीच हजार फौज घेऊन वगडात आले होते, पुढे नागपुरास येणार तेव्हा विठलपत सुभेदार व सलाबतखान याणी येथील लिहिल्यावरून अटकाविले तुम्ही भारी जमियत घेऊन जाता कामाचें नाहीं. आम्ही जाऊ देणार नाही त्यावरून निबाल्कर अटकून राहिले, हे वर्तमान येथे धुरधर यास कललियावर निबाल्कर याचे माध्यस्त पहिले होते त्यास बलाऊन आणून निबाल्कराकडे पाठविले जे, पहिला करार दोनशे स्वाराचा करून दिल्हा आहे त्याप्रमाणें आल्यास आम्ही चाकरीस ठेऊ. अधिक स्वार आणिल्यास कामास येणार नाहीं. कराराप्रमाणें न पुरवल्यास माघारे जावें लागेल तुम्ही आमचें नाव करून देसीहून मनमानेसी फौज घेऊन येऊन लोकाच्या माहाली पैका घेतला आहे ते निमित्य आम्हावर त्याणीं ठेविले आहे त्याचा जाबसाल जो पैका घेतला असेल तो माघारा तुम्हास देणे लागेल म्हणून सागून पाठविले ते गेल्यावर हा कालवर जाबसाल आला नाहीं. यशवतराव कूच करून माघारे लाखनवाड्यावर गेले म्हणून वर्तमान आजच आले आहे. वराडात येतेशामजग याणी लहान जागीरदार याचे गाव आहेत तेथे मनस्वी वर्तणूक आरभिली आहे मौजे जलके येथे स्वारी पाठऊन गावची खरावी बहूत केली म्हणून वर्तमान आले आहे. जगाकडून येथील अमलास खलेल होत नाहीं. गोविदराव मुगुटराव व व्यकटराव कासी याजसमागमे फौज देऊन ब्रम्तर प्राती अमल बसवावयास पाठविले होते, त्याणी जाऊन येका टाण्यास मोर्चे लाविले होते आतील ठाणेवाले याणी याची गोष्ट मानिली नाहीं म्हणून याणी हला केली तेव्हा ठाणेवाले याणी हला मारून दिल्ही. गोविदराव याच्या हातास गोली लागली. व्यकटराव यास दगड डोकीवर लागला. काहीं माणसे ठार व जखमी जाहाली, मोर्चे उठऊन अलीकडे आले. त्यावर प्रातातून त्याणी दगा फार केला फौजेचे रान नाहीं. झाडीमुले घोड्याचा लाग नाहीं म्हणून माघारे आले आहेत लौकरीच येऊन पोह्चतील. चवरागडवाले याणी गोड व गोसावी जमा करून मडलेप्राती दगा केला होता त्यास मोरो विश्वनाथ याणी फौजसुधा येऊन त्याचे पारपत्य केले, गोसावी व गोड मारून काढीले. चवरागडास मोर्चे बसविले आहेत किला मोठा जागा अवघड आहे कसे करितील पाहावे. सध्या याप्रमाणे जाले आहे शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

६३

रु. न. ८८ श्री ता १६ जुलै १७८४
फा. न. १४ तौ छ १२ रमजान,
पत्र न. १२२ सन खमस समानिन,
श्रावण मास.

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २७ शाबान यथास्थित असे विशेष. राजश्री सेनाधुरधर याणी स्वामींच्या भेटीस यावयासाकरिता कन्येचा विवाह जाहाल्यानतर आपल्या निघण्याचा मुहूर्त पाहिला त्या दिवसी प्रस्थान ठेवले. त्याच दिवसी श्रुषा प्रसूत जाहाली, त्याजमुलें तो दिवस प्रशस्त नाहीं असे जाहालें. त्याउपर दुसरा मुहूर्त आषाढ वद्य सप्तमीस निघावयाचा मुहूर्त योजून ठेऊन कारखाने वगैरे सरजामाची तयारी करावयास सागितली. दहाबारा दिवस

मुहूर्तास अवकाश राहिला असतां राजश्री संताजी भोसले यांस ज्वर बहुत आला तो पांचसात दिवस राहिला तेव्हां मुहूर्तावर यावयाचा, निघणे घडेल किंवा नाहीं हा संदेह सर्वांस होता परंतु आठवे दिवशी ज्वर त्यांचा उतरला पुढें च्यार दिवस मुहूर्तास राहिले निघावयाचा निश्चय सर्वांस समजला त्याउपर षष्ठ सप्तमीचा दिवस निघण्याचा तो अगोदर दोन दिवस राजश्री व्यंकोजी भोसले यांस पंचमीस ज्वर माघारा आला त्यास समागमें न्यावयाचा निश्चय केला होता तेव्हां कारभारी याणी व आणिकही इतर लोकांनी सांगितलें जे, ज्वर जगार त्यासच समाधान नाहीं (असे) जाहालें तथा त्यांचे निघणे कसे घडे त्यास धुरंधर यांणी उत्तर केलें जे, ज्वर आहे तो पांचों दिवसी निघेल, आम्ही मुहूर्तास निघतो, पुढे जाऊं. मागून धरें ज्वरास्थावर तेही येऊन आठा दिवसांत पोहोंचवील, याप्रमाणें सांगून आपली सिधता करविली षष्ठ सप्तमीस शुक्रवारी, शनिवारा दिवसास धुरंधर निघून डेरियास मुहूर्त करून जाऊन राहिले व्यंकोजी भोसले यांचा परामर्ष निघते समई करून निघाले त्यावेळेस ज्वर फारच होता परंतु मुहूर्त दुसरा नाहीं याजकरितां निघाले समागमें पुढें जावें असा विचार पूर्वी केला होता त्यास त्यांचा ज्वर पाहून डेरियांत यांस आराम्य चांगलें होय तोपर्यंत राहून नंतर पुढें जावें असा विचार याजिला होता त्यास अष्टमी व नवमी दोन दिवस व्यंकोजी भोसले यांस ज्वराने बाधा बहुत केली त्यामुळें स्मृतीही राहिली नाहीं या दिवस अंगास घम यावा तणकरून अंगावरील व बिछाना दोन पर्यंत भिजत चालला, तव्हां दोन प्रहरानंतर दुसरी वस्त्रें आंगावर व बिछाने याप्रमाणे करणे लागलें शेला विशिष्ट जाहालें औषधोपचार यथा करावयाचे ते करीतच आहेत ज्वरास उतार नाहीं, अन्न पाणी जाईना, येणेकरून विकळता फारच जाहाली त्यामुळें सर्वांस संकट पडलें हें वर्तमान धुरंधर यांस कळल्यावर नवमीच्या दिवशीं रात्रौ त्यांच्या परामर्षास आले च्यार घटिका बसून औषधउपाय होत होते ते पाहून निघून डेरियास गेले त्याचप्रमाणे नित्य दोन प्रहर भोजनास वाड्यांत येऊन, भोजन परामर्ष करून, रात्री डेरियास जात होते ज्वरास न्यूनता नाहीं याजमुळें धुरंधरांस पुढचाही नवमीच येऊन डेरेतीत राहिले याउपरी दुसरा मुहूर्त निघण्यास प्रशस्त पाहून निघावे असा सिधांत केला आहे. ज्या दिवशीं निघावयाचा निश्चय होईल तो लिहून पाठवीन व्यंकोजी भोसले यांस ज्वरापासून किंचित स्वास्थ्य आहे याप्रमाणे दिवसें दिवस आराम्यता व्हावयास (कांहीं) दिवस पाहिजेत याप्रमाणें वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ६४

| | | |
|---|---|---|
| रु. न ८८ | श्री | ता ५ आगस्ट १७८४ |
| फा नं ११ | | पौ छ. ७ सवाल |
| पत्र न २५ | | सन खमस माखपद मास. |

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ १८ रमजान यथास्थित असे विशेष राजश्री सेनाधुरंधर आषाढ मासी षष्ठपक्षी मुहूर्त करून पुण्यास यावयास निघाले होते त्यासमई राजश्री व्यंकोजी भोसले यांस ज्वराचा उपद्रव विशेष जाहाला म्हणून त्यांच्या परामर्षाकरितां माघारे वाड्यांत आले याजकरितां तो मुहूर्त राहिला त्याउपरी श्रावण शुद्ध ५ चा मुहूर्त निघावयास पाहिला डेरे पहिले दिले होते तसेच बाहेर ठेविले होते सर्व तयारी जाहालीच होती त्यास व्यंकोजी भोसले यांचा ज्वर पंधरा दिवसीं उतरला परंतु निशेषता निघाला नाहीं मशारनिल्हे यांस समागमें न्यावे ही योजना केली होती याजमुळें ज्वराची कसर आंगात असतांनाही असे दर्शवीत होते स्नान करणें व बाहेर येणें बसणे करीत होते त्यास श्रावण शुद्ध येकादशीचा निराहार केला त्यामुळें द्वादशीस संध्याकाळी ज्वर आला म्हणून बाहेर आले नाहींत तेव्हां सर्वांस ज्वर आल्या हें कळलें वैद्यांनी औषध देऊन ज्वर उतरला श्रावण शुद्ध (त्रय?) तृतीयेस स्नान केलें आराम्यता चांगली जाहाली होती बाहेर येऊन बसत होते चतुर्थीस प्रातःकाळीच ज्वर मागती फिरून आला तो विशेषात्कारें करून आषाढमासी येत होता त्याचप्रमाणें भावना आंगांत ज्वराचा उष्मा असून घाम येऊन वस्त्रें भिजावयास लागलीं तेव्हां वैद्यांनी येऊन प्रकृत पाहून पूर्वीची भावना जाहाली आहे म्हणून सांगून उपाये चालीस लाविले त्यावर सौ यमुनाबाई थोरली कन्या धुरंधरांची इजला तृतीय प्रहरीं मागती ज्वर आला चतुर्थीच्या दिवशी संध्याकाळी व्यंकोजी भोसले व यमुनाबाई दोघांसही ज्वराचा अतिशय जाहला पंचमीस संध्याकाळी धुरंधराचा निघावयाचा मुहूर्त या दोघांची स्थिती या प्रकारची जाहाली तथापि निघावयाचा निश्चय केला तेव्हां सर्व कारभारी व वैद्य यांणी सांगितलें

जे आपण योजिल्या वेलेस निघणार परंतु निघण्यापुर्वी येक दिवस घरात उभयताची या प्रकारची स्थीत जाहाली आहे. हे पाहात असता निघून बाहीर जाता. तेव्हा बाहीर गेल्यावर जाणेच पुढे जाहाल्यास उत्तम आहे. जर करिता दुखण्यामुले विकलता यास जाहाली म्हणजे माघारे येणे लागेल तेव्हा बाहीर निघून मागती माघारे यावे हे ठीक नाही, व दुखणाईत मुलें नूतन ज्वर आले आहेत. यास पाहून बाहीर मुहूर्ताप्राने जावे हेही उतम नाही. याजकरिता आजचा मुहूर्त आहे याजवर निघून जाऊ नये किंचीत उतार उभयतास जाहाल्यावर निघून जावें म्हणजे चागले आहे. याप्रमाणे सर्वांनी सागितले त्याजवरून पचमीचा मुहूर्त निघावयाचा करार करून ठेविला असता सिधीस पोहोचला नाही. दुसरे दिवसी रात्रीस राजश्री सेनासाहेबसुभा याचे पुत्र राजश्री परसोजी भोसले यास ज्वर बहूत आला. त्याणी ज्वरामुले निद्रा केली म्हणून धुरधर पाहावयास गेले तेव्हा ज्वराचा मोठा उत्कर्ष, मूल लाहान, असह्य ज्वर आला याजमुले बलावयासही सामर्थ्य राहिले नाही त्याच्या ज्वरामुले सर्वांसच घरात व बाहिरल्यास श्रम जाहाले आहेत उपाय करावयाचे ते दैवी, मानवी, करीत आहेत. ईश्वर आरोग्यता करील. काही दिवस शरीरपिडा आहे तोपर्यंत श्रम होनील म्हणून जोतिषी व वैद्य याणी सागितले आहे. पचमीचा मुहूर्त निघण्यास पाहिला होता तो सिधीस पावला नाही आषाढमासी निघाले असता पुढे जाणे जाहाले नाही याजमुले धुरधर चितात खिन्नता धरून राहिले आहेत. याउपरी सर्वांस आरोग्यता होऊन मुहूर्त कोणता निघावयास योजितील तो लिहून पाठवीन. मार्गसीर्ष मासापासून दोन वेल मुहूर्ताने बाहीर निघाले असता पुढे जाणे न होता माघारे हवेलीस येणे जाहाले येक दोन मुहूर्त पाहिले असता निघणे जाले नाही अडथले येऊन पडले. धुरधर याचे मानस येण्याविसी उत्कठीत बहूत आहे निघून येण्याची गोष्ट योजिली असता सिधीस जात नाही सेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ६५

| | | |
|---|---|---|
| र. न ८८ | श्री | ता ६ आक्टोबर १७८४ |
| फा. न १४ | | पौ छ ५ जिल्हेज, सन |
| पत्र न ९६ | | खमस समानिन |
| | | कार्तिकमास |

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना



येथील कुशल तागायत छ २० जिलकाद यथास्थित असे विशेष राजश्री सेनाधुरधर दसरियाच्या दिवसी मुहूर्तेकरून डेरियास जाऊन, येका कोसावर सितासरडीजवल जाऊन राहिले आहेत पर्ज्यन्य नित्य येक वेल येत आहे. उटाचा कारखाना गावेलीजवल येथून असी कोसावर छावणीस आहे तेथून आणावयास माणसे पाठविली आहेत परंतु पावसामुलें मार्गी चिखल भारी जाहाला आहे याजकरिता उटाचा निभाव पडत नाही दाहापाच उट चिखलात जाया जाहाले म्हणून माणसे सागत आली. चालसा कोसावर उट येऊन राहिले. नदीस पाणी पूर आहे उटाचा कारखाना आल्यावर कुच करणार. उटास यावयास पर्ज्यन्य उघडल्यास आठ दिवस पाहिजेत इतकियात दिपवाली समीप आली आहे सहजात उटाकरिता व पावसामुले याच मुकामी दिपवाली करावी लागल. उपरातिक पावसाची उघाडी जाहाल्यावर कुच करून वराडात जातील. उमरावतीस गेल्यावर येतेशामजग व आणिखी जागीरदार याचा काय पडावयाचा असेल तो उरकून निघतील यास काय (दिवस) लागले तर लागतील दसरियाचे पोशाख स्वामीनी पाठविले ते छ १३ तारखेस येऊन पोहोचले, त्यानतर धुरधरास वर्तमान सागतले, दिनशुधी पाहून पोशाख घेऊ म्हणून उतर सागितले छ १९ तारखेस सध्याकाली दिवसास दरबार करून बसले तेव्हा पोशाख नेऊन दिले ते सर्वांनी अगीकारून साहा घटिकापर्यंत अगावर पोशाख घेऊन पाच खासे व राजश्री भवानी काले येसे बसले होते. साहा घटिका रात्रीस निरोप घेऊन घरास आले पोशाख घेऊन परम सतोषास पावले पत्र वाचून पाहून चिटनविस याच्या स्वाधीन केली आहेत. याची उतरे घेऊन सुतरस्वार जोडी बा मागाहून रवाना करून देता. सुतरस्वारास यावयास मार्गी पर्ज्यन्याने दिवस अधीक लागले याजकरिता दसरियाच्या दिवसी येऊन पोहोचले नाहीत चिखलामुले साडणीचा निभाव लौकर न जाहाला सेवसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ६६

| | | |
|---|---|---|
| र न ८८ | श्री | ता ६ डिसेंबर १७८४ |
| फा. न १४ | | पौ छ ४ सफर |
| पत्र न २४ | | सन खमस समानीन |
| | | पौषमास |

श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागायत छ २२ [illegible]

जे आपण योजिल्या वेलेस निघणार परंतु निघण्यापुर्वी येक दिवस घरात उभयताची या प्रकारची स्थीत जाहाली आहे हे पाहात असता निघून बाहीर जाता तेव्हा बाहीर गेल्यावर जाणेच पुढे जाहाल्यास उत्तम आहे. जर करिता दुखण्यामुले विकल्पता यास जाहाली म्हणजे माघारे येणे लागेल. तेव्हा बाहीर निघून मागती माघारे यावे हे ठीक नाही, व दुखणाईत मुलें नूतन ज्वर आले आहेत. यास पाहून बाहीर मुहूर्ताप्राने जावे हेही उतम नाही. याजकरिता आजचा मुहूर्त आहे याजवर निघून जाऊ नये. क्चिीत उतार उभयतास जाहाल्यावर निघून जावे म्हणजे चागले आहे. याप्रमाणे सर्वानी सागितले त्याजवरून पचमीचा मुहूर्त निघावयाचा करार करून ठेविला असता सिधीस पोहोचला नाही. दुसरे दिवसी षष्टीस राजश्री सेनासाहेबसुभा याचे पुत्र राजश्री परसोजी भोसले यास ज्वर बहूत आला त्याणी ज्वरामुले निद्रा केली म्हणून धुरधर पाहावयास गेले तेव्हा ज्वराचा मोठा उत्कर्ष, मूल लाहान, असह्य ज्वर आला. याजमुले बलावयासही सामर्थ्य राहिले नाही त्याच्या ज्वरामुले सर्वासच घरात व बाहिरल्यास श्रम जाहाले आहेत उपाय करावयाचे ते दैवी, मानवी, करीत आहेत. ईश्वर आरोग्यता करील काही दिवस शरीरपिडा आहे तोपर्येत श्रम होतील म्हणून जोतिषी व वैद्य याणी सागितले आहे पचमीचा मुहूर्त निघण्यास पाहिला होता तो सिधीस पावला नाही आषाढमासी निघाले असता पुढे जाणे जाहाले नाही याजमुले धुरधर चितात खिन्नता धरून राहिले आहेत. याउपरी सर्वांस आरोग्यता होऊन मुहूर्त कोणता निघावयास योजितील तो लिहून पाठवीन. मार्गसीर्ष मासापासून दोन वेल मुहूर्ताने बाहीर निघाले असता पुढें जाणे न होता माघारे हवेलीस येणे जाहाले येक दोन मुहूर्त पाहिले असता निघणे जाले नाही अडथले येऊन पडले धुरधर याचे मानस येण्याविसी उत्कठीत बहूत आहे निघून येण्याची गोष्ट योजिली असता सिधीस जात नाही सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ६५

| | | |
|---|---|---|
| रु. नं ८८ | श्री | ता ६ आक्टोबर १७८४ |
| फा. न १४ | | पौ छ ५ जिल्हेज, सन |
| पत्र न. ९६ | | खमस समानिन |
| | | कार्तिकमास |

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना



येथील कुशल तागायत छ २० जिलकाद यथास्थित असे विशेष राजश्री सेनाधुरधर दसरियाच्या दिवसी मुहुर्तेंकरून डेरियास जाऊन, यका कोसावर सिताबरडीजवल जाऊन राहिले आहेत. पर्ज्यन्य नित्य येक वेल येत आहे. उटाचा कारखाना गावेलीजवल येथून असी कोसावर छावणीस आहे तेथून आणावयास माणसे पाठविली आहेत परंतु पावसामुलें मार्गी चिखल भारी जाहाला आहे याजकरिता उटाचा निभाव पडत नाहीं. दाहापाच उट चिखलात जाया जाहाले म्हणून माणसे सागत आली. चालसा कोसावर उट येऊन राहिले नदीस पाणी पूर आहे उटाचा कारखाना आल्यावर कूच करणार उटास यावयास पर्ज्यन्य उघडल्यास आठ दिवस पाहिजेत इतकियात दिपवाली समीप आली आहे सहजात उटाकरिता व पावसामुले याच मुकामी दिपवाली करावी लागेल उपरातिक पावसाची उघाडी जाहाल्यावर कूच करून वराडात जातील उमरावतीस गेल्यावर येतेगामजग व आणिखी जागीरदार याचा काय पडावयाचा असेल तो उरकून निघतील. यास काय (दिवस) लागले तर लागतील दसरियाचे पोशाख स्वामींनी पाठविले ते छ १३ तारखेस येऊन पोहोचले, त्यानतर धुरधरास वर्तमान सागतले, दिनशुधी पाहून पोशाख घेऊ म्हणून उतर सागितले. छ १९ तारखेस सध्याकाली दिवसास दरबार करून बसले तेव्हा पोशाख नेऊन दिल्हे ते सर्वानी अगीकारून साहा घटिकापर्येत अगावर पोशाख घेऊन पाच खासे व राजश्री भवानी काली यैसे बसले होते साहा घटिका रात्रीस निरोप घेऊन घरास आलो पोशाख घेऊन परम सतोपास पावले. पत्रे वाचून पाहून चिटनविस याच्या स्वाधीन केली आहेत याची उतरे घेऊन सुतरस्वार जोडी बा मागाहून रवाना करून देतो. सुतरस्वारास यावयास मार्गी पर्ज्यन्याने दिवस अधीक लागले याजकरिता दसरियाच्या दिवसी येऊन पोहोचले नाहीत चिखलामुले साडणीचा निभाव लौकर न जाहाला. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ६६

| | | |
|---|---|---|
| रु न ८८ | श्री | ता. ६ डिसेंबर १७८४ |
| फा न १४ | | पौ. छ. ४ सफर |
| पत्र न २४ | | सन खमस समानीन |
| | | पौषमास |

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी सेवक सदासीव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २२ मोहरम मुकाम पा नादगावदर्वे नजिक

रवानगी करून आपण पुढे लाखनवाड्याकडे चालणार. येथील गुत्यास काय दिवस लागतील तितकाच गुता आहे म्हणून पेशजी विनती याच तलावरून लिहिली आहे. त्यावरून विदीत असेल त्याउपर सलाबतखान व बहलोलखान व ज्यानअलीखान धुरधर आल्यावर तीन दिवसानी आले. त्या दिवसापासून बोलणीच परस्परे होत गेली. त्याउपर परस्परे ठरावही जाहाला जे सुदामत चालीप्रमाणें दोहीकडील मामलेदार याणी अमल करावा. नवीन कोणीही करू नये. याप्रो सिधात जाहाल्यावर परस्परे डेरीयास जाणे, वस्त्रे जवाहीर घोडे हत्ती देणे जाहाले. ज्यानअलीखान अलजपुरास निरोप घेऊन जाणार इतर्कीयात तीन च्यार हजार पेढारी याचा जमाव पा पचगव्हाण येथे चालून येउन कसबा लुटून पस्त केला. सावकार मारले. घरे खणून पैका नेला. बहुता दिवसाची वस्ती आबाद व मातबर सावकार व ग्रहस्त व उदमी व रयत नादत होते. बायकाची आगावरील वस्त्रे काढून घेतली. दीड दिवस मुकाम करून राहिले. स्वस्थपणें गाबातील मालीयत वरील व सुर्मातील घरच्या धण्यास बेअब्रुरू करून ठिकाण लाउन काढून घेऊन गेले. नतर गाववाल्यानी लस्करात वर्तमान सागून पाठविले. त्यावरून धुरधरानी फौज आपली पाच हजार व सलाबतखान व बहलोलखान हजार दीड विटलपत सुभेदार दोन अडीच हजार येसे पाठविले. लस्करातून पचगव्हाण पचवीस कोस फौज दुसरे दिवसी पोहचली. तो पेढारी अगोधर तीन दिवस निघून गेले त्याचा साठ कोस अतर पडला चागदेवास पोहचल्याची पेढारी याची बातनी आली. त्याच्या मागे फौज पाठवावी तर सरकारचे महाल सारा खानदेश प्रात आहे. फौजेने खराबा होईल. सडी फौज गेल्यावर गावगना मार्गाने व जेथे राहातील तेथे उपसर्ग लागेल जी जाहाली ती गोष्ट होऊन गेली पेढारी कोठे राहातात याचा पताही लागला नाही. याजकरिता फौज माघारें आणिली पेढारी याणी माणसे जीवे मारली, लुट दाहा लक्षास अधीक नेली याप्रो वर्तमान गावकरी याणी सागितले फौज माघारे आल्यावर ज्यानअलीखान काल कूच करून निघून अलजपुरीकडे गेले हशमतजग याउपरी येणार आहे, त्याजकडील कारभारी आले होते जग आल्यावर त्याच्या कारभारास तीन च्यार दिवस लागतील. इतकाच बाहेरील गुता आहे. सौ. चिमाबाई यास नागपुरास रवाना करावी या अर्थे मुहूर्तेंकरून वद्य प्रतिपदेस लस्कराबाहीर जवल डेरे देऊन उतरविली आहेत हशमतजग याचा गुता उरकल्यावर नागपुरच्या रवानगीस दोन च्यार दिवस लागतील मग गुता दिसत नाही. जाण्याची जलदी म्हणून कामे निकडीने उरकीत आहेत. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ६९

रु न ८८ **श्री** १७८४
फा न १४
पत्र न १९३

सेवेसी विज्ञापना येतेशामजग यास मोयनुदौला याणी पत्र पाठविले जे हजरत पतप्रधान याच्या भेटीस जाणार आहेत. त्या वेलेस तुम्हास बलाऊन हारोली सागावी याप्रमाणे आम्ही निश्चयात आणिले आहे. याजकरिता तुम्ही आपली जमीयतसुधा तयारीत असावें. इनायतनामा हजरतीचा येईल त्यावेलेस सरजामसुधा येऊन सागतील ती चाकरी बजाऊन दाखवावी. म्हणजे तुम्हास हजरत सर्फराज करितील त्या वेलेस तुमचा पहिला जागीरीचा मुलूक आहे तो तुम्हास देवू याजकरिता बुराणुदौला अलजपुरकर निर्मलेस होते त्यास हुजूर बलऊन घेतले आहेत अलजपुरचे मागील हिसेबाचे काम त्याजकडील चालीस लाविले आहे. तुम्हास कलावे तुमच्या कामाची आम्हास जरूर आहे म्हणून पत्र लिहिले आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ७०

रु न ८८ **श्री** १७८४
फा. न १४
पत्र न. १५

सेवेसी सा. नमस्कार विज्ञापना. नवाब निजामआलीखान बहादर यास किचीत समाधान नव्हते त्यास समाधान होऊन आरोग्य स्नान केलें हे वर्तमान यास कळलियाउपरी येयून राजश्री सेनासाहेबसुभा याणी नवाबास सतोषाचें जवाहीर व वस्त्रे पाठविली. त्यात येक पोशाख व येक कारचोपी व काही सणगे बगाली येकून च्यार पोशाख व सिरपेच व जिगा हे दोन दागिने याप्रमाणे हैद्राबादेस पाठवून दिले आहेत. पाऊन उतरे आली नाहीत उतरें आल्याउपरी सेवेसी लिहिन शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

राजश्री सेनासाहेबसुभा आहेत ते विल्हे लावितील. केवल महबूबखान यास येण्यास दिवसगत लागली म्हणून अटकून धुरधर राहातात ऐसे नाहीं, लौकरीच येवून कुच करून निघतील असे आहे शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ७३

रु. न. ६२ श्री ता. १७ फेब्रुवारी १७८५
फा न ८
पत्र न ८७

सेवेसी विज्ञापना तागायत छ ७ रबिलाखर गुरुवार प्रहर दिवस पहिला मुकाम जेजुरी. येथास्थित असे विशेष स्वामींनी सुतरस्वारासमागमे राजश्री सेनाधुरधर यास व सेवकास पत्रे पाठविली तीं पावलीं. धुरधर आज कुच करून लोणीनजीक नदीवर मुकामास येतात कूच जाहाले भोजनास खासा मात्र राहिले आहेत जातील. फौज व बुनगे तिकडून येवताहून त्या मुकामास आणविले आहे तेथेच येकत्र मुकाम होईल मजला व राजश्री बलवतराव यास शेवेसी जावे म्हणून सागितले त्यावरून उभयता येत असो सविस्तर चरणाजवळ निवेदन करीन शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ७४

रु न. ८८ श्री ऑगस्ट
फा. न १४ पहिला पधरवडा
पत्र नं १७१ १७८५

सेवेसी विज्ञापना राजश्री बलवतराव व भवानीपत मुनसी याणी येऊन स्वामींजवळ विनती होलकराच्या मेजमानीच्या समई राजश्री तात्यानी यावें म्हणून विनती केली तेव्हा त्यास आज्ञा जाहाली जे तात्या श्रीमताच्या स्वारीसमागमे गेले. राजश्री दाजीबा अथवा बाबा येयील मेजमानी उरकून घेणें खाली दिवस जाऊ न देणें त्यावरून उभयता मजकडे येउन सागून लस्करात गेले. राजश्री सेनाधुरधर यास आज्ञेप्रमाणें वर्तमान सागितले. त्याणी मान्य करून राजश्री मन्याबापूस होलकराकडे मेजमानीस येण्याच्या आमत्रणाकरिता पाठविले आहेत. मजकडे चिठी पाठविली आहे. दाजीबानी अगर बाबानी अगोधर दोन घटिका त्याच्या आले पाहिजे. यास्तव तुम्ही विनती करून याप्रो करावें त्यावरून विनती लिहिली आहे. उभयतातून ज्यास आज्ञा करावयाची असेल त्यास आज्ञा होऊन होलकर आल्यापूर्वी दोन घटिका धुरधर याच्या डेरीयास जाणे घडावे म्हणजे न्यून पडणार नाहीं. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ७५

श्री ता १६ मे १७८५

रु न ८८
फा. न. १४
पत्र न. १८५

सेवेसी विज्ञापना तागायत छ ६ रजब यथास्थित असे विशेष. राजश्री सेनाधुरधर याजकडील बातिमीचे वर्तमान काल सध्याकाली आले सोमवारी सध्याकाली लस्करात येणार म्हणून लस्करवाल्याचे पत्र आले खाशाचे नाहीं आज येतील म्हणून कारभारीही म्हणत आहेत वराडात रा विठल बलाल सुभेदार च्यार हजार फौजेनिसी सुरजीअजण-गावानजिक होते. महबूबखान बिलदखानाचा लेक स्वार व पायदल मिलून तीन हजार आकोटास होता, त्याणें राजश्री सेनासाहेबसुभा याजकडील कामाविसदार आकोटच्या गावात राहात होता त्याच्या वाड्यावर चालून घेऊन चालीस माणूस कापून काढीले. कमावीसदार जखमी निघून गेला हे वर्तमान विठल बलाल यास कललियावर मुकामाहून फौजसुधा आकोटाकडे गेले तीन कोस आलीकडे मुकाम करून राहिले. महबूबखान यास वर्तमान कललीयावर चालून जमीयतसुधा आले सुभेदार तयार होऊन गेले उभे राहिले. त्याणी चालून घेऊन जग केली तेव्हा त्याणी तरवार धरली महबूबखान याचा मोड जाहाला चालीस पनास त्याचे माणूस ठार जाहालें. महबूबखानाचे डोचकें कापून याणी आणिलें सापडले ते मारले घोडी हती निशाण नौबत याणी लुटींत आणिली याजकडील दाहापधरा ठार व जखमी पनास साठ जाहाले. याप्रमाणे वर्तमान वराडातून पत्रे धुरधर याजकडे आली तीं काल त्याणी येथें पाठवून दिल्ही. वराडात जागीरदाराचा कलह याप्रमाणे जाहाला आहे. पुढें याचा परिणाम कोठपर्यंत लाब जाईल हे कलत नाहीं आले वर्तमान विनती लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

भेटी घ्या करीवणार आहेत. मजला धुरधर याणी सागितले जे, खडेराव केवटा माणूस लौकिकाचा त्याच्या लेकाची अशी दशा जाहाली आहे. त्याचे बोलणे याप्रो आहे. आम्हास त्याणी सागून पा तेव्हा आम्ही अव्हेर करावा असे नाही. याजकरिता आम्ही घ्या आणिल्यास तेथे भेट घेतील किंवा नाहीं? याजवर रोश करावयाचें कारण काय आहे मजला समजले नाही. लिहून पाठवून उतर आणऊन सागेन म्हणून उतर केले आहे, यास्तव विनती लिा. आहे. धुरधर याणी आपल्या समागमे मुरारराव यास आणून स्वामीची भेट केली तर कार्यास येईल किंवा नाही? धुरधर जाधवावीसी काही बोलत नाहीत याजवर कृपा करून सेवा घ्यावी इतकेच म्हणतील असे आहे. येविसीचे उतर येईल त्या प्रो धुरधर यास सांगेन. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ७९

रु. न ८८ श्री ता. १६ नोवेंबर १७८८
फा. न. १४
पत्र न २३

श्रीमत राजश्री पतप्रधान स्वामींचे सेवेसी विनती सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम तागायत छ. १७ माहे सफर स्वामींच्या कृपेकरून यथास्थित असे विशेष. स्वामींची आज्ञा घेऊन निघाल्यावर छ. २४ माहे मजकुरी येथे येऊन पोहोचलो. दुसरे दिवसी कुयोग होता. तिसरे दिवसी छ. २६ रोजी राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा व राजश्री खडोजी भोसले सेनाबहादर व राजश्री व्यकोजी भोसले याची भेट जाहाली. सरकार आज्ञेप्रमाणे त्रिवर्गास मातमपोशीचे शेले पाघरीवले त्या उपर गगाजलनिर्मल चिमाबाई व कमलजाबाई याची वस्त्रें वाड्यात जाऊन प्रविष्ट केली. त्यासमई मुधोजी भोसले यांच्या गेल्याचें स्मरण होऊन खिनतेस सर्वत्र पावले त्यासमई ईश्वरी सत्ता प्रमाण, होणार होतच आहे, तुम्ही विवेकी आहा, तुमच्या ठाई लोभ आहे इत्यादिक समाधानाच्या गोष्टी सरकारआज्ञेच्या आहेत म्हणून सागितल्यावर सतोषास पाऊन बोलले, आम्हास सर्व प्रकारें साभाळणार श्रीमत आहेत हें उतर करून बहुत सतोषास पावले शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ८०

रु. न. ८८ श्री ता. १६ नोवेंबर १७८८
फा. न. १४ पौ. छ ३० सफर, तिसा
पत्र न. ३३ समानिन

श्रीमत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी—

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञा-(पना) येथील कुशल तागायत छ १७ सफर मुकाम नागपूर स्वामींच्या कृपेकरून यथास्थित असे विशेष. स्वामींची आज्ञा घेऊन निघाल्यापासून पावसामुळे व शरीरप्रकृतीमुळे पाचसात मुकाम मार्गी दोचौ जागा जाहाले छ २४ मोहरमी येथे येऊन पोहचलो. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब-सुभा व राजश्री खडोजी भोसले सेनाबहादर व राजश्री व्यकोजी भोसले यांची भेट छ २६ मोहरमी जाहाली. (त्रुटित)

## ८१

रु. न ८८ श्री ता. १२ जानेवारी १७८९
फा. न. १४ पौ. छ ३० रबिलाखर
पत्र न १२६ तिसा समानीन.

श्रीमत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी सेवक सादसिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ. १५ रबिलाखर स्वामींच्या कृपावलोकनेंकरून येथास्थित असे विशेष राजश्री रघोजी भोसले सेना-साहेबसुभा याणी स्वामींच्या भेटीस यावयाचा उद्योग करून पौष वद्यात मुहूर्त निघावयाचा पाहिला आहे म्हणून विनती पेशजी लिहिली आहे, त्यापासून निघ-ण्याची तरतूद होत होती काल पौष वद्य प्रतिपदेस इदुवारी दाहा घटिका दिवसास प्रात:कालच्या मुहूर्ते पाहिला होता त्यावेलेस सेनासाहेबसुभा याणीं प्रस्थान करून डेरीयास सिताबरडीजवळ वाड्यापासून येका कोसावर जाऊन राहिले आहेत कारभारीयापैकी रा पाडुरग गणेश व कुशाबा चिटणीस जाऊन राहिले आहेत रा. भवानीपत मुनसी पचमीस निघणार. वरकड कोणी येणार ते दोचौ दिवसात निघतील. राजश्री व्यकोजी भोसले यास नागपुरी ठेविले मुतालकिची सिकेकटार त्याच्या स्वाधीन केली राजश्री खडोजी भोसले

उपाय काय? आम्ही चाकर, ती धणी आहेत. आमचे आईकत नाहीत याप्रमाणें पुढे बोलणार आनदीबाई याचे आईकत नाहीं. यशवतराव तेथे गेले आहेत, त्यासी सरलपणा नाहीं. जमीदार व कमाविसदार येशवतराव याजकडे पाठवीत नाहीं. धोंडोपत व महमदखान दोघे नागपुरास जाऊन अटकले असे आनदीबाईस समजले आहे व दोघाचे आतून लिहिलेंही, आम्ही अटकलो, असे गेले आहे येशवतराव यास लग्नाकरिता माघारें बलावणे गेले होते त्याच्या कामावर महिपतराव दिनकर येथून पाठविले होते, त्यास येथून जावयास दिवसगत लागली. इतकियात येशवतराव रतनपुरास आनदीबाईजवल जाऊन पोहोचले, मागून महिपतराव गेले ते तोफा व गारदी व लोक हजार दीडपर्यंत मागे राहिले होते त्यास समागमे घेऊन यशवतराव याजपासून येका मजलीवर अलीकडे पोहचले. रतनपुरास पोहोचून पत्रे त्याची आली नाहीत. रतनपुरास पोहोचल्यावर आनदीबाईचे करणे व याचे करणे लिहून येईल त्याप्रमाणे विनती लिहीन दिलीहून याची बातनीची पत्रे आली त्यात मजकूर गुलाम कादर किल्यात जाऊन बसला होता त्याजवर राजश्री महादजी सिंदे याणीं राणेखान फौज देऊन पाठविले होते, त्याणी किलेबद त्यास करून आपण बाहीर होते मागून अलीबहादर याजबरोबर फौज देऊन राणेखानाकडे पाठविले होते (ते) जाऊन पोहचले त्यापूर्वी येकदोन दिवस गुलाम कादर किल्यातून निघून दाहावीस स्वारानिसी सर्व दौलत व पातशाजादे दिलीचा सरजा(म) नेला होता तो व आपला टाकून पलून गेला. त्याच्यामागे राणेखानानी फौज पाठविली होती. अलिबहादर गेल्यावर हेही मागून त्याच्यामागे गेले ज्या गावी तो, मार्गी याच्या फौजेसी लढाई करून जखमी होऊन जाऊन राहिला होता, त्या गावी यास सापडला. त्याजबरोबर आणिखी दाहापाच होते त्यासुधा धरून कैद केला. ज्या किल्यातून पलून गेला तेथे घोडी पाच हजार, हती वीस, तोफा ब्याणव व कापड व जवाहीर व नगदी पैका बहुत यास सापडला त्याजकडील कारभारी व सरदार बहुत दोनतीनसे सापडले ते कैद केले आहेत. गोसगट गुलाम कादराचा होता तो याणी घेतला म्हणून वर्तमान लिहून आले आहे. नवाबाची फौज चिनूरचे ठाणें जमीदाराकडे आहे तो आज्ञेप्रमाणे वर्तणूक करीत नाहीं म्हणून नवाबानी पायदलची फौज २०००० व तोफा २५ ठाणे घ्यावयास पाठविले. त्याणीं मोर्चे लाविले आहेत. बाहीरून उपराला नाहीं. काहीं दिवसानी घेतील. हसामतजग व सलाबतखान व इतर जागिरदार यास पत्रे चेनूरास जावयाविसी नवाबाची आली आहेत. त्याचे काम लागल्यास जातील. इग्रजाकडील मातमपोसीची वस्त्रे यास आली नव्हती. कलकत्याहून इग्रजानी कासीस वस्त्रे व जवाहीर व पोषाख व हती पाा. ते कासीहून सुभ्याने येक काईत व माणसे देऊन येथे वकीलीस इग्रज आहे त्याजकडेस पाठविली, ती येऊन पोहोचल्यावर वसतपचमीच्या दिवसी वकीलाने वस्त्रे व जवाहीर व हती दोन आणून सेनासाहेबसुभा यास प्रविष्ट केली. कटार विलायती येक दिल्ही मकसुदाबादी टाकण अबलक येक दिल्हा टाकण वेणीरामपत वकील याचा आहे त्याणे पाठविला आहे. बगाजी रघुनाथ हैदराबादेकडून येणार आहे वराडात येऊन पोहोचले. सेनासाहेबसुभा पुण्यास येतात यात (शका) राहिली नाहीं. फाल्गुन वद्यात अथवा चैत्र शुधात येऊन पोहचतील. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ८३

| | | |
|---|---|---|
| रु. न ८८ | श्री | ता. २० फेब्रुवारी १७८९ |
| फा न. १४ | | पौ छ ५ जासर, |
| पत्र न १२८ | | तिसा समानिन |

श्रीमत राजश्री नाना स्वामीचे सेवेसी.

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टाग नमस्कार विनती. येथील कुशल तागायत छ २४ जमादिलावल मुकाम वर्धातीर यथास्थित असे विशेष. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेब सुभा याणी माघ वद्य प्रतिपदेस नागपुराजवलून कूच दोन कोसाचे केले. त्या दिवसापासून पर्जन्य नित्य लागतच आहे नागपुरी असताच गारा व पर्जन्य पडावयास लागला. दोन मजली दाहा दाहा कोसाच्या केल्या, बरकट तीन कोस, दोन कोस, च्यार कोस, याप्रमाणे मजली जाहाल्या काहीं पर्जन्याचे कारण, काहीं फौजेच्या देण्याचे कारण मिळून दिवस लागले. समागमे फौज पाच हजार घ्यावयाची नेमणूक केली आहे. लोकास येवज सावकाराकडून देविला आहे त्याच्या पदरी पडल्यावर लोक येतील काहीं यावयास लागले, आठा दिवसात येतील. राजश्री खंडोजी भोसले सेनाखासखेल नागपुराहून वीस कोसपर्यंत आले होते, तेथून निरोप घेऊन छ २० रोजी नागपुरास गेले राजश्री व्यंकोजी भोसले समागमे आहेत ते फाल्गुन शुध १ निरोप घेऊन जाणार आहेत सलाबतखान यास दरबारी पाठविले आहे, ते

श्राद्धाकरता यावें असा मनसबा याचा आहे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ८५

| | | |
|---|---|---|
| रु. न. ८८ | श्री | ता. १३ मार्च १७८९ |
| फा. न १४ | | पौ छ २० जाखर, |
| पत्र न ३१ | | सन तिसा फाल्गुन |

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागायत छ १५ जमादिलाखर प्रातःकालपर्यंत मुकाम करजगाव पा. आवड स्वामींच्या कृपेकरून येथील क्षेम यथास्थित असे विशेष. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यानी वराडातील गुते सारे लाखनवाड्याच्या मुकामी उरकून राजश्री विठलपंत सुभेदार व सलाबतखान यास निरोप देऊन आपण कूच करून आवडापुरास आले. दुसरे दिवसी सेलगावास मुकाम केला. शेलगावकर आटोले समशेरबहादर याचा कारभारी सताजी ढवला त्याजकडे अन्याय बहुत आहेत आटोले यास घेऊन पुढे आला नाहीं. गावाजवळ मुकाम जाहाला असता मेजमानी काहीं दिल्ही नाही याजमुळे त्याजवर राग फार जाला. शेलगावीहून कूच जाहाले तेव्हा पाहाटेस लस्करचे लुगारी यानी गावाबाहीर घरे होती तीं लुटून नेलीं नतर अग्न लाविला, दोनतीनसे घर जळालें, काहीं माणसें व गुरें जळालीं, नाश फार जाला हे वर्तमान कळल्यावर ताकीद करविली, गुरें वस्तवानी बाहिरील लुटलीं गेलीं शेलगावीहून कूच करून वाघराल पो सिंदखेड येथे मुकामास आले त्या गावावर राग भोसले याचा परपरेने चालला आहे. ज्यासमई येणें जाणें होतें तेव्हा गाव लुटतात, याप्रो सुदामत चालत आलें आहे त्याप्रो वाघरालचें जाहालें तेथून काल कूच करून मुकाम मजकुरी आले, आज कूच करून पैठणास गगादक्षणतीरीचा नेमला आहे, उदैक मुकाम पैठणचा शनवारचाच करून रविवारी कूच करून स्वामींच्या भेटीस येत आहेत. भेटीचा मुहूर्त यकादसीस रविवारचा याणीं पाहून ठेविला आहे त्याप्रमाणे घडवितील असे दिसतें. फौज पाच हजार सागतात परंतु तीन हजाराच्या आत आहे, वर दिसत नाहीं. कारखाने व सल्तनत सुधोजी भोसले आले होते त्यावेळेप्रमाणे समागमे नाहीं लस्करास वैरण दररोज पाहिजे. रानात वैरण कोठें नाहीं. कडबे गावाजवळ आणून ठेविले आहेत त्याचा दाणा निघाला नाहीं, कणसे तर्साच आहेत, हरभरे व गहू व जोंधळे गावाजवळ माल जमा करून ठेविला आहे वैरणीकरिता माल लुटला जातो. याप्रो नित्य चाललें आहे. गगा उतरल्यावर सरकार माहाल लागतील. दाणा काढून घेऊन वैरण मोकली जाहाली नाहीं लस्करास तर वैरण लागत्ये. कडब्याखेरीज गवत प्रातात कोठेंही नाहीं यास सागितल्यावर उत्तर करितात आम्ही उपवास करीत जावे की काय, तेव्हा नका म्हणता येत नाहीं गावगनाचे बोभाट स्वामींजवळ येतील याजकरिता विदित असावें म्हणून विनती लिहिली आहे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ८६

| | | |
|---|---|---|
| रु. न ८८ | श्री | ता १४ मार्च १७८९ |
| फा न. १४ | | पौ छ २० जाखर, |
| पत्र न. १२९ | | तिसा समानिन, |
| | | फाल्गुनमास. |

श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसी

सेवक सदाशिव राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ. १६ जमादिलाखर मुकाम पैठण गगादक्षणतीर यथास्थित असे विशेष. राजश्री रघोजी भोसले सेनासाहेबसुभा यांणीं श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांच्या भेटीस यावयाचा निश्चय ठराऊन नागपुराहून निघणें जालें त्या दिवसात स्वामींची पत्रे येऊन पोहचलीं. त्यात मजकूर भेटीस येणें होत आहे येणेंकरून बहुत संतोष जाहला आहे. त्यास पुढे उष्णाचे दिवस येतील याजकरिता येणें अविलंबे घडावें. भेटी लौकर घडाव्या. सिनलाईचे दिवस आहेत हे येण्यास चागले आहेत म्हणून ममतापूर्वक होतीं, तीं पत्रें वाचून पाहिल्यावर सेनासाहेबसुभा मनोपास पाऊन येण्याची त्वरा करून दरमजल चालले वराडातील दोन महिन्याचे काम होतें तें येकीकडे ठेऊन आठनऊ दिवसात जरुरीचे जाबसाल उरकण्यात आले ते उलगडा करून घेतला. बाकी ग(ही)हिला कारभार मामलेदारांचा वगैरे सर्व पुढे आल्यावर करावा याप्रा करून दरमजलानी लांब लांब मजली करून मुकाम मजकुरी काल येऊन पोहोचले. आजचा दिवस येथे मुकाम लस्करीकरिता जाहाला आहे. श्रीमंताच्या व आपल्या भेटीस मुहूर्ताचा दिवस याणीं पाहिला तो फाल्गुन वद्य पंचमी व येकादसी दोन दिवस या महिन्यात आहेत पुढे [illegible]

ब्रम्हखेडे प्रांती मनमानेसा दंगा केला होती वराडांत उतरला मनमानसे रासें प्रांतांत फिरता यावरून रयतेस दहशत पडली आहे तीन हजार पायदळ व पांचसे स्वार. जंगाजवळही गेन तीन हजार गारद व पावशें स्वार ही जमीयेत नबाबांनी नेमून हवल्या सरंजामाशी करून दिल्ही नाहीं व सिवाय सांप्रत तवा हे चाल बाहटपणाची दिसती यास्तव जर सुरळीत चाल दिसल्यास बरेंच आहे, नाहींतर याचा विचार करणें धुरंधरांस प्राप्त आहे आळजा पुरीहून सलाबतखान हे बोलण्यासीही येत आहेत निघून अष्टी करंजपरियंत आले म्हणून वर्तमान आहे त्याचमागमें येथील गळेलेही उमयेतो आहेत. ते येऊन काय बोलतात व कलेल त्याप्रमाण पुढील चाल दिसेल सारांश, पुणियास यावें श्रीमंत रावसाहेबांस पाहावें भेटावें आणि स्वतन्यांची व सरदारांची वाखणीं त्यांचीं, महिनापधरा दिवस एकत्र राहून दाही दौलतीविशीं उचित परिचय आवतील ते बोलण्यांत येऊन घसरून मावासरितां माघार फिरावें पुढे येधासमाशीं मुष्टीचे अम कतव्य आहे यापमाणें मनादमें येथील आहेत सेवास व टन्नाह येण्याची बहुत आहे मध्ये जंगाकडील लग्न आहे याचे वारापाणी चालें म्हणजे दुसरा लग्न नाहीं लवकरच येतात याअन्वये कितेक नारीक माठे अथ रावभी दास लिहितील त्यावरून श्रुत होईल सवेसी श्रुत हाये हे विज्ञापी

## २३८

रु. मं ९९ श्री ता २७ डिसेंबर १७८३
फा नं १ पौ छ ११ सफर
पत्र मं २२

साहेबांस सवेसी आज्ञाधारक मल्हार मोरेश्वर कृतानेक विज्ञापना येथी ज, येथील कुशल ता छ २ माहे सफर पावेतों मुा नागपूर येथ साहेबांचे कृपावलोकनकरून आज्ञाधारकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर यांणीं मार्गशीर्ष वद्य तृतीयेस गुरुवारी मुहूर्तें प्रस्थान करून पुण्यास यावयाकरितां डेरेदाखल जाले हे वर्तमान पत्राची ग पत्रीं सेवेसी विनंति लिहिली आहे आठ दिवस आसमंत तयारीस व पवेशामर्जग याचकडील मजकूर ठरावयास लागणार. दरम्यानपावेतो राजश्री तालचे पतानीं मातमी लिहील्या त्यांत श्रीमंत सरकारच मुहूर्ताचेच निर्वाहेत गंगातिरी करावयाची जाहल्या याम भेगारयाव जावें त्यांस व आगमास शुभापेक्ष आवश्यक हे निश्चय नितांत आणून दुसऱ्या मुहूर्तावर निघावें हें उत्तम म्हणून दुसरा मुहूर्त पौष शुा त्रयोदशीस सोमवारी पाहिला त्या दिवशी निघोन मजल दरमजल यावें म्हणून निश्चयांत आणून छ १० मोहरमीं गुरुवारीं दोन प्रहरा धारुरांत हवेलीस आले त्रयोदशीस निश्चयाप्रमाणें निघावें सलाबतखान येतेथामधग याबकडून बोलण्यास आले त्यांबरल बोलणं जे शाह मिरासुभा ज्याकडी सिवदी दूर करून नवाबांनी नेमणूक करून दिल्याप्रमाणें सिवदी ठेऊन मागील मुख्याप्रमाणें वर्तणूक मामलतीची सुरळीत केली तर आम्हांशी त्याची बनेल नाहींतर बनार नाहीं याप्रमाणें त्यांनांसी बोलून त्यांनांनी पत्रे अगास लिहून पाठविलीं त्यांन हरकडे आल्याउपरी जमानी त्यांन मिर्जा यास येथील करून मिर्जास कैद करून बंदी पाठविली आणि आळज पुरास आमचिला छ २७ मोहरमी सोबदचे मुक्रामीं आला छ २८ रोजी यूगाणावर आला तेथून आळजपूर सात कोस आहे तेथा आळजपुरास पोहोंचल्या असेल. परंतु सिवदी सारी जंगाबवल आली आहे व जंगाचीहि आहे पुढे जा काय मनसुबा करितां हरकील आय त्यांनांनी लिहीले आहेत त्याचीं उत्तर काये लिहीता हे कलेल तो पावेतो त्यांन ठेऊन घेतले आहेत सुरळीत मान्य करून उत्तरें आल्यास उत्तमच चालें न मान्य केल्यास श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा फौजसुधा येथें आहेत प्रसंग दिसेल तैसे करितील आपन न गुंतवा निश्चयाप्रमाणें यावें मैसें बोलणीमांत आहे व राजश्री मल्हारावजी यांसही येदर्थी धुरंधरानीं पत्र लिहीलें आहे. या विठल मल्हार सुभेदार प्रांत वराड हे वडगांवावर आहेत व बहुलखान मान्यावर आहेत राजश्री धांडभटबाबा यास धुरंधरानीं निरोप दिल्हा ते अर्नाथास गले वरकड कितेक आहाम मोठ अथ राजश्री छत्रसिंघपतहादांनी लिहीले आहेत, यावरून श्रुत होईल सेवेसी श्रुत हाये हे विज्ञप्ति

## २३९

रु. मं. ९९ श्री ता ४ जाने. १७८४
फा. नं १
पत्र मं. २५५

साहेबांस सवेसी विज्ञप्ति येथीज श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर यांनीं प्रथमतः मुहूर्तेंकरून डेरे दाखल जाले, आगखी निश्चिन्त्य नितांत आणून दुसऱ्या मुहूर्तानें जाव येत ठरून हवेलीस आले त्या मुहूर्तावर यात ता आधीन लिहीं याचे

राजश्री सदाशिवपतदादास बलाव्हून नेऊन सागू लागले जे, उदईक बाहेर निघावयाचा दिवस आहे परतु हसमतजंग च्यारपाच हजार फौजेनिसी व तोफानीसी उभा आहे, मागून आजमदौला तीन च्यार हजार फौजेनिसी येतो त्यामुले सेलगावकर वगैरे परागदा जाले आहेत. आलजपुरी येतेशामजग याजवल आटव्हा हजार जमाव, याप्रमाणें मोगलाई फौजा तयार आहेत आलजपुरकराचा भरोसा येत नाही याजमुले निघता येत नाही यैसे बोलले त्यावरून दादानी उत्तर दिल्हे जे, मोगलाई जागीरदार नवे आले नाहींत, पहिलेच आहेत, आपल्या जागिरीचा बदोबस्त करितात, तुमचे आमलास खलेल करीत नाहीत, तुम्ही त्याचे भय मानू नये, जर करिता तुम्ही हेच मोठे भये करून टाकविले आणि राहिला तर तुमचा लौकिक चागला नाही साह महिणे तुम्ही पुण्यास येतो म्हणोन पत्रे लिहिता. मुहूर्ताने निघाला तो मुहूर्त चागला नाही म्हणून दुसरा पाहून घरास आला, आता जागीरदाराचे निमित्य पुढे करिता यास काय म्हणावे? तुम्हास जाणे नव्हते तर पुण्यास आजपरीयत पत्रे कशास लिहिली व मुहुर्ताने बाहेर कशास निघाला? जागीरदाराच्याने तुमचे काही होत नाही. तुम्ही पुण्यास चालावे मागे सेनासाहेबसुभा आहेत जागीरदारानी तुमच्या अमलास गडबड केली तर पाहून घेतील तुम्हासी मोगलाई फौजा बिघडतील, तेव्हा नवाबाचा बिघाड स्वराज्यासी अर्थात जाला, तेव्हा पुण्यात श्रीमत आहेत, उगेच राहणार नाहीत ह्या गोष्टी आणखी प्रकारे दोन प्रहर बोलत होते परतु त्याच्या मनास आले नाही. राहवयाचाच निश्चये त्यानी केला. मग दादा उठून घरास आले. दादानी बोलावयास आलस केला नाही सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति.

## २४०

| | | |
|---|---|---|
| रु. न. ९६ | श्री | ता. ५ जानेवारी १७८४ |
| फा. न १ | | पौ छ २७ सफर |
| पत्र न. २६३ | | पौष मास सन आर्बा समानीन |

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञापना येथील कुशल ता छ ११ माहे सफरपावेतो मु॥ नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकनेंकरून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. श्रीमत राजश्री सेनाधुरधर यानी सूमुहूर्ते आगप्रस्ताने मार्गसीर्ष वद्य तृतीयेस डेरेदाखल जाले होते. तेच दिवसी श्रीमत राजश्री दादासाहेब श्रीगगातीरी कैलासवासी जाले. श्रीमत माहाराज राजश्री रावसाहेब याचे भेटीस जाणें. प्रथम भेट. तेव्हा उभयपक्षी शुभदायक आसावे यैसा सकेत घेऊन ज्योतिसी बोलाऊन दुसरा मुहूर्त पौष शु॥ त्रयोदसीचा नेमस्त करून डेरेदाखल पौष शु॥ २ गुरुवारी हवेलीस आले. पुढे पौष शु॥ त्रयोदसीस मुहूर्ते करून डेरेदाखल होऊन मजल दरमजल निघोन पुणीयास जावे तो आर्थ राजश्री बलवतरावजी यासहि धुरधुरानी लिहीला होता, तोहि साहेबाचे सेवेसी श्रुत जाला आसेल व राजश्री सदासीवपतदादा यानी व म्या सेवेसी विज्ञाप्ति लिहीली होती, त्यावरून श्रुत जाले आसेल आलीकडे पौष शु॥ १२ द्वादसी रविवारी च्यार घटिका दिवस राहिला ते वेलेपासून प्रहर रात्रापरियत धुरधर मुछदीयास घेऊन जुने हवेलीत नजरबागाचे खोलीत मसलहतीस बैसले आणि न जाण्याचे आर्थाचे सकेत मुछदीयासी बोल् लागले जे, वराडात आलजपुरी येतेशामजग व शाहा मिर्जा हे जमियेतीनसी आहेत व हसमतजग दोन हजार फौजेनिसी आमडापुरावर आहे. त्याणी कन्हाडेची गढी घेतली व आणखीहि वराडप्रार्ती तीन गढ्या घेतल्या व मिरजुमला औरगाबादचा सुभा हा जाफराबादेवर आला आहे. सेलगावकराच्या पारपत्यास नबाबानी पाठविले आहेत. यैसी बातमीचीं पत्रे येऊ लागली. येक जगाकडील वसवास मात्र होता तो हशमतजग व आजमतदौला वगैरे चहूकडून उपाधीस कारणेच दिसतात. नेव्हा आपण पुणीयास गेल्याउपरी मागे कसा प्रसग पडेल हे न कले, सव्यस्तब्ध जाण्याचा योग घडवावा तरी नबाबाकडील फौजेचा प्रसर पुढे पडला आहे याचा उलगडा सत्वर कसा होतो आणि पुणीयास जाणें कसे घडतें याजआर्थी सध्या जाणे . . च्यार महिन्यानतर जावे यैसे आपले ठाई निश्चयात आणून व कारभारी यासी बोलून निश्चय ठरऊन प्रस्तुत राहाणे जाले आणखी मुछदीयासी म्हणों लागले जे, हे मी बोललों या आन्वई पत्रे राजश्री नानास व राजश्री तात्यास लिहून याची प्रत्योत्तरें तुम्हास आणऊन देतो यैसी मुछदीयासी बोलून राहाण्याचाच निश्चय ठरऊन जाण्याचा योग राहविला त्यावरून या करिन्यात व बोलण्यात प्रकार दिसून आला जे, प्रस्तुत येणे महकूब केलें याच आर्थीचा कितेक मजकूर राजश्री दादानी सेवेसी लिहीला आहे त्यावरून सर्व-निवेदनात येईल. आजपावेतो जैसी मसलत करीत गेले आणि बोलत गेले तैसे सेवेसी विज्ञाप्ति लिहित गेलो. सध्याचा प्रकार कलला तो सविस्तर लिहीला आहे. सलाबतखान आलज

पुरीहून घोडम्यासाठीं आले आहेत त्यास आद्यापि मामलेदारसंमधीं वासलात उरकले नाहीत खानमखूर मागत आहेत येहि निरोप सत्वरच देणार जें घडेल तें मागाहून विज्ञाप्ति लिहिणीयांत येईल राजश्री मल्हाराप्पा साहेब यांच्या उरल्या दाटेच्या खाली गल्यास सुज येऊन मोहनाळदेखील आटपल्या च्यार दिवस जास्त होता कळ्या घाऊन करते रूप दिले व पोटांत आपधांचा उपाय केल्यास आठ दिवस बहुत श्रमी जाले, परंतु सध्या उपशम जाला निःशप आद्यापि जाले नाहीं परंतु निःशप होईल भरोसा वाटत आहे. राजश्री गोविंदराव मुगुटराव व राजश्री व्यंकटराव काशी यांस वस्त्रें देऊन उभयेतास वस्तरचे राज्याकडेस रवानगी केली त्यांजसमागमें हजार दीड हजार परियंत फौज देणार आहेत त्यांजकडील कारभारी मुरली म्हणान आहे तो व रानी उभयेता येथें नागपुरीं आहेत त्यांसहि वस्त्रें दिल्हीं व राज्यासहि मारनिलेकराकर वस्त्रें पाठविली आहेत त्यांतील आथ हाच कीं, राजे तुम्हाकडील जैसे आहेत तैसे करून यावी आणि जमावबाबा हुकूम आपला असावा या शाभनास्तव पाठवीत आहेत वरकड विशेष आथ राजश्री दादांनी लिहिली आहेत त्यावरून श्रुत होईल सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति

## २४१

क. नं ११ श्री ता १ फेब्रुवारी १७८४
फा. न १ पौष २८ रविवार
पत्र नं ११२

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरप कृतानेक विज्ञापना येसी जे येथील कुशल ता छ ११ माहे रावल पावेतों मुा नागपूर येथें साहेबांचें कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर यांनीं सुमुहूर्तें करून बाहेर डेरेदाखल जाले आणि पश्चात संकेत भरून दुसरा मुहूर्त नेमस्त करून मागती शहरांत हवेलींत दाखल जाले दुसऱ्या मुहूर्तावर निघावे याचा परिहार तपशील शहाण्याचा पेशोजी पत्रीं लिहिला आहे, तो सेवेसी श्रुत जाला असेल शहाण्याचे अर्थाची पत्रें साहेबांस व श्रीमंत राजश्री दादा यांस व राजश्री यशवंतरावजी यांस विस्तारें करून धुरंधर यांनी पाठविलीं आहेत श्रुत होतील म्हणून मागील पत्रांत म्यां लिहिलें होतें ती विस्तारपत्रें छ ११ मिनहूल रवाना जाली आहेत. सेवेसी श्रुत होतील राजश्री येसवंतराव मशानी छ ७ सफरीं हैदराबादेहून नवाबाचा निरोप घेऊन निघाले म्हणून बातमीस लिहिलें होतें त्यास मारनिले आद्यापि येथें आले नाहीत राजश्री व्यंकोजी भोसले यांस नवाबानी मनसब जागीर देण्याचे अर्थ राजश्री भवानी रघुनाथ यांसी बोलले आहेत त्याप्रमाणें येशवंतराव येथें आल्यावर काय ठरणें ते ठरेल नंतर मागाहून सेवेसी लिहिणीयांत येईल नगरसी रघुनाथ यांजकडील पत्रें अलीकडे आली नाहींत राजश्री गोविंदराव मुगुटराव या समागमे फौज देऊन वस्तराकडेस पाठविताव वस्त्रें देऊन निरोप दिल्हा आहे आठा च्यो रोशनी निजगार. येथेघामबरा आसफपुरी सिवाखुषा चमियेतीनसी आहेत सलामतखान येथें आले होते आसफपुरास गले हे मागील पत्रीं लिहिलेंच आहे ते आसफपुरास पोहोचले असतील परंतु जाते वेळेस धुरंधरांनी मामलेदारसंमधी वगैरे जाबसाल जमास लावण्याविसी खान याश सांगितलें होतें तो जाबसाल मोकळे होऊन तेथून पत्रें आली नाहीत इसमतखा दोन आडीच हजार फौजेनिसी करंजगावावर आला आहे आवसुदौला औरंगाबादचा सुभा यांनीं फौज व तोफा सेलगांवास पाठविल्या म्हणून आयाळे यांनीं सेलगांव वगैरे प्रांत उज्याड करून दिल्हा ऐशा बातम्या येथें आल्या आहेत राजश्री विठल बल्लाळ सुभेदार प्रांत वराड हे तीन च्यार हजार फौजेनिसी कुमाकर आहेत राजश्री भवानी काळो यास करवपावेतो फौज समागम देऊन पाठवावे म्हणून डेरेदाखल जाले होते तो त्यांची सून राजश्री माधवराव यांची स्त्री त्यास शरीरी आजार होऊन देवआज्ञा जाली म्हणोन मागती गांवांत आले माठपरीहि आपली पाठवावें ही यत्ना व माळम्यांत आहे घडेल तैसे लिहिणीयात येईल. विशेष खबर मोठे आर्थ राजश्री सदाशिवपंतदादा यांनीं लिहिले आहेत त्यावरून श्रुत होईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति

## २४२

क. म ११ श्री ता १ मार्च १७८५
फा. नं १
पत्र नं ११९

पौ छ २ जमावल सन आमा समानीन चत्र मास

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घरपे कृतानेक विज्ञापना येसीजे यथील क्षेम ता छ ११ रबिलाखरपावेतों मुा नागपुर येथ साहेबांचे कृपावलोकनें करून आज्ञा

भारकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष. साहेबानी छ १५ रबिलावलचे व १६ रबिलावलचे पत्र पाठविले ते छ २७ रबिलावली उतम समई पावोन मस्तकी वदण करून सतोष जाला. यैसेच सेवकास त्यायास आज्ञा जाली पाहिजे. यानतर इकडील वर्तमान तर श्रीमत राजश्री सेनाधुरधर याणी पुण्यास येण्याविसी सतत च्यार महिणे उद्योग करून इकडील बदोबस्त करीत असता सबटास हा कालवर गेले नाहीत. मध्यंतरी काम दिवस पाहून लग्नाच्या साहित्याचे किरकोल चालीस लाविले होते. इमारतीचे कारखाने तर चालतच आहेत त्यातच मटपाचे स्तभ व जागा नीट करविली. कदाचित वैशाखपर्यंत दिवस लागतच चालले तर लग्नाचे कार्य सपादून जावयास येईल ही योजना होती त्यास तेथे साहेबास समजले जे, धुरधराचे येणे होत नाहीं उद्योग इकडे येण्याचा दाखवितात आणि घराऊ लग्नाची वगैर कामे चालवितात हे समजावणारानी समजवले. त्यावरून साहेबास सत्य भासून रावजीजवल बोलण्यात आणिले. त्यावरून बलवतरावजीनी येथे दोन च्यार वेला लिहिले जे, येथे समजण्यात यैसे आलें आहे, त्यास आपण आल्याने श्रीमतास बहुत सतोष व न येण्यात लोकाचे सागणे खरे पडतें. यास्तव यावयाचेच करावे म्हणून लिहिले व उदाजी जासूदही मुजरद पाठविला. त्याणेही येऊन हेच सागितले. त्यावरून इकडील लग्नदेखील सर्व कार्ये राहून आधी पुण्यास जावे हा निश्चय केला आहे. कधी निघतात हे तथ्य समजल्याउपरी सेवेसी विनति श्रुत होईल तूर्त जावे हा निश्चय केला आहे. तेथील मर्जी चागली राखावी यात सर्व कामे आहे हे धुरधराचे मानस आहे. फाल्गुन शुद्ध येकादसीस मुहूर्त पाहिला होता त्यास हुताशनी समीप पुढे आसता निघणे आसोनच देसमत निघाले त्यावरून तो मुहूर्त राहिला. दुसरा निश्चयात येईल तो सेवेसी लिहीण व येथून नवाबास व मौनुदौला यास पत्र गेले आहेत जे, बगाजीपतास इकडे पाठवून द्यावे व बगाजीपतासही लिहिलें आहे जे, नवाबाचा निरोप घेऊन इकडे येणे येथे आल्याउपरी जागिरीचें व कितेक बोलणें बोलण्यात येतील व फाल्गुन शुध आष्टमीस धुरधरानी रग खेलायाचा मुहूर्त केला केसरी रग करून भट व उपाधे व शास्त्री व मछुदीमडली व सरदारलोक यैसे बोलावून बैठक करून धुरधरानी स्वहस्ते करून सर्वत्रावर रग टाकून दोन घटिका नाचरग केला आता नित्य चालले आहे छ १२ रबिलाखरी श्रीमत राजश्री सेनाधुरधर व श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा व श्रीमत राजश्री सेनाबहादर व राजश्री मनाबापुसाहेब व बरोबर काहीं मछुदी मडली व सरदार लोक यैसे सकरदऱ्याचे बागात गेले. तेथें जाऊन, बगल्यात बसून, दोन घटिका नाचरग करून, सध्याकाली वाटेन गुलाल खेलत हावलीस आले व दुसर रोजीहि त्याप्राच केला व श्रीकासीहून सावकारी बात आली जे, राजश्री पाटीलबावा याजवल इग्रजाचा वकील इद्रशेन होता तो इमाजुदौला याजकडे कलकत्यास गेला आहे दोल्यास घेऊन श्रीकासीस यावे आनि पाटीलबावाची व त्याची त्याची भेट होणार आहे म्हणून बातमी आली. व बालाबाई श्रीकासीचे यात्रेस गेल्या होत्या त्या यात्रा करून येत आहेत. पचमीपावेतो येतील म्हणून बातमी आली आहे यानी येथून स्वाराची डाक देवगडावरून नरमदापावेतो बसविली आहे. राजश्री भवानीपत मुनसी याचे कण्यास देवआज्ञा जाली म्हणून धुरधर सेनासाहेबसुभा छ १२ राखरी मुसीचे घरी गेले होते. दोन घटिका बसून समाधानाच्या गोष्टी सागून हावेलीस आले. वरकडे बारीक मोठे अर्थ राजश्री सदासिवपतदादानी लिहिले आहेत त्याजवरून सेवेसी श्रुत होईल. सेवेसी श्रुत होवे हे विज्ञप्ति.

## २४३

रु. न. ९६ **श्री** ता. १७ मार्च १७८४

फा. न. १

पत्र न. ९८

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक विज्ञाप्ति यैसी जे. येथील क्षेम ता छ २४ राखर पावेतो मु॥ नागपूर येथे साहेबाचें कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित आसे विशेष. साहेबीं छ ४ रालाखरचें पत्र पाठविले तें उतमसमई पाऊन सिरी वदण केले. यैसेच सेवकास त्याहा [वया] स आज्ञा केली पाहिजे. यानतर श्रीमत राजश्री सेनाधुरधर यानी पुण्यास जावयाचा उद्योग केला आसता जाने न जाहले. जागीरदाराचे लढे पडले. बाहेर निघोन गेले. माघारे हावेलीस आले त्यावरून साहेबास सवस्वये भासोन राजश्री बलवतरावजी याजवल बोलण्यात आले, त्यावरून बलवतराव यानी सेनाधुरधर यास लिहीण्यात दोन च्यार वेला आनिले जे, न यण्यामुळें येथील मर्जी बहुत दिक आहे. त्यावरून धुरधर यानी जागिरदाराचे गुते येकीकडे ठेऊन व श्रीरामनवमीचा उछह समीप आसता व पुढें वैशाख मासीं लग्नकार्याची योजना होती तेहि ठेऊन आधीं तिकडे येण्यास मुहूर्त निश्चयात आणून

नित्य येक दिवस लस्करामध्ये काही गडबड लाहान जाहली नाही बहुत समाधान करून उभयपक्षी निश्चय समारंभाने घालवीले याप्रमाणे त्यांजकडे लिहीत गेले याउपरी पुढे काय मसलत आखिर्लास त्याप्रा कलमिशीवर सेवेसी श्रुत होईल गोविंदराव भुगुंटराव हजार वारसे स्वार घेऊन बस्तारच्या मुलखांत माहीम करून तिकडील बंदोबस्त करून मुलूक साटपावयास गेले होते बस्तरची राणीहि समागमे गली होती त्यास त्या प्रांतातील गढी होती तेथ मोर्चे लाविले होते गढीवाल्यांनी मारामार केली त्या वेळेस मामले लक्ष्मी यांची जाहाली त्याउपरी यांणी गढीवर हल्ला केला तेव्हा गढीवाल्यांनी हल्ला मारून काढिली त्या वेळेस यांजकडील मानसे चाळीस पना[स] ठार जाहाली गोविंदराव याच्या भाच्या दहास गोळी लागली पोटास फाटून गली व्यंकटराव यांसी पायासहि दगड कपाळावर लागला नामोहरम होऊन माघार फिरून आले फौजेचे लोक कांही नागपुरास फिरून आले त्यासे यावयाचे आहेत येतील. निकडील मसलत त्यास होत नाही बस्तरचे राज व मुलूक डोंगराचा विकट पामच्छप्ये काम आहे फौजेचा खर्च निभाव नाही याप्रा आहे येतेशामखा याणे बराडप्रांती सरकारचे आपले गाव जप्त वगैरे निमे आमल आहे तेथ गांवास उपद्रव देऊन स्वारी बहुत केली आहे रा येशवंतराव नाईक निंबाळकर देशीहून आल्यापावेतो आले तथ रा विठलपंत मुजुमदार याने व सलावतखानाने आणविले नागपुरास येऊ दिल्ही नाहीत निंबाळकराचे मध्यस्त येथ भिकाजी पवार व श्यामराव सैनापथ होत तरि धुरंधरांनी त्यांजकडे पाठविले आहेत परंतु त्यांजकडून बातमी आली नाही निंबाळकर देशी जातील, आमरावतीपावेतो गेले अद्यापवर नाहीं सेनाधुरंधर यांस साहेबाकडील गटगनर राजश्री गंगाधरपंत टार्गोनी आपल्या घरी आणून जेवण घालून पायास बिरद. यजमानास पोषाख व मानास रात्रीस गटगनर करून त्यांचा आदर श्रीमंतांचा व साहेबांचा व तालावाहद्योरदर्जा व गंगाधरपंतांनी आपले वस्त्र यांस घेऊन गेले तथ मोठ्यांत आदर केले व यतशामजंगाकडील वकील आले आहेत माल-मामलतीच बोलणे चालत आहेत रा रा रामचंद्रपंत दस्तदतखानाकडून येत आहेत मग काय ठरेल ते सेवेसी श्रुत होईल बारीक मोठे आप राजश्री सदाशिवपंत यांचे पत्रावरून सेवेसी श्रुत होईल यवसी श्रुत होये र निर्पास

## २५०

रु. न ९१ श्री ता २१ मे १७८४
फा न १
पत्र न २४१

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बरवे कृतानेक विज्ञापना येसी जे येथील क्षेम ता ९ माहे रबलावेलपावेतो मु॥ नागपूर येथें साहेबांचें कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष इकडील वर्तमान तर लग्नाचा समारंभ मोठाच जाहला समारम होऊन वराडीचे दिवसी येसुनाबाई सुसुरे करून आपले घरास गेल्या तथे दोन च्यार दिवस राहून इकडून श्रीमंत राजश्री सेनासाहेब सुभा मोहित्यांचे घरी गेले त्यांस आमत्रन सांगून समागमें राजश्री रनसिंगराव व भैरसिंगराव व सोमाजीराव व बया वगैरे वराडी सर्व घेऊन हवेलीस आले त्यांस भोजन घालून सरवत्रास आपआपले रिवाज्याने वस्त्रें दिल्हीं विडे घेऊन आपले घरास गेले त्यानंतर मोहित्यांनीहि यांस मेजवानी केली श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा व श्रीमंत राजश्री सेनाबाहादर व राजश्री मनाजीपूसाहेब व खास मानकरी लोक च्यार पांचस येसे मोहित्यांचे घरी जाऊन भोजनें करून आले मसुरीमंडळीहि बरोबर गेले होते तिकडून येतान संध्याकाळीं शुक्रवारतल्यात आतषबाजी चांदणी मंगल व राक्षस व फिरंगी व माडी व सावनी वगैरे चीन चीनावचे सोडून प्रहर रात्रीं हवेलीस आले येसे आतषबाजी उत्साहाचे समाप्ती मुद्यालीतच आहेत व श्रीमंत रा बिंबाजीबावा भोसले लग्नास आले होते लग्नकार्य संपादून त्यांनी छतीसगडास जावयास छ ४ रजबी सध्याकाळीं निरोप घेतला श्रीमंत राजश्री सेनाधुरंधरांनीं त्यांस वस्त्रें सेल्यपागोटें पैरणी उंची व किनखाप व मलमल व सिरपेंच व दोन कर्णी बहावाची येणे प्रा दिल्हे. सिवाय बाळपणापासून पाळण्यापासून बिंबाजीबावाचे खियास व पुत्रास काय देतील ते पाहावे ते पाच्या, सात्ता दिवसा कूच करून जातील. रा यशवंतराव नाईक निंबाळकर देशीहून वाढोन धामधूम करीत इकडे येत होते त्यास वराडप्रांती राजश्री विठलराव सुभेदार येविनामजंग यांनी अटक करून ठेविले होते निंबाळकर तेथून माघारा फिरून गेले विठलपंत बराडप्रांतीच आहेत त्यासहि सेनाधुरंधरांनी नागपुरास बोलाविले आहेत जे, गोपाळराव फडनवीस यांजकडे वेदभास्कर जाहली तुम्हांजवळ मातबर कारभारी कोन्ही नाही माल मामलतीचा बंदोबस्त काय करावा म्हणून बोलाविले आहेत

[illegible] वेऊन [illegible] आहे [illegible] जागा नेत्राचे [illegible] दिला आहे. तेथे पोरानकून मामार आले. [illegible] नतर दुसरे दिवसी चिटनवीस मार्तंडजे हवेलीत येऊन धुरधराची भेट घेतली. धुरधराना नानाप्रकारे आदर उपचार केला. धुरधरांनी म्हटले जे, दास कार्य सरंजाम लागल तो याग याचा व गा नरानीपत आबा याचे पुत्र माधवराव यांची वी मागली होती. त्याचे दुसरे लग्नास दादा सासराचे तळे-गावास गेले आहेत. समागमे सरंजाम पोक्ता नेला आहे. यानतर चिटनवीस मार्तंडजे याचे लग्न जेष्ट शु॥ नवमीस लागले लग्नात सेनाधुरधर व सेनासाहेबसुभा व सेनाबाहादर व मनाबापू व मल्हुटी येस गेले होत. लग्न लाऊन च्यार घटका बसून नतर हवेलीस आले व राजश्री गजाराम मकुंद सहकुटुंब लग्नास आले होते. ते कूच करून कटकास जावयास दो को[सा]वर जाऊन राहिले आहेत. त्यानी धुरधराचा निरोप आद्याप घेतला नाही धुरधर व सेना-साहेबसुभा व सेनाबाहादर व मनाबापू ऐसे पतमारनिलेच्या डेऱ्यास गेले होते च्यार घटका बसून त्यानी दोनसे मोहारा नजर केली. नतर हवेलीस आले. मल्हुटी कोन्ही बरोबर

[illegible] नसेत व बहुत दिवस रा॥ बगाजी रघुनाथ याजकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाही. साहेबाचे सेवेसी श्रुत होणे हे विज्ञाप्ति.

## २५१

र न ०६ श्री ता. जून १७८४
फा. न. १ पहिला आठवडा
पत्र न. १०३

धुरधरांचे साहेबांचे सेवेसी रा॥ लक्ष्मणराव चिटनिस यांचे लग्न मालारियाहून येत रा॥ महिपतराव दिनकर याचे पत्र येत होते. त्यास महिपतराव धुरधराजवळ वाटेचे पत्र मागत होते जे, वाटेत मुलखीत येत. तर धुरधर पत्र देईनात. त्यावरून महिपतरायानी त्यास लिहून पाठविले जे, मुलीस समाधान वाटत नाही तुम्ही न यावे लासणवाडापावेतो आलेत तरी माघारे जावे व राजश्री जिवाजी महादेव याची घोडी व शिलेदार येत आहे. त्यास सदाशिवपतदादानी नरानीपत मुनर्शीस विचारिले जे जिवबा नाना याची घोडी देसी लाऊन यावी बरोबर जासूद जोडी देऊन लासणवाटा पार करून यावे त्यावरून मुनर्शीनी धुरधरास विचारिले त्यांनी म्हटले जे लावा. जासूदजोडीहि समागमे देतो सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

## २५२

स न. ०६ श्री ता २३ जून १७८४
फा न १
पत्र न. ३४०

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक विज्ञप्ति येसीजे. येथील क्षेम ता॥ छ ४ साबान पावेतो मु॥ नागपुर येथे साहेबाचे कृपावलोकन करून आज्ञाधारकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. इकडील वर्तमान तर श्रीमत राजश्री सेनाधुरधर याणी वैशाखमासी लग्न केले वेशाख मास लग्नातच गेला. जेष्ठमासी निघावे ही योजना केली. वद्य दशमी मुहूर्त येक व आषाढ शुद्ध तृतीयेचा येक ऐसे दोन मुहूर्त पाहून ठेविले होते त्यावर राजश्री बिंबाजीबावा भोसले याची रवानगी जेष्ठ वद्य ५ स केली. त्यास पोहचावयास धुरधर सहकुटुंब कोसपर्यंत जाऊन त्यास

निरोप देऊन माघारे आले त्याउपरी जेष्ठ वद्य दशमीस मुहूर्त होता म्हणून प्रात काळी ठोन घटिका रात्री मुहुर्ताने डेरा बाहीर दिल्हा प्रस्थान तरवार व आंगठी ठेविली दुसऱ्या मुहूर्तावर द्वितीयेस निघावे ऐसा सिद्धांत केला होता त्यास दशमीच्याच दिवसी तिसरे प्रहरीं श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा यांची स्त्री प्रसूत जाहाली कन्या जाहाली सबब सुची आटी याजकरिता(ता) द्वितीयेचा मुहूर्त शुद्धीच्या दाहा दिवसांत आला तो कामाचा नाही ऐसे जाहालें यामुळे द्वितीयेस पुण्यास भावयाकरितां निघणार होते ते राहिले याउपरी दुसरा मुहूर्त पाहून निघावे याचा निश्चये करितील तो कळल्यावर सेवेसी श्रुत होईल व यां निघणार होते ते राहिल राजश्री रघोजीपंत यांचा कारभार फडकऱ्या मामलतीचा होत आहे व राजश्री महादजीबाबा सिंदे गाहदेशजवळच आहेत इमादुदौला ल्खनाऊस मिर्जा आमानीसमवेत आहेत सिंदे यांच्या व इंग्रजांच्या भेटी होणार होत्या म्हणून वर्तमान मागें होतें परंतु हा काळवर भेटी जाल्या नाहीत व पुढे भेटी परस्पर त्यांच्या होतील ऐसे नाही व गडामंडल्याकडील वर्तमान आले आहेत जे राजश्री माधवराव यांनी जाऊन चौऱ्यागडास मोरचे लावून चौऱ्या घतला नरहरशास्त्री व गंगागीर गोसावी व पाठवणीन वगैरे करून महालपास घेऊन येत आहेत गंगागिरीच्या पायात बेडया आहेत त्यास मारतील ऐसे दिसते श्रीमंत महाराज राजश्री रायसाहेब यांचे पुण्यप्रताप करून चौऱ्याचाही बंदोबस्त जाहाला व मोतेगिरी महंत हिंदुस्थानाहून येथे दा। तीं हजार जमावानसी आले आहेत त्यास धुरंधरांनी चाकर ठेवून राजश्रीमयापतांबरोबर कटकाकडे लावीत आहेत त्याबरोबर सामान चानाच्या कच्या चाळीस पंनास हत्तीवर व कांही उपटि मेळून लाख-खर्चाची आणल्यारी आहेत पंतप्रधानीलें जातील तदहा गावावीही जातील व राजश्री आपाजी गोपाळ गणपतीचा मुभा गणपतीस गेले आहेत त्यास राजश्री भगाजी रघुनाथ यांनी धुरंधरांस पत्रे लिहिलें आहेत जे, आपाजी गोपाळास पांडऱ्यांच्या फडशाविसी नबाब बोलवीत आहेत त्यास पाठवून द्यावे पांडऱ्यांचा फडशा येथे नबाबाच्या हातें होईल. त्यावरून धुरंधरांनी आपाजी गोपाळांस पत्र पाठविले जे, सपनाथा लाग्नांनसी नबाबा कडे जावें आणि वगैरे यांचा हुकूम पाहून यावे म्हणून पत्र गेलें आहेत याबरून पंतप्रधानीलें जातील किंवा नाही तें पाहावे व गावल्याकडचास किल्लेदार परमानसिंग समास आले होते जाम छ २७ रजबी पत्र दिल्हे ते येथून दो दिवसी निरोप घेऊन जातील व राजश्री विठलपंत सुभेदार आठा दाहा दिवसी वराडप्रांती जाणार आहेत त्याबरोबर दाहा तोफा गायेकवाडास पाठवणार आहेत पंतप्रधानीलें वेरागांवापावेतो घेऊन जातील. तेथून किल्लेदार घेऊन जातील व राजश्री माहादजीबाबा सिंदे यांचे लष्करांतून राजश्री सदासिवरावजी यांचे पत्र धुरंधरास आलें जे, मीर आसफदौला वजीर यांच्या व इमादुदौला यांच्या भेटी होऊन लखनऊस दोघे आहेत त्यास दिलीहून शाहाजादा इत्येक माहाण्यानी तेथून निघाले हे वर्तमान वजीरास व हिस्टीन साहेबास कळल्यावर उभयता पुढे शाहाजादीयास आणावयास जाऊन भेट घेऊन नजर गुजरली नंतर शाहाजादीयासुद्धां लखनऊस आले ऐसे वर्तमान आलें आहेत व रा विठलपंत सुभेदार यांनी लग्नांत गडबनेर केले नव्हते म्हणून जेष्ठ वद्य नवमीस धुरंधरांस सहकुटुंबसुद्धां मेजवानी केली सरपाव पोशाख दिल्हे व सैंधर मोहरा नजर केली व दशमीचे दिवसीं रा सिवरामपंत यांनी मेजवानी केली त्यांनीही वस्त्रें दिल्हें तेथे सौ बाईसाहेब व सेनाबहादर गेले नव्हते व सेनाधुरंधर व त्रिंबकपुत्रासुद्धां छ २१ रजबी पाटनसांगवीस पागा पाहावयास गेले होते तेथे जाऊन पागा पाहून तेथल्या कमाविसदाराने मेजवानी केली नंतर तिकडून येतांना सिकार खेळत आले येकवीस हरणे मारून छ ४ साबानीं नागपुरास आले बारीक माठे वर्तमान राजश्री सदासिवपंत दादांचे पत्रांवरून सेवेसी श्रुत होईल सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ति

## २५३

| | | |
|---|---|---|
| रु. न ९६ | श्री | ता १० जुलई १७८४ |
| रूा. नं १ | | पौ छ १२ रमजान |
| पत्र नं २० | | सन खमस समानीन |
| | | आषाढमास |

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बरप कृतानेक विज्ञापना येसीजे येथील क्षेम ता। छ २८ साबान पावेतो मु॥ नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकने करून आज्ञाधारकाचें वर्तमान येथास्थीत असे विशेष साहेबांनी छ १५ रजबचें पत्र कृपा करून पाठविलें तें उत्तमसमई पाऊन मस्तकी वंदन करून चित्तास बहुत संतोष जाहला यानंतर इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर यांणी

पुण्यास यावयाकरिता मुहुर्त आषाढ वद्य ७ सप्तमीचा पाहिला होता. त्या दिवसी मुहूर्त करून प्रा:थकाली तेरा घटिका दिवस आल्यानतर बाहेर निघून गलाजवल डेरे दाखल जाहले डेऱ्यात जाऊन बैठक मारून बसले मछुदी मडली व साहुसावकारानी नेजरा केल्या. नतर लोकास निरोप देऊन लोक आपलाले घरास गेले. दुसरे दिवसी कूच करून सितावरडीपलीकडे जाऊन राहिले. दौचौ दिवसी निघून पुढें जावे ही योजना होती. त्यास मुहूर्ताच्या अगोधर श्रीमत राजश्री सेनाबहादर यास ज्वर बहुत येत होता, परतु ते बरे जाहाले. त्याउपरी राजश्री व्यकोजी भोसले यास आषाढ वद्य पचमीस ज्वर आला तो उतरलाच नाही. दोन लघने केली तथापि उतरला नाही ऐसे असता मुहूर्ताच्या दिवसी धुरधर निघून बाहीर गेले. तैसेच दर मजल जावे परतु व्यकोजी भोसले यास समागमे पुणियास घेऊन जावे हा विचार आधीपासूनच करारात आला होता याजकरिता आरोग्यता जाहाली म्हणजे समागमेच घेऊन जावे, दोन दिवसात ज्वर उतरेल म्हणून मार्ग पाहात राहिले, त्यास दिवसे दिवस ज्वराने चढच धरिला आहे. न्यूनता नाही तेणेकरून शरीरास विकलता मोठी व आगास घाम रात्रदिवस फार येऊ लागला त्यासी मर्यादा नाही. घाम येत असता ज्वर न्यून व्हावा तो न होच. प्रथम दिवसी ज्वर आला आहे तो सार्वकाल तैसाच आहे. तृतीय प्रहरापूर्वी दिवसास ज्वर आणखी येतो तो न्यूनता पावतो परतु पहिला ज्वर निघत नाही. याजमुलें भ्रम पडतो. ज्वरामुले वोकारी करिते. आन जात नाही तेणेकरून रविवारीं फार बाबरे जाले. त्या दिवसी गाई बैलाचें व घोड्याचें वगैरे क्षुल्क दानही दिल्हे. रविवारी रात्रौ सेनाधुरधर घरास त्याच्या परामर्षाकरिता आले घटिकाभर बसून परामर्ष करून पुन्हा डेरियास गेले दुसरें दिवशीं भोजेनासहि दोन प्रहरा दिवसास आले. मागती साईकाली डेरियास राहावयास गेले त्याप्रमाणे वर्तमान आहे. निघण्याचा सरजाम वरचेवर करीत आहे नागपचमीचे दिवसीं निघावे ऐसेही बोलण्यात आल होते मग काय घडेल ते पाहावे. व्यकोजी भोसले याचा ज्वर आठदहा दिवसी उतरेल ऐसे श्रीमानबावा वैद्य याणी धुरधर यास सागितलें आहे. निघावयाचा आग्रह तर मोठाच दिसतो. काय विचार करितील हें कलत नाही. पुढें जैसे घडेल तैसे सेवेसी श्रुत होईल. व राजश्री बलवतरावजी याचे येथे लग्नाचे गडगनेर जाहालें न होतें म्हणून छ ८ साबानी धुरधरास सहकुटुंबसुधा मेजवानी केली. त्रिवर्ग पुत्रासुधे चौघास च्यार पोशाख सेले पागोटी जैनाबादी व मलमल केसरी व किनखाप येक येक व बालासाहेबास तासाचा पोशाख व बायास चोली लुगडी येणे प्रमाणें दिल्हे मछुदी मडली आवघे आले होते. छ ६ रोजी रा उमाजी माहादेव यानी मेजवानी केली. त्यानीही पैठनी पोशाख सरवत्रास दिल्हे. व बालासाहेबास तासाचा पोशाख दिल्हा. व इस्वनाथ जोशी यानीही मेजवानी केली. सरवत्रास वस्त्रे दिल्हे व छ २२ साबानी रा माहादाजीपत नाना यानी मेजवानी केली धुरधर डेरीयाहून भोजनास आले होते. पत मारनिलेनीही पुत्रासुधे वस्त्रे दिल्हे यैसेच कोन्ही गडगनेरापासून राहिले होते. तितक्यानी मेजवाणी केली व राजश्री राजाराम मकुद कटकचा सुभा यास छ १६ साबानी निरोप दिल्हा. वस्त्रे व मोत्याची कठी व सिरपेच व हाती व घोडा येणप्रा दिल्हे व मजू चौधरी यासही येणे (प्रों) चौकडाच दिल्हा. त्यानी धुरधरास व श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा यास व सेनाबहादर मनाबापूसाहेब यास दा
कूच करून कटकास जातीस व राजश्री व्यकटरावजी नि॥ होलकर चिरजीवाचे लग्न करावयास घरास गेले होते ते लग्न करून आले. धुरधराची भेटी घेतली व वा॥ राजश्री सिद्‌भट ठकार यानी सातान्याहून कारकुणाबरोबर सेनाधुरधरास लग्नाचा अहेर, सेला पागोटे व चोल्खण दोन व लुगडीं दोन पाठविले आहेत व येहेतीशामजग व सलाबतखान व बलोलखान यानीही लग्नाचा आहेर राजश्री रामचद्र दादूबरोबर पाठविला तो छ २६ साबानीं पावला. व गाईलगडाहून रा गोविद दादू याचें पत्र येथे आले जे, साताविस गावातील सिरसगाव आहे यासी जफरतदौला याणीं जाऊन त्याची याची झटपट होऊन दौल्याने सिरसगाव घेतला तिथला कमावीसदार काढून त्यानें आपलें ठानें बसविले म्हणून वर्तमान आले आहे. सविस्तर बारीक मोठे अर्थ राजश्री सदाशिवपतदादाचे पत्रावरून सेवेसी श्रुत होईल. सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञापी

## २५४

| | | |
|---|---|---|
| रु. न ९६ | श्री | जुलै १७८४ |
| फा. न. १ | | दुसरा पधरवडा |
| पत्र न. १६० | | |

पुरवणी साहेबाचे सेवेसी विज्ञापि यैसी जे. सेनाधुरधर द्वा[द]सीस बुधवारी डेरीयाहून हावेलीस भोजनास आले. तेव्हा समागमे देवहि घेऊन आले ते नेहमीच

हापेठीत यऊन राहिले नामसंवत्सरीचा दिवस निघावयास पाहिला आहे. परंतु त्या दिवशीं निघणार नाहीत जोसी याच्या सांगण्यात आहे तेव्हा निघणार नाहीत हाच निश्चय पुढे मनत्य दिवशीं निघतील तो विचार जाहल्या प्रमाणें सेवेसी भुत हाइल व्यंकोजी भोसले यांस ज्वराची पीडा होती तीहि दूर हात चालली आहे. आता दिवसी आराम्यता चांगली होईल सेवेही श्रुत होइ हे विज्ञापि

## २५५

र. नं ०१ श्री १७८४

फा. न १

पत्र न ४१६

पुरवणी साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वारपे कृतानेक विज्ञापना येसीजे येथे सायकांपासून पटी करून येवज घ्यावा यसे ठरले आहे म्हाटी पत्राजी सेवेसी विनंति लिहिलीच आहे. त्यास प्रथम राजश्री माधाजी नाईक वाले यास श्रवनून आणिले आणि मजकूर सांगितला त्याणी विनंति फ्ती की गेन च्यार वर्षे महागता पडली त्यामुळे धर्ममध्यें हवाल राहिला नाही आम्ही सवप्रकार हाजर आहो घर आहे सवश्री साहेबाचे आहा आज्ञा जाहाली की ही याल्णी याल नयेत आपण पहिलेपासून नगरनाईक, याजकरिता सांगावे आमच्या चितास येइल तसे करू त्यावरून नाईक याणी विनंति केली की उत्तम आहे नाईक याणी सेवून घ्यावे तरी सरकारच्या भागाच्य पिर्ह आहे तव्हां मन पाहणे जरूर. त्यास कोणाच्या स्त्रिया उदीम व घरच स्त्रिवी हे कांहीं पाहणे नाही, मन मानेसारिखे आग भादन ब्राह्मण व शूद्र हे कांहीं मनास न आणिता हाममार व ग्याह मसलतवरी देऊन आमच्या त्यावून माहमारी करून मसज घत आहेत, पटत धुम मचली आहे. मारवाडर व दुन्या व बनड व काले व गडकरी यवू करून धर्मीच्यारर येकच गर्ग जाहली आहे कितेक आसाम्या पळाल्या आहेत व याच अन्वये चंद्रपुर व पवनी मानारे वगर प्रांतातील सावकार व उदीम यांस धरून आणून पैसा घ्यावा हीच नजर संप्रत आहे म्याणी मगाशी ग्वदरशी करावी यस तर माणुस दिसत नाही यद राजश्री भवानी काळा याणी येक आसामीची रदबदल पटी आजा जाहली मी आपण धालू नये त्यावरून तही आपले गिराशी विस्मत करून आहेत आसामीयांची माहितगारी करून देण्यास मुख्य भासल्य जाल्य आहे तो व कांहीसा पिदड़ी आहेतच त्याची दारोगिरी राजश्री सिवराम हरी व राजश्री व्यंकोजी भासले नि।। पौलत्ताना याजकडे आहे आस पाळणे ता ता त्यास पाळितात, तशीच मात्र उभयेतानी करावी याचा हाकुमा जाहला आहे पुढे काये होईल ते पाहावे लोकाच्या बोलण्यात येते की, इतके दिवस राजेयास जाहले परंतु ही गाष्ट जाहली नवती कैलासवासी जानाजी भोसले याणी पटी करून घतली ती रयतीचे सोल्लीने घतली व राजश्री चालजीपत फडणीस बराडात आहेत तेही हाच उद्योग करणार म्हणोन वर्तमान आहे सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञाप्ति

## २५६

र. न ९१ श्री ता १२ जानेवारी १७८१

फा न १

पत्र नं ४१ -५१

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वारपे सां दंडवत विज्ञापना येसी जे साहेबांचे कृपेकरून सेवकाचे वर्तमान येथारियत असे विशेष भीमंत सेनाधुरंधर सड म्होउन दरमजल आले याचा तपशीलवार मजकूर पत्रीं लहून सेवसी पाठविण्यांत आला हाली भीमंत सेनासाहेब यांनी मजल येक दिवस ठेऊन घतले याविसीचे बोलणे जाहाले आहे ते समक्ष विनंती करावयाची आहे. सेवेसी येऊन पोचल्यावरी विनंती करीन त्यानंतर परमसड घाभूलगावचे मुक्कामास सेनाधुरंधर याजवल पोचलो त्यास छ ११ रोजी भेटी जाहाल्या त्यास सौरंपथ धाकसाहेब व सेना बहादर व परसोजीबावा व यमुनाबाई आधी करून राजश्री मन्याबापू येक कोस पुढे सामोरे येऊन छ मजकुरी भेटी घतल्या गेन प्रहर दिवसा जाहाल्या त्याजवर आम्ही मंडळीसहीत मुक्कामास आलो त्याजवर रात्री सेनाधुरंधर याणी यवान विचार केला की फौज यावयासी दिवसगत लागती याजकरितां आपण दरमजल जाऊन भीमंत नाना व साल्यासी भट घ्यावी येसी मसलत जाहालीयावरी भीमंत सौभाग्यसंपन्न चारसाहेब व रा सेनाबहादर व परसोजी बावा मौजे घाभूळगांवचे मुक्कामी राहिले फौज दरमजल आल्यावरी फौजेत मिळून निशाण व फौज घेऊन सेनाबहादर याणी पुरपुराव यावें हा मजकूर जाहाल्या वरी छ १२ रोजी कूच करून मौजे सांगोंवास मुक्काम

जाहाला. सेनाधुरधर व मन्यात्रापूसाहेब यैसे उभयेता दरमजल येत आहेत बरोबरी फौज तीन हाजार आहे. व हती तेरा व आबाऱ्या दोन व मुडा हवदा येक मजल दरमजल येत आहेत. कालचा शनवारचा मुकाम कदरचा आज आठ कोसाचा मुकाम करकमचा सोमवारी पढरपूरी येणार आहेत. याजविसीची पत्रे सेनाधुरधर याचे पत्र रा. तात्यास गेले आहे. शनवारी आपण याजपासी निरोप मागोन साहेबाचे भेटीस येत होतो त्यास ते बोलले की आज उद्या जाउ नका. सोमवारी जाणेच आहे. राजश्री भवानीपत मुनसी सेनासाहेबसुभा याजपासी आहेत त्याजकडे जलद पत्र गेले आहे की दोनसे स्वारानिसी लाब लाब मजली करून येणे. दुसरें साहेबाकडील तीलगूल घेऊन जासूद आले त्यासी पुसिले त्यावरून त्याणी सागितले की सोमवारी कूच होणार आहे. त्याजवरून आपण विनती केली मग सेनाधुरधर बोलले की आम्ही समीफ आलों, भेट जाहाल्याखेरीज कूच करणार नाही यैसे तात्यास त्याणी लिा आहे. बहूत काये लिहीणे हे विज्ञापना

## २५७

रु न ९६ **श्रीव्यंकटेश**
फा न. १ ता २३ जानेवारी १७८६
पत्र न ४५९

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक विज्ञापना यैसी जे. आज सोमवारी अडीच प्रहर दिवसानी मोईनदौलाची स्वारी नमुद जाली त्यास राजश्री वेंकोजी भोसले आबारीत बसोन मागे येशवतराव भवानीशकर खवासीत, आगाढीस नगारखान्यापावेतो गेले. परस्परें हतीवरून सलाम रामराम जाला सेनाधुरधर कचेरीचे डेरीया पो चिमणाबापूसहीत सामोरा येऊन दुसरे दरज्यात क्षणेक मोईनदौलासुधा समस्त मडली बसली, नतर मोईनदौलाचे पुत्र उभयेता व वेंकोजी भोसले वगैरे तिसरे दरज्यात आले तेथें परसोजी भोसले व गुज्याबा गुजर कृष्णाजी मोहिते याची भेट करविली. त्यास मोईनदौलानी इशारा रघुपतराव वकील याजकडे केला. त्याणी उठोन सेनाधुरधराचे काणात सागितलें की, दिवस थोडका राहिला. खलबतीस चलावें. त्याजवरून चादणीखाली फर्श होता तेथे मोईनदौला सेनाधुरधर व चिमणाबापू उठोन गेले मागाहून मुनसी व यशवतराव भवानीशकर, बगाजी रघुनाथ यासी बोलाविले. बोलणे दोन घटका बरीक जाले. -नतर वराडप्रकर्णी तलेगाव वगैरे प्रारभ जाला. मुनसीजी बोलत होते. सेनाधुरधरही बोलत होते त्यासमई जागीरदार बहलोलखान व सैद रजा वगैरे याजला तिसरे दरज्यात बोलाविले वराडचे बोलण्यात फतेआलीखानाकडील बोलणे की काय चिता आहे जें करणे ते पके घडले हेही बोलणें जालें नतर वस्त्रे कारचोवी व शालजोडी, कासीचा सफेद कीनखाब, आमदाबादी दुपटा, कठी मोत्याची, सिरपेच, जिगा मोईनदौलास. त्याचे वडील पुत्रास वस्त्रे, सिरपेच, जीगा, धाकटे पुत्रास वस्त्रे, सिरपेच व रायरायाचे उभयेता पुत्रास वस्त्रे व येक येक सिरपेच व रघुपतराव वकील याजला साडे तीन वस्त्रे दिल्हे. मुनसीजीनी पैठणी काही सनगे घ्यावी म्हणोन आक्षेप केला. परतु सेनाधुरधराचे मर्जीस आले नाही बोलण्याचे प्रकर्णी येहतीशामजगाचेही बोलणें काहींक जाले दुरोन ऐकत होतो साहा घटका दिवस राहताना माघारे गेले. मीच सेवेसी येत होतों, तो सेनाधुरधरानी आज्ञा केली की, सध्या जाल्यानतर मुनसीजी श्रीमत नानाकडे जात आहेत. सविस्तर सागतील तेव्हा तुम्हीही जावें त्यास मीही मुनसींचे समागमे सेवेसी येतो. नवाबाकडील डाल्या पाच खारबूज आगूर नींबाच्या आल्यात हे विज्ञाप्ति.

## २५८

रु. न. ९६ **श्री** ता १७ फेब्र १७८६
फा. न. १
पत्र न. ४५५

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञापना यैसी जे, येथील क्षेम तागाईत छ १७ शुक्रवार रात्र दाहा घटका माहे रबीलाखर मुकाम नजीक सुरापूर येथे साहेबाचें कृपावलोकने आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित आसे विशेष. श्रीमत राजश्री सेनाधुरधर आपली आज्ञा घेऊन स्वार जाले मागील साहा घटका दिवस राहताना निघाले. ते चौ घटका रात्रीस मुकाम मजकूरी दाखल जाले. त्यास श्रीमत राजश्री सेनाबहादर व पाडुरग गणेश व जानराव येशवत व भले लोक आदीकरून येका कोसावर येऊन भेटले. त्यानतर राजश्री परसोजी भोसले टालेचे पुढे गोट सोडून आगाडीस येका बागाच्या टप्याबर येऊन भेटले. त्यास घोड्यावरून आलादा उचलून पालखीत घेतले. तैसेच डेऱ्यापुढे छेमिन्याखाले आले त्यास येताच भाषण केले की, माहाराजास पुत्र जाल्याचे वर्तमान कल्ले,

तेव्हां तोफा नव्हत्या त्यास दारुच्याच सांगोन पंचवीस बार करविले तैसेच बागांत गेले आऊन मागती माघारें छेमिन्यासाखें येऊन तसल नतर घोडे व बाज्या पाहावया-सांठीं पांच सात आणिवल्या त्यानंतर येवदता हत्ती आणिविल्या ता पाहिल्या त्यानंतर उदईक कूच टपकलें राजश्री वेंकोजी भोसले यांचे उबवेथासुन गोयासबाहीं गाट समताच याहावयास सांगितले त्यांस आपण विनंती केली कीं, भर्यान्या निश्चयाचें श्रीमंतास काये ल्याहावें त्यास उत्तर केलं कीं, चौदा भग्नानंतर दिवस चांगल्य आहे येथि सीघी चिठी पाठविली आहे यावविसी साहेब मजनितील तेस राजश्री वेंकोजी भोसले यास ते समईच आज्ञा जाली कीं गावांत चाणें सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ति

२५९

| | | |
|---|---|---|
| रु. नं ९९ | श्री | ता ४ मे १७८९ |
| फा नं १ | | |
| पत्र नं ४५१ | | |

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बरपे दरबागा मोरचे श्रीमंत सेनाधुरंधर, विज्ञप्ना यसीजे येथील तोफा स्यार गुरु आहेत गाळाही करेगर होतो परतु सफेदी व बुरुज मजबुत कोहीच न्छिळत नाहीं उंचा जागा हालेस समा नाहीं श्रीमंत राजश्री सेनाधुरंधरांचे मारन्याचे पश्चिमेस आपल्या मारन्याच सेवटीस उत्तरेस मागल्याटाचे रस्ता देऊन आहे. तिकडून तोफा पाहावर यावया. मोरच्यास जागा उऊन चांगली तोफास बयळ पडत काम होईल्से साय्त, पाण्याची विहीर जवळ माव राहती राजश्री पांडुरंगपतनाना गत होते आज माघ घळी राजश्री आपाजी येशवंत व आम्ही जागा पाहावयास गेलो होतो त्यास आम्ही पाहेस्यान काय होतें श्रीमंत राजश्री तात्यांची स्वारीस याट निमेघ आहे. त्यांनीं यऊन पाहेल्यास तोफा काढ लागू करायची ई समय सांगण्यांत येईल आपा व श्रीमंत रा। सेनाधुरधर यांच्या तोफा उभयेतांनी पाहेल्यास उत्तम आहे पानगामर्गील ताफ पाण्यावर लागू चांगली आहे. हीं तर क्राशवयाची नाहीं उत्तरेकडील गाव कोस दाहाएकखील आहे. त्याचा संदक लणताव सारांश पाहेस्या यांचून दास्याश्य स्वच मात्र होवा. काम कांहीं होत नाहीं निराळी याद पाठविली आहे. दिवस दाहा पत्र्या जाहल्या तेव्हां राजश्री पांडुरंगपंतदादाच मारन्यावर दासल राखें हे विज्ञप्ना. ता। छ माह रजब चिठी ग्याना निश्चा शाहा पत्रा

२६०

| | | |
|---|---|---|
| रु. नं ९९ | श्री | ता ४ जून १७८९ |
| फा नं २ | | छ १५ साबान सना |
| पत्र नं. १ | | समानीन |

शयसी आज्ञाधारक मल्हारजी बरपे विज्ञप्ना ता। छ ७ साबान मुा लस्कर नर्जाक किले गर्जेंद्रगड साहेबांचे कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचें वर्तमान येयारथीत असे विशेष छ ५ साबानीं टिपूकडून वकील सिंगारीफत आले होते त्यास राजश्री तात्यास पुसून त्यांचे निरोपाचें ठरावरें आपले मसुद्याचा पत्रें तयार करून तात्यांनी वाचून पाहिले, तेव्हां तात्यांनी म्हटलें कीं, फार चांगले आहेत श्रीमंत सेनाधुरंधर यांकडील कुलम-गास मोस समस्त तात्यांबद्दल आणिले होते मोल्लव्याच माग मागील पुढील सर्व समजाऊन दिल्हे त्यावरून येथून तात्यांचा निरोप घेऊन आपले डेन्यास गेले नतर सेना-धुरंधर यांबद्दल गेले यांणी सांकल्य वर्तमान तात्यांबद्दल बोलले होते तें सर्व सांगितलें त्यास सेनाधुरंधर यांणी सांगितलें कीं, तात्यांची सासरजमा जाली कीं नाहीं असें पुसलें म्हणून कारभारी यांणी सांगितले त्यास संकरोबा तात्याबद्दल आहे त्याबद्दल बराबर देत होते त्याचें कसे जाले हे विचारलें त्यास सेनाधुरधर यांकडे संकराजा पाठऊन दिल्हा होता त्याबरोबर संकराबास विचारले कीं, तात्यांबद्दल किती वर्षें चाकरीस आहांत! त्यांणी सांगितलें कीं, गाहा चार वर्षे तात्यांबद्दल आहे त्यांस सेनाधुरंधर म्हणाले कीं, फार चांगले आहे तुम्ही विश्वासुक आहांत म्हणून तात्या तुम्हांस पाठवितात त्यास आमचा सल्ला बुल्ल्यास चाता यावयाकरे जावें, चाकर आमचा म्हणून सांगावे, तात्याकडील चाकर आहे म्हणून कोठेही लागू नये तात्यांनी सांगितले ता मजकूर मात्र आपला ध्यानात धरून तेथ जाऊन तर्थ पाहिल्या पा तात्याबद्दल विनंती करावी त्यास संकरोबानी उत्तर केलें कीं मजला तिकडे पाठविता तव्हा तिकडे माझे स्थानमाठ याजल फार आहेत मी तात्याबद्दल चाकर आहे हे तिकडे सर्वांस ठाऊक आहे आणि काम तर माठ, मग्ही सलख बास्यास कस! तेव्हां सेनाधुरधर यांणी म्हटले कीं हा सरें म्हणता तव्हा आपाजी येशवंत व मी व संकरोबा तात्याबद्दल आलों सेनाधुरंधर याबद्दल सम बोलले त तात्याबद्दल संकरोबाचें बोलणे सांगितले त्यावरून तात्यांनी सांगितलें कीं संकरोबा म्हणता हे खरेंच.

येखादे कामात खलेल होईल. सकरोनास राहून यासच निरोप द्यावा असे पतमशारनिलेस सागितले की सेनाधुरधर यास सागून निरोप देवाना. त्यास साइकाली कारभारी सर्व मिळून त्याचे निरोपाचे ठरावले त्याजवर साहा घट्का रात्री कारभारी व सिगोरीपत व लाला व हरकारे जामृद सर्व बोलाऊन घेतले त्याजरून सिगोरीपतासी सेनाधुरधर बोलले की पहिले पो वर्तनुक करून पतप्रधान यासी स्नेह राखावयाचा असला तरी टुलमदास यास तुम्हाबरोबर देतो. शाहाणा माणुस आहे. साडनीस्वार बराबर देतो तेथे बोलून त्या पो साडनीस्वार पाठवणे, त्याजवरून सिगोरीपत बोलले की बहुत उतम आहे. त्यास लालास येकीकडे घेऊन सागितले की तुम्ही फार्सीचे राज्याकडून वकीलीस आला होता तुम्ही विश्वासुक इतबारी म्हणून तुम्हास पाठवितो तरी पतप्रधान याजकडील सर्व मजकूर ध्यानात धरून सागितल्या प्रो त्यासी बहुत सावधगिरीने बोलावे. त्यास त्याणे सागितले की आज्ञा जाल्यापो सर्व बोलन, कोणतेही अतर होणार नाही, तेव्हा त्यास निरोप दिल्हा. सिगोरीपतास वस्त्रे निरोपसमई सेलापागोटे पैठणी जामेवार किनखाप, हरकारा बराबर होता त्यास सेलापागोटे जाल्नापुरी, वरकड अकरा जासुद यास अस्ग पागोटे व खर्चास जोडीस दाहा रो व सिगोरीपतास दोनसे रो व उट ओझ्यास याजप्रो त्याची गा केली. त्यास दुल्लभदासास घोडी येक चादणी राहुटी उट येक व घोडी येक याप्रो त्यास दिल्हे. जासूदजोडी व खिजमतगारजोडी व साटनीस्वार येक याप्रो सरजाम देऊन तात्यानी बराबर पनास राऊत जासूदजोडी येक बाजीपतआणा याजकडून देवऊन कोपलापावत छ मजकुरी निघोन गेले. दुसरे सेनाधुरधर याणी तोफा फुटक्या काही काण जायबदी सा नागपुरास रवाना कराव्या म्हणून तात्यास पुसावयास आबाजी येशवत यास पाठविले. त्यास तात्यानी सागितले की तोफा रा कराव्या हे ठीक नाहीं. तेव्हा सागितले की फुटक्या तोफा याचे प्रयोजन नाही मग सात तोफा व हती रा केले. बाहेर आद् कोसावर राहिले आहेत. नागपुरास जातात. श्रीमत नाना यास जाऊन पाच सात दिवस जाले त्यास आपले घरचा काही बदोबस्त करावा की तापाचा ताप बसवावा असे छ ४ साबानी बोलले, त्याजवरून उभयता चिरंजिवास येकीकडे घेऊन पुसावे की उभयतातून येथे फौजेत कोण राहता असे सागून मग उठून लोकात बसले. कारभारी जाऊन पाठीमागे राहुटीत बसले. खडोजी भोसले व वेंकाजी भोसले यास कारभारी यानी बोलाऊन पर्यायेकडून विचारावयास लागले तेव्हा त्याणी उतर केले की उभयतातून ज्यास आज्ञा कराल त्यास मान्य आहे. त्यास सेनाधुरधर यास कारभारी यानी सागितले की आम्हास ज्यास आज्ञा कराल त्यास मान आहे. सेनाधुरधर याचे मानस की चिमणाबापू यास येथे ठेऊन वेंकाजी भोसले यास बराबर न्यावे असे मानस. छ ४ साबानी सेनाधुरधर याजपासी निरोप घेऊन राहुटीसुधा येथे तात्याजवळ येऊन राहिलो. सिगोरीपत आले त्यानी टिपूकडून पोशाक भवानीपत मुनसी यास आनला होता देण्यात आला नवता जे दिवसी सिंगोरीपतासा निरोप दिल्हा ते दिवस सेनाधुरधर याचे समक्ष देण्यात आला. सेलापागोटे बराणपुरी जामेवार बराणपुरी व मसरु येकूण च्यार सणगे दिल्ही छ ७ साबानी श्रीमत राजश्री सेनाधुरधर यास काल रात्री आपा बलवतराव याणी येऊन आमत्रने सागितले की उदईक आमचे येथे भोजनास यावे, आपले मुतसदी मडली वगैरे घेऊन बारा घटकात यावे म्हणून सागून आपापले डेऱ्यास आले. सर्व मडली घेऊन सेनाधुरधर आपाचे डेऱ्यास आले. समारभ आपानी चागला केला होता. राजश्री वेंकोजी भोसले व खडोजी भोसले व आणखी दाहा पाच मराठे बराबर होते. भोजनाचे पूर्वी राजश्री तात्याही आले होते. भोजन होऊन विडे घेऊन सेनाधुरधर यास पोशाक दिल्हे सेले पागोटे तीन पैठणी कीनखापा तीन व जामेवार तीन येकूण बारा सणगे दिल्हे. राजश्री खडोजी भोसले याणी मुहुर्तेकरून राहुटी जरीपटक्याचे निशाण तात्यापासी राहावयास प्रस्थानास ठेवले. लोकाची नेमनुक होती पथके नेमितात व मुतसदी कोणकोण राहातात हे न कले. नेमल्यावर सेवेसी लिहीन. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## २६१

रु. नं. ९६ **श्रीव्यंकटेश** ता. १२ जुलै १७८६
फा. नं. १
पत्र न ४६०

साहेबाचे शेवेसी आज्ञाकीत मल्हारजी वरपे कृतानेक विज्ञापना येसीजे, साहेबाचे हुजुरीहून निरोप घेऊन, तेथून दाहावे घटकेस रात्रीस छ १४ रोज मगलवारी निघालों ते राजश्री कुशाबा चिटनीससहीत मागील प्रहेर रात्र राहतानीं श्रीमत सेनाधुरधराचा मुकाम आलदीस

आला येथें पावचला त्यास सेनाधुरंधर कोठेक भाग होऊन कृष्णाप्पाचा व माझा रामराम जाला प्रथमच श्रीमंत महाराज राजश्री साहेबांचें वर्तमान कुशलतेचें विचारलें व साहेबांचें वर्तमान शरीरप्रकृतीचें पुसीलें येथास्थित आसे म्हणून विनंती केली नंतर आज्ञा केली की, जाऊन निद्रा करण धुरंधराही निद्रस्थ जाहले येथें आस्मावरी भालदीर उमाजी महादेव यांचें घर आहे त्यांचे पुत्रांनी सेना धुरंधरांस व राजश्री मनाजापुस माज्यनासी बोलाविलें दाहा बारा इसम मराठ समागमें रात्रीस गलें होते सेना धुरंधरांसी व मनाजापुस वरून दिवसा दोन प्रहर रात्रीस डेरीयासी आले कळावे छ १५ प्रायःकाळीं बोलाऊ आले त्यास कृष्णाप्पा व मी सेनाधुरंधराकडे गलें भटीच्या संकेत विचारला त्यावरून सांगितलें की, गुा भेट जाली तंव जागी आठ नव घटका दिवस मागील राहतांनी श्रीमंत महाराज राजश्रीसाहेबांची स्वारी व श्रीमंत नानासाहेबांची स्वारी येऊन चावीसा घटकानंतर भटी घराशी येसा वंत जाहला आहे हें येऊन उत्तम आहे म्हणून मालूम सेनाधुरंधरांचा मुक्कामीहून निघ ण्याचा निश्चय कीं, तंव घटका दिवस आस्यानंतर स्वारी येथून चालसी आठ कोस मागाही जागें आहे. त्याच संधींवच जाऊन पोहचूं म्हणून सांगितलें लस्करचें कूच जालें उत्तरपश्चाची जागा राजश्री रात्यांचे बागाजवळ गुलटेकडीसमीप सांगितली आसे मुर्शी माडच्याशी पुरंधरच्चे येथें मेजमानीस गले हात त्यांनी वस्त्रें दिल्ही व गुा येमनी घाटा यावला दिवस होता त्याचा घाटा माळ आतां दिल्हा पाणी घाटांवच बांधिला आहे सेनाधुरंधर तथावरून निघाल्यासी मी सेवेसी येऊन पावचतो सवेसी ??व हाय हे विज्ञापना मुनसीजीयेमें व आपसी आपनें जाहलीं तें सविस्तर कृष्णाप्पांनी येथंती उत्तरें प्रतीउत्तरें निवेदन केली हे विज्ञप्ति बुधवार तीन घटका प्रथम दिवस

## २६२

| | | |
|---|---|---|
| रु. म. ९१ | श्रीव्यंकटेश | ता ३१ जुलै १७८६ |
| फा. नं १ | | पौ छ. ४ सवाल सन |
| पत्र नं ३१५ | | सबा आयन्मास |

साहेबांचे सेवेसी आज्ञांकित मल्हारजी घारप कृतानेक विज्ञापना येसीजे साहेबांचे प्रताप करून येथील वर्तमान ता छ ५ माहे मशाल पावेतों येथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर साहेबांचा निरोप घेऊन यानंतर डेरा मुक्कामा आलेच होते तेथून छ २८ माहे रमजानेस मौजे नायगावी मुक्काम जाला दुसरे दिवशीं छ २९ रोजी कूच होऊन कळेठाणचे मुक्कामास आले प्रायःकाळी कूच करून छ १ रोजीं शवाल देवाजी लस्करकर याचे घरी नानगांवी मेजमानीस गले मेजमाने खर्ची उभयेतां मास्यासी पैठणी ठाणे दिल्ही व घोडी येक नजर केली दुसरे + + खरीद त्याचे यथील करून धुरंधर साहा घटका दिवस राहताना शिरापुर भीमा ??सागरीयासी लस्करांत आले हा भीमेस पाणी अथांक. आपले आज्ञा नाव पांच जमा जाल्या होत्याच लस्कर पोहचवानीच दाला व फारखाने शिलेखाना जामदार खाना कोठी गुरुवारीं उतरोन दिल्हे शुक्रवारीं छ २ माहे शवालेस घोडी वगैर सरकारचे राहिले ते व योही उतरोन आपण दीड प्रहरानंतर देवाची पालखी नावेंत ठवून बरोबर उतरले उतरतीरीच शिद्धटेकीच मास्थन जाले निद्रा जाहल्यानंतर कमलाबाद हाती बलात्कारी मस्तीमुळें ठेविला तो आणून पाहिला हाती चांगला आहे. परंतु शिर मात्र हातीचें हालके लागले उच नाही म्हणून भाव्य होते मागती हाती माघारा पाठविला तृतीये प्रहरी पुन सीजीही भीमा उतरोन आले समागमें टिपूकडील इंगिरीपर्यंत व लस्कर वुलमगास होते शुक्रवारची रात्रीं म्हणून यांजला सांगितले कीं, उदईक पंचमी, चतुर्थी गल्यानंतर निरोप तुम्हास देऊ. लस्कर तमाम बाजारसुद्धां-व्यार रोज उतरत होते फारण कीं उंट उतरायासी दिवस पडली म्हणूनच मुक्कामा + + उंट वगैर उतरोन आली हाती तीन उतरत नव्हते याजकरिता सेना धुरंधर मागती जाऊन हाती उतरोन आणिले पैकी येक हातनी पाण्यांत शिरेना याजकरिता दक्षणतीरासीच राहिली असे नदींत उतरतांना घोडे येक व माणूस येक बुडोन मेले आलीकडे आम्हांसी येक घोडी पागची उफलोन गली येक माणूस नावेंत घोसी घालताना दडपून गत-प्राण जाहले घरफार सर्व धाम उतरोन आले. आज छ ५ माहे ममकुरी कूच होऊन मुक्काम मीरजादे प्राा पटगांव येथील नैमिया आहे येथून पत्रें व मरदस्याकडील खबरीची नकल वर्जानिस सवेसी पाठविल्या आहेत येथून दाजीबा व गोविंदभटजी व मस्यकरायजीस लिहिले असेत राजश्री तात्याकडे रवानगी पत्रांची केली आहेत हे विज्ञप्ति

## २६३

रु न. ९६ श्री जुलै १७८६
फा. न १
पत्र न ३५

साहेबाचे सेवेसी मल्हारजी वरपे कृतानेक विज्ञापना ऐसीजे. श्रीमत राजश्री सेनाधुरधर यानी नाते करून देवपुजा करून राहूटीस येऊन बसले. राजश्री भवानीपत मुनसी यासी बोलणे जाले. कोथरूडच्या बागात राजश्री तात्या याच्या जात आहे. त्यास रुकून जाताना राजश्री आपा बलवत याचे येथे जाऊ[न] त्याचे कोन्ही आक्त्यारी वडील आसेल त्याचे समाधान करून तिकडे जाऊन उदैक राजश्री तात्या व चिमनाबापु याजकडे पत्र रवाना करावी व आपासहि समाधानाविसीचे पत्र पाठवावी ऐसे बोलणे जाले. सेवेसी श्रुत होवे हे विज्ञाप्ति.

## २६४

रु. न. ९६ श्री १८ जून १७८६
फा. न. १
पत्र न. ३८

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मलारजी वरपे कृतानेक विज्ञापना येसी जे, छ १९ रोज मदवारी राजश्री गोविदभटजी राजश्री बलवतराव बागात राहिले त्याजकडे जाऊन समाचार घेऊन श्रीमत सेनाधुरधराकडे आले तो राहूटीत मुनसीसह बसले होते. भटजीचे बोलणे दोन तीन घटका जाले. भटजी गेल्यानतर श्रृगेरीपत व लाला दुलभदास याची भेट जाहाली. श्रृगेरीपतनी नजर पाच रुपये व लालानी नजर दोन रु॥ सेनाधुरधरास केले. येक घटका बोलणे जाले. नतर मुनसीजीसी सविस्तर बोलावें उदईक दरबारास जाऊ तेव्हा सर्व सागण्यात येईल म्हणून उभयेतास आज्ञा केली. आज रविवारी श्रृगेरीपत व लालास मुनसी सेनाधुरधराकडे घेऊन जात आहेत. जे बोलणे ते समक्ष होईल यैसे म्हणतात रगोबा नाईक वानवले याचे येथे सेनाधुरधर भोज्यनास जात आहेत. श्रृगेरीपताबरोबर सरजाम उट येक व घोडा येक माणसे सात व खाशासुधा आठ. याशिवाय पढरानजिक बैल दोन व माणसे च्यार मागे राहिले आहेत. सेवेसी कळावे हे विज्ञाप्ति.

## २६५

रु. न. ९६ श्रीव्यंकटेश
फा. न. १ १७८६
पत्र न ४५७

साहेबाचे शेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक विज्ञापना येसीजे, श्रीमत राजश्री रघोजी भोसले सेनाबहादर आपल्या पासून निरोप घेऊन राजश्री आपा बलवताचे डेरीयासी आमत्रणासी आले. पानदान आतर घेतले. आपानी पेठणी सेला पागोटे दिल्हे. तेथून जाताना आपाचे येथील हरदासही कथेस बोलाविले. नतर परशरामभाऊचे येथे आपासहीत आमत्रणासी आले. तेथे रघुनाथराव पटवर्धनही आले होते. भाऊस आमत्रण दिल्हे. पानदान आतर घेतलें. भाऊनी पागोटे सेला पैठणी हिरवा दलायचा जामेवार कोशा दिल्हा. तेथून रघुनाथराव पटवर्धनाचे येथे गेले. आमत्र(ण) देऊन त्याची वस्त्रे सेला पागोटें बरानपुरी दलायचा माल्क व जामेवार सफेद दिल्हा. पानदान आतर घेऊन लक्ष्मण रास्ते याचे डेरीयासी आले आमत्रण सागितले. त्यानी आतर खण्डोजी भोसले याचे हातावर दिल्हे. पानदान घेऊन मालोजी घोरपडे याचे घरास जावें तो दिवस थोडका दाहा घटका राहिला म्हणोन आपलेच्च डेरीयासी आले. सेवेसी कलावे हे विज्ञाप्ति.

## २६६

रु. न. ९६ श्रीव्यंकटेश १७८६
फा. न. १
पत्र नं. ४५३

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपे कृतानेक विज्ञापना यैसी जे राजश्री पाडूरग गणेश व येशवतराव भवानीशकर याचे येथे आज बुधवारी रात्रीस येक प्रहर दोन घटकेस श्रीमत सेनाधुरधर व खडोजी भोसले सेनाबहादर वेंकोजी भोसले व परसोजी भोसले भोजनास आले. समागमे भोजनास इशमे लक्ष्मणराव पाटनकर, मानाजी घाटगे, सोमाजी मोहिते, मानसिग मोहिते, गगाजी भोसले वगैरे दाहा पधरा आसाम्यासहीत आले. भोज्येनास गेले. राजश्री आपा बलवतही बोलावणे गेले होते. येऊन पोहोचले. मालोजी घोरपडे याचे येथील हिंदुस्थानी पोर व आपले लस्करचा ताफा येक व उजीनीची कचनी येथील

व गर्दई आल्मसेन व मीर मोसुम आहेत मोच्येनानंतर नाच सुरु होईल रंग केशरी केला आहे. मीसल नदीचे समीप आली तेथेच समा केली दक्षण उत्तर राहुट्या मध्यें कनाता देऊन चादरी भांदून अविल्या, फर्श केला आहे. हे विज्ञप्ति

## २६७

रु. नं. ९६ श्री १७८१,
फा नं १
पत्र नं. ४७८

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपे कृतानेक विज्ञापना येसीजे, कल हुजुरीहून आल्या विमणा बापु, मनाजापूसांगितलें कीं, तात्यांनीं म्हटलें कीं, यांतील मजकूर कांहीं समजला होते त्याजवरून मुक्काम केला हें थाहेयो सांगितले सेनाधुरंधरांचे भवणीं चिमण्णापूनी घातलें मुक्कामाचे कारण काय म्हणोन विचारले तेव्हां त्यांणींच पवायांनी सांगितलें कीं, नवाब मागें राहिले याजमुळें मुक्काम जाला प्रायःकाळीं आज येयांनीं हात पाहिला मकुर रात्रीं मा आहे सीतज्वराचा ज्वर आहे उदईक कूच व्हाल्यासी चिंता नाहीं घराही योजून देता म्हणोन वैद्यांचा बोलले रुकेरायास हाती मस्त रात्रीस सुन्न्य, गल्बला तमाम रात्रीस जाली, आतां घरल्या आहे पांडूरंगराव ययरकून रास्त्यांकडील कडीचे वार्तावीकरितां आले तरवरची कडी गली तिकडे जाशी म्हणान, त्यावरून येथीलही कडी तिकडेच गेली आसपास राज्य वार्तादीकरितां आहेत. हे विज्ञप्ति

## २६८

रु. नं ९६ श्री व्यंकटेश १७८१
फा. न. १
पत्र नं. ४६१

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी नाईक घरपे कृतानेक विज्ञपना येसी ज, राजश्री मुनसीजी व आवाजी पदर्शत साहेबांची भास घऊन राजश्री सेनाधुरंधराकडे आले श्रीमंत नानासाहेबांनी व राजश्री तात्यांनी मोइनदौलाचे यच्यासी स्वार दिला भगाजी रघुनाथ नवाबाकडे गले म्हणान सांगितलें त्यावरून आम्हाची तरतूद करविली व प्रायःकाळीं सेनाधुरंधर जातीनी डेरीयाचे आगाडीस येऊन पुढे लोकांची सारखार केली मैदान कुशाद केलें बैठकी करितां तीन दरजे केले फर्श हात आहेत नंतर स्नान देवपूजा सेनाधुरंधरांनी करून मुनसीची मुर्शा येके समा जाले आहेत भगाजी रघुनाथ यांची चिठी सांडणीचा आली कीं, सायंकाळीं डेर्‍यास आले तो मार्गी चुकले दिशा प्रहर रात्रीस मोईनदौलाचे डेरीयासी पोहोंचले, तो मोईनदौला आंतील डेरीयास होते गांठ पडली नाहीं नंतर निरोप पाठविला त्याचें उत्तर आलें कीं, आतां मेवकर जाला व उदईक प्रायःकाळीं यावें म्हणजे नवाबसाहेबांकडे साडा घटका दिवस आल्यानंतर जाऊन, भाव करून, जे आज्ञा होईल ते तुम्हांस सांगो यांणी येथून खातमीकरितां सांडणीस्वार पाठविले आहेत जैसी खातमी येईल ते सेवेसी विज्ञापना लि॥ जाईल हे विज्ञप्ति

## २६९

रु. म ९६ श्री १७८१
फा. नं १
पत्र नं ४५४

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपे कृतानेक विज्ञप्ति येसीजे, येथून राा मयानीपत मुनसी, आवाजी येशवत व भगाजीपंत येसे साहेबांकडे आले व तिकडोन विसरा प्रहर राा आपा व आपाचे पुत्र ऐसे येथें आले होते ते समई श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर चांदणीतर्फी घरून घोडी फेरऊन दास्तवीत होते व आपाही आपली घोडी फेरऊन दास्तवीस होते तेव्हां चांगले मोसल वरून होते त्यानंतर करभारी साहेबांचा निरोप घेऊन डेर्‍यास आले साहेबी आज्ञा केली त्या प्रो निवेदन केले साहेबांचे आज्ञा प्रो उपयांत आलें मुनसीस निरोप दिला मुनसीजी बोलले जे, माझ्या आंगास कदागी आली म्हणून मोसल मुनसी आपले राहूटीस गेले आनी धुरंधर लहुरंजयास करावयास गले लहूरंजया होऊन पाण्याचा गुळना फेल्या ता अकस्मात हींव आलें तें घेतनाच आलें प्यार पांघुरनें घरती घतली सिरीकर वैद्य बाळाऊन आनले होते येम प्रो घारमा जाला आहे. सेनाबहादर व मैंबाजी मोसले सकळ मसल आहेत सेवेसी श्रुत हाय हे विज्ञप्ति

## २७०

रु. न. ९६ श्री १७८६
फा नं. १
पत्र न. ४५२

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञापना ऐसी जे. श्रीमत राजश्री सेनाधुरधर याचा येथें मुकाम जाला नतर याची कही हाती व उटे व घोडी सुरापुराचे व बाघनीगिरचे आगे गेली होती. त्यास धुरधराची स्वारी डेऱ्यास ये(ऊ)न निदरा केली. तो हातीकडून गढीवान धावत आला त्यानें सागितले जे, पाचे सात हाती वलून नेले. त्यास धुरधर तर निजले होते. नूरमहमद फौजदार चालीस पनास स्वार आपले पागेचे घेऊन प्रहर दिवस राहताना गेला आहे. त्यास हाती तर वहोत करून आले. येक दोन राहिलो आहे. आनी घोडी दाहाबारा वलून नेलीच व काहीं मानसे जखमी केली ते आली व त्याची पावरून नेली. धुरधरानी मजला विचारले की रुदैक कूच आहे किवा मुकाम आहे. तेव्हा म्या विनती उगीच सुमार केली कीं उदैक कूच आहे. तेव्हा त्यानीं म्हटले जे सुरापुरावाल्याने आमचे हाती नेले आहेत. ते त्याच्या वकिलास सागून आमचे हाती आनवावे तर उदैक आमच कूच आहे. नाहीतर आम्ही कूच करीत नाहीं. असे म्हणून मजला सेवेसी विनती ल्याहवयास सागितले. त्याजवरून सेवेसी विनती लिहीले आहे. व राजश्री मालूजी घोरपडे आले होते. दोन घटिका बसून विडे घेऊन गेले. साहेबाकडून सेवेची फले साह आली होती ते पोहोचली. पाहून वाड्यात बाईसाहेबाकडे पाठवली. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति.

## २७१

रु. न. ९६ श्री ता. १२ जून १७८७
फा. न. १
पत्र नं. १६२–१६३

साहेबाचे शेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वारपे कृतानेक विज्ञाप्ति यैसी जे. येथील क्षेम ता छ २५ माहे साबानपावेतो मुा नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकणे करून आज्ञाधारकाचे वर्तमाण येथास्थित आसे विशेष. राजश्री सेनाधुरधर याची स्वारी नागपुराहून निघोन मजल दर मजल छ ३ रोजी सोमवारी बोरीचा मुकाम जाला. छ ४ रोज मगलवार वेले येथे मुकाम जाला. छ ५ रोजी हिंगणघाट छ ६ रोजी लाडकी नागरीच्या मुकामास जाऊन सिकारीस कोसी दो कोसी जाऊन वाघीन व पिली तीन व हरणे मारून डेरियास आले याप्रा सिकार जाली. व दुसरे दिवसी तेथे मुकाम करून वोरबनात पटाईत वाघ होता तो मारून छ ८ रोजी खासगी वरुडे येथे मुकाम दलाचा मुकाम छ १० रोजी दो प्रहरा दिवसा चद्रपुरास गेले. श्रीदेवीचे दर्शण घेऊन सरकारवाडियास दाखल जाले. याप्राा मजली करून आठवे दिवसी पोहचले छ१४ रोजी शुक्रवारी राजश्री सेनाधुरधर व सौवती बाईसाहेबसुधा माणिकगड पाहावयास गेले. चद्रपुराहून सोला कोस आहे. शेनवारी स्वारी पोहचली. रविवारी तेथे राहून छ १७ रोजी सोमवारी तेथून कूच करून आडचा प्रहरा स्वारी चद्रपुरास आली समागमे राजश्री पाडुरगपत व येशवतराव व जाणराव व बाबाजी चिटणीस तेथे होते. छ १८ रोजी मगलवारी श्रीदेवीचा नवस गोधल घातला. याउपरी छ १९ रोजीपासून सहश्रभोजने सरकारची चाली लागली व इतर कोणी कोणी मुतसदी मडली सहश्रभोजेण घालणार व आणखी मामलतीप्रकर्णे काही व्हावयाचे आसतील म्हणून आशाड शुध्द प्रतिपदा द्वितीयापावेतो राहाणार म्हणून बोलण्यात आहे. उपरात तेथून कूच होऊन चिमूरच्या मार्गे जाऊन तेथे आशाढी येकादसी करून पूर्णिमेच्या सुमारे नागपुरास येणार. याप्राा वेत जाहाला आहे. याउपरी काय घडेल ते पाहावे. दुसरे बोलणे की, तेथोन निघोन नागपुरास आशाड सुध पचेमी आथवा सप्तमीस दाखल हवेलीस व्हावे हाहि वेत आहे दाखल जालियावर सेवेसी विज्ञाप्ति लिहीली जाईल. सरकारची पत्रे राजश्री सेनाधुरधर यासी पाठविण्यात आली जे, साडेतीन लक्ष रुाये हप्तेबदी नवाबाकडील यावीसी जाली ते चद्रपूरचे मुकामास पोहचली. तेथे वाचून नागपुरास राजश्री भवाणीपत मुनसी व भवाणी कालोजी याजकडे व मुनसीचे पत्र यैसे पाठविली व तेथून आपले पत्र लिहीले की, याचे उतर द्यावयाचे ते तेथेच लिहून देणे म्हणून राजश्री सेनाधुरधर याचे पत्र लिहीले आले त्याजवरून येथे मसुदा छ २० साबाणीस करून चद्रपुरास पाठविण्यात आला. तेथे पोहचून पत्रे तयार होऊन पुन्हा मागती पत्रे .. .. व मुनसीचे पत्र यैसे रवाणा होणार. मसुद्यात मजकूर जे

नागपुरास दाखल जालियावर वैसाच देण्याचा मार्ग होईल राजश्री उभयेता यांच्या बोलण्यात जे, दौलतीत पेच नसता आहे हा ठिकाण नाही परंतु या अर्थी इलाज घेतला आहे त्या अर्थी देणे प्राप्त आहे. राजश्री बापूजी महेश्वर व माधोराव कृष्ण फडणीसीकडील कारकून या उभयेतास मार्ग सलाबतखान याजकडे वराडचे ऐवजाकरिता पाठविले आहे ते गेल्या दिवसापासोन अद्यापपावेतो पत्रदेखील आले नाही राजश्री विठ्ठलपंत सुभेदार मामलतसंबंधी फडशा करावयास गेले होते त्यासी व मारीसी खटखट जाली म्हणून आलजपुरा हून कूच करून दोन कोस आलीकडे आले पुन्हा सलाबतखान याणी आपलेकडील मुतसदी पाठऊन मुक्काम करविला गु॥ साडे तीन लक्ष रु॥ ऐवज त्यापैकी बाकी येणे दीड लक्ष व हाल साल साडेतीन येऊन पाच लक्ष राहिली त्याचा भाग अद्याप खानाकडून लागला नाही, ऐसे आहे. राजश्री माल्हजी गोविंद बुंदेले याजकडून गडेमंडले येथील कमावीसदार मोरोपंत आहेत गडेयाची रयेत सिवणी छपारे राजश्री सेनाधुरंधर यांचा प्रांत लगतच आहे तो मुलूक सरंजाम माहदआमीन पठाण याजकडे आहे. त्यासी रयेत या प्रांती आली म्हणून मोरोपंत यासी इतला नागपुरास न देता आपणाकडील बाजी रघुनाथ व मल्हारजीपंत पागे यासी रवाना फौज देऊन केले तो ते मेगा धुमेगावच्या इकडील व तिकडील आहे त्यावर येऊन केरले हा गाव पठानाचे ठाणियाचा होता त्यावर जाऊन ठाणियातील कमाविसदाराचा मूल व पंचवीस माणसे मारून गाव लुटून माघारा धुमेगावास आले आणीक चवथ दिवसी तयार होऊन गेले तो पठानानी ठाणियात मानसे ठेऊन मजबुती केली होती दरवाजियात हेही आले यासी व त्यासी हातमिळणी जाली मोरोपंताकडील चारकून व दाहा माणसे मारली पडली त्यावरून माहदआमीन याणी सांडणीस्वारासमागमे पत्र चंद्रपुरास पाठविली त्यावरून रा॥ मुनसी गर्म[त] होते की, आगरास इतला न देता व माहदआमीनखानास पत्र न पाठविता उपाधी करितात हे वाइट यावरून येथून पत्रे गडेमंडले यांचे पाठविणार आहेत पुढे इणामय व्हायचा आहे तीही येण्यावर आहेत व हेही आहेत पुढेही काये घडेल ते लिहीण्यात येईल राजश्री माहादाजी हरि याजकडे तलाव दाहा सहभाचे कमाविस सांगितली आहे याजकडील कारकून जागर आहेत सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति

२७२

| | | |
|---|---|---|
| रु. न १९ | श्री | ता ४ जुलै १७८० |
| फा. नं १ | | पौ छ. ४ सबानकेसबा |
| पत्र नं ८ | | समान समानीन |
| | | अधिक श्रावणमास |

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपडे कृतानेक विज्ञप्ति ऐसी जे, येथील क्षेम ता छ १८ रमजान पावेतो मुक्काम नागपूर येथें साहेबांचे कृपावलोकनें करून आज्ञा धारकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष इकडील वर्तमान तर पेशजी साहेबांचे सेवेसी विज्ञप्ति लिहीलीच आहे. त्या नंतर छ ५ रमजानी चंद्रपुराहून श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर याणी कुटुंबसुधे कूच केले ते मजल दरमजल येऊन छ १० रमजानी सक्करदऱ्याजवळ मुक्काम केला येथे मु॥ मजकूरी कारभारी जे राहीले होते ते राजश्री भवानी काळो व राजश्री भवानी नागनाथ व रा॥ कृष्णराव माधव चिटनवीस व रा॥ सिवराम हरी व रा॥ जनार्दन विश्वनाथ ऐसे सक्करदऱ्यावर जाऊन आपआपले ऐवजानें दोनी मोहरा व रा॥ ऐसे सेनाधुरंधरास व राजश्री सेनासाहेब-सुभा यांस नजरा केल्या व राजश्री व्यंकटराव कृष्ण नि॥ राजश्री तुकोजी बावा होळकर योर्णीही दोन दोन रुपये नजर केली नंतर चंद्रपुर व मानीकगड वगैरे प्रांताचे माहले-मामल(त)चे कागदपत्र होते ते कारभारी यांचे इलाज केले आनी समजाऊन सांगितले तो तिसरा प्रहर जाला नंतर सवांस निरोप करावयास जावयास दिला व आपणही कपडास गेले छ ११ रोजी कूच करून शुभमुहूर्तेकरून सातवे घटकेस हावेलीस दाखल जाले देवदर्शन करून वाड्यांत गेले त्यास पुरनमेस गिन्हागास श्रीरामचंद्रास जाणार होते तो श्रीमंत राजश्री सेनाबहादर यांचे पत्रे आले जे छ ६ रमजानी तिकडे येण्याविसी श्रीमंत माहा राज राजश्री रावसाहेब यांचा व राजश्री नाना यांचा व राजश्री तात्या यांचा निरोप जाला त्यावरून हे रामधामास जात होते ते राहिले लोकांचा गवगवा आहे. त्यास येथून यानी डाक दाहा कोसावर व चार कोसावर ऐसे येकसेवीस कोस आंपटापुरापावेतो पालख्यांची डाक बसविली दर डाकेस तीन तीन हाती व तीन तीन घोडी व सामीतपेटा व ऐसे बसविले त्यांच्याचे मु॥ भेटी नेमल्या आहेत त्यास डाक बसविली त्या दिवसापासून हे येथ भरतीचा भाग पावतच होते तो छ १५ रमजानी खसमी आली जे छ ८ रमजानी कूच

केले. मजल दरमजल येस असो. त्यावरून त्याचे उतर त्याणी लिहीले जे वद्य १२ द्वादसीस नागपुरास दाखल व्हावे ऐसा मुहूर्त आहे. लौकर यावे पुढे मलमास लागतो. त्यात येथून सेनाधुरधर व राजश्री सेनासाहेबसुभा व राो व्यकोजी भोसले ऐसी छ १७ रमजानीं निघोन पाच कोस व्येहाडास मुकामास गेले. याचे मानस आहे की व्याल्याचे मुकामीं भेट घ्यावी. मग जेथे भेटी होतील तैसेच सेवेसी विज्ञाप्ति श्रुत होईल. सर्व मछुद मडली मुकाम मजकुरी राहिली. समागमे राजश्री पाडुरग गणेश व राजश्री येशवतराव भवानी व राजश्री जानराव येगवत यैसे गेले आहेत. त्या वसावयास सरकारच्या हातनीं चालक दिल्या आहेत. सेवेसी श्रुत व्हावे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति

## २७३

| | | |
|---|---|---|
| रु न. ९६ | श्री | ता २० जुलै १७८७ |
| फा. नं. १ | | पौ. छ १८ सवाल सन |
| पत्र न. १५९ | | समान समानीन अधिक श्रावण |

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञाप्ति ऐसी जे येथील क्षेम ताा छ ४ आधिक पावेतो मुकाम नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकने करून आज्ञाधारकाचें वर्तमान येथास्थित आसे विशप. इकडील वर्तमान तर श्रीमत राजश्री सेनाधुरधर व श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा व श्रीमत राजश्री मनाबापूसाहेब याच्या व श्रीमत राजश्री सेनाबाहादर याच्या भेटी छ २४ रमजानीं जाल्याचें वर्तमान तर साहेबाचे सेवेसी विज्ञाप्ति लिहीलीच आहे, त्यावरून सेवेसी श्रुत जालेच आसेल. त्यास ते दिवर्सी कारज्यास मुाा स आले. छ २५ रोजी कूच केले ते तीस कोस नागपुरास आले. व्येहडापासून सेनाधुरधर पुढे शेहरात आले वाड्यात येऊन देवघराजवल बसून भट व उपाध्ये बोलाऊन मुहूर्त पाहून वाड्यात यावयाचा निश्चये ठरला नंतर राजश्री परसोजीबावा भोसले पुढे भेटावयास कोस दीड कोस तेलगखेडीपावेतो गेले बरोबर तीन च्यार निशाणें व दोन नववदी व सर्वे मछुदी मडली व च्यार पाचसें लोक ऐसे मोठ्या समारभाने गेले त्यास तिकडून सेनासाहेबसुभा व सेनाबाहादर आले सेनाबाहादर याची व परसोजी भोसले याची भेट जाली व मछुदी मडली याच्या भेटी जाल्या. नतर शुक्रवार दरवाज्यात येऊन, हेला तोडून, वाड्यात पाच घटिका दिवस राहाताना येकादसीसह दौवादशीस दाखल जाले. देवदर्शण करून श्रीमत सौभाग्यसपन्न मातुश्री बाईसाहेब याचें दर्शण घेऊन सर्वांच्या भेटी घेऊन बाहादर देवघराजवल येऊन बसले, नतर सेनाधुरधर यास व सेनाबाहादर यास राजश्री भवानी कालो याणी दोन दोन मोहोरा नजर केली व राजश्री भवानी नागनाथ याणी येक येक मोहोर नजर केलीव..रो पाडुरग गणेश व रो बलवतराव भवानी व येशवतराव भवानी व रो माधवराव भवानी व रो जानराव येशवत व रो बाबाजीबावा चिटनवीस व रो उमाजी माहादेव व रो इस्वनाथ जोसी व रो जनार्दनपत व रो व्यंकटराव कृष्ण नि।। होळकर ऐसे याणी आपआपल्या रुदब्याप्रो, कोन्ही मोहोरा व कोन्ही रुपये ऐसे नजरा केल्या. पेठेचे साहूसावकार याणीहि नजर केली. सेनाबहादर येथे येऊन सुरक्षित दाखल जाले याचा संतोष मोठाच जाला आहे. शुक्रवार दरवाज्याजवल येताच तोफा शुरू केल्या तो देवघराजवल येईसतो केल्या. नतर छ २६ रोजी सेनाबाहादर बागबगच्या पाहून आले, व सेनाधुरधरहि गेले होते व राजश्री विठलपत सुभेदार तलेगावाचेच मु।। हून धुरधराचा निरोप घेऊन गेले. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

## २७४

| | | |
|---|---|---|
| रु न. ९६ | श्री | ता. २० जुलै १७८७ |
| फा. न १ | | |
| पत्र न. ३४ | | |

पुरवणी साहेबाचे सेवेसी सेनाबाहादर येथे येऊन सेनाधुरधर यास व सेनासाहेबसुभा व कारभारयाजवल तिकडील लढाईचा मजकूर व छापा आल्याचा व राजश्री तात्यासाहेब याचे शरीर प्रकृतीचे व पुण्यात येऊन श्रीमत महाराज राजश्री रावसाहेब याचें बोलणे जाल्याचे व साहेबाचें बोलणें जाल्याचे ऐसे सविस्तर वर्तमान निवेदण केले. व छ २९ रमजानीं भवानी कालो व भवानी नागनाथ व बाबाजीबावा चिटनवीस याचें बोलणे जाले की, सेनाबाहादर याजकडील लोक आले आहेत त्याचे खर्चावयाचे कैसे करावे ? त्यास रो माहादाजी नाईक काले याचे येथें दिडा लक्षास जागा करून ठेविली आहे, पुढें कैसे घडेल ते पाहावे राजश्री बापूजी मोरेश्वर सलाबतखानाकडे साडे तीन लक्षाचे तगाद्यास पाठविले आहेत. त्याची पत्रे आलें व राजश्री विठल बलाल सुभेदार याची भेट जाली, त्यानी वर्तमान निवेदन केलें जे, दीड लक्षे जमा होत नाहीत सारे दोन लक्षे टके जमा जाले. पुढे कैसे करावें, ऐसे

सिन्यारांत आहेत पुढे जैसे घडेल तैसें सेवेसी श्रुत होइल छ २८ रमजानीं सेनाधुरंधर यांस पित्ताचा आपकार जाला त्यान ते दिवशीं भ्रमीच होते दुसरे दिवसीच भाने करून देवपूजा केली नंतर छ ३ आबीक मासीं धुरंधरांस प्रायःकाळीं ज्वर आल्य आहे परंतु आज्मासज्यातच आहे पुढे घडेल तैसें सेवेसी श्रुत होईल हे विज्ञाप्ति

## २७५

रु. नं ९१ श्री ता २१ जुलै १७८०
फा नं १ पौ छ ७ चिल्काद सन
पत्र नं १५५ समान समानीन श्रावण मास

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञाप्ति ऐसीजे येथील क्षेम ता छ ७ आविक पावेतो सुखम नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष इकडील वर्तमान तर श्रीमंत राजश्री सेनाबहादर येऊन दाखल जाल्याचे वर्तमान तर छ ४ आबिकी साहेबाचे सेवेशी विज्ञाप्ति लिहीलीच आहे. त्यास श्रीमंत माहाराज राजश्री रावसाहेब याचा व साहेबाचा व राजेश्री तात्यासाहेब याचा वगैरे सवाचा निरोप घेऊन वेथून सेनाबाहादर निघाले ते मजल दर मजल येऊन सुरक्षित आषाड वद्य ११ येथदसीस दाखल जाले येविसीचे पत्रे येथून श्रीमंत राजश्री सेना धुरंधर याणी व सेनाबहादर याणी श्रीमत माहाराज राजश्री रावसाहेब यास व साहेबास व राजश्री तात्यासाहेबास व राजश्री आपा फडनवीस यास व रा। राजश्री गोविंदभटजी-बावा यास व राजश्री गोविंदराव कृष्ण काळे व राजश्री गोविंदराव पिंगळे यस ऐसे लिहीले आहेत सेवेसी पोहोचलीच सेवेसी श्रुत होईल सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञाप्ति

## २७६

रु. नं. ९१ श्री ता २८ जुलै १७८०
फा. नं १ पौ छ. ० जिल्काद सन
पत्र नं. १५७ समान समानीन श्रावण मास

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञप्ती ऐसी ज येथील क्षेम ता छ १२ माहे रमजानपावेतो सुखम नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री सेनाबहादर येथे पोहचले येविसीचे पत्र येथून श्रीमंत राजश्री सेनाधुरंधर याणी व सेनाबहादर याणी श्रीमंत माहाराज राजश्री रावसाहेब यास व साहेबास व राजश्री तात्यासाहेब यास वगैरे पत्रे छ १० रवाना लिहीले आहेत त्यानंतरोवर मीहि साहेबाचे सेवेसी पत्रे विज्ञाप्ति लिहिली आहे त्यावरून सेवेसी श्रुत होईल त्यास राजश्री व्यंकोजी भोसले याजला कमरेजवळ मांडीस केशतोड म्हणून फोड मोठा जाला त्यामुळे मोठी सुजोन त्याचा ताप अंगास व ज्वरहि आला त्यास फोड पिकला जाणून सोप्याची सळई घालून छ ८ शेवाली *फोडल्य आतून पू निघाला त्य दिवसापासून* काही आराम आहे परंतु बाहेर निघत नाहींत व सेनाबाहादर याचे जुनगे मागे होते ते राजश्री जैराम गणेश व राजश्री माहादजी लस्करी घेऊन येतात बाळापुराचे मारल्काड आले म्हणून बातमी आहे येथे आल्यास साहेबाचे सेवेसी विज्ञाप्ति श्रुत होये हे विज्ञाप्ति

## २७७

रु. नं. ९१ श्री ऑगस्ट १७८०
फा नं. १
पत्र नं १५९

पुरवणी साहेबाचे सेवेसी नवाबाकडील राजश्री आनंदराव नरसी येथे सेनाधुरंधर याजपासी वकिलीस आसताव ते हैदराबादेस धुरंधर याचा निरोप घेऊन गेले होते जातेसमई बोलले की, येऊ तेथून परतून येऊ. ते आजपर्यंत आले नाहींत त्याचे पत्रे राजश्री भवानी नागनाथ यासी आबिक सुध २ चे आले होते की, आपण लौकरच येतो त्यास रहेमतयारखा दरोगा नवाबाचा त्याकडून साल्यार महमद नामे येथे आले आहेत येथे दरबारी राहाणे बातमीस असावे सेनाधुरंधर याची भेट जाली नाही भवानी नागनाथ याची मात्र भेट जाली धुरंधराची भेट जाल्यावर साहेबांचे सेवेसी श्रुत होईल. सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञाप्ति

## २७८

रु. नं. ९१ श्रीशंकर ता. १ सप्टेंबर १७८०
फा. नं १ पौ छ ० जिल्हेज सन
पत्र नं. ० समान समानीन भाद्रपद मास.

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञाप्ति ऐसी जे, येथील क्षेम तागाइत छ १८ माहे जिल्काद

पावेतो मु॥ नागपूर येथें साहेबाचे कृपावलोकने आज्ञाधारकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. येथील वर्तमान तो सेनाबहादर यास समाधान नवतें हे पूर्वीच छ माहे जिल्कादचे पत्री विज्ञाप्ति लिहीलीच आहे. दशदाने वावयाची योजना आहे. येकदान तो दिधल्यात आले ते लिहीलेच आहे. पुढे दाणे देतील ती लिहीण्यात येतील छ. ९ पासोन सेनाबहादर वाडीयातच होते. छ १० काही शरीरी ज्वर होता उपरात उतक्रपता शरीरभोगाची फारसी जाली नाही, नतर छ १४ साईकाली पोर्नमेस चादनीचबुतऱ्यावर येऊन बसले होते. दरबारी सेनाधुरधर व सेनासाहेबसुभे व मुतसदी भवानी कालो सुधा होते. भवानी नागनाथ मात्र नवते, वरकड सर्व होते. अदियाप काहीं सेनाबहादार याची (कामें) पूर्तेपने उलगडन्यात आली नाही. भवानी नागनाथ यास समाधान वायो उसनेचा पाठीतसा होता हे पहले पत्री या पत्राचे मागे लिहीलेच होते. त्यास तेही अजून दरबारीं येत नसतात. त्याची प्रकृत भोगतृत्वाची आहे, निवीष्टता रोगाची नाही, यैस आहे. बगाजी रघुनाथ हैदराबादेस याजकडून वकील तेथे असतात त्यास येथून सरकारचें व भवानी नागनाथ याचे पत्रे गेली. पत्री मार की, नवाबाचें व तुमचे पत्रें येथे सेनाधुरधरास व आम्हास दोन आले आन येथून त्या पत्राचे उतरें पावली नाहीत म्हणोन तुम्हास लिहीलें आहे की, गुजयातच्या व कुलयादच्या कामास माहीतच आहात, त्यास हैदराबादेहोण इभरामखान पठान, कर्नुल कडपेवाले, हे हाजार बारासे लोक व च्यार जरबा बसमतनादेडावर आले, यैसी बातमी येथे आली. खान मार याची जागीर वराडप्रातीस आहे, याजकरिता येत असतील. अडगाव व अकोट व पनज व सुरजी अजनगाव वगैरे पचमहाल येथील झाडेच त्याचे व याचे विठलपत सुभेदार प्रात वराडचे व मन्वरखान याचे विद्येमानें जाले, उभयेताचे पत्रें येथें आलीं, पुढें कपडेकरमार याची सिवंदी भाम तालोख्याकडेस आली, मागील जागीरदार बिलदखान हे येथें आले पाचचार रोज सिताबरडीवर मुकाम करून होते, नतर छ १२ रोजीं खानमार यास भवानी कालो याचे चिरजीव माधवराव भवानी व सावतखान उभयेतास सेनाधुरधर यानी धाडून सिताबरडीवरोन बिलदखान यास वाड्यात घेऊन आले. याची व खानमार याची भेट जाली, च्यार घटका बैसोन, आदर उपच्यार होऊन, विडे देऊन, डेरीयास गेले. याजवर बिलदखानमार यानी दुसरे दिवसीं दरबारीं छ १३ रोजीं येऊन बोलणें केलें की, माहलो-

२०

माहाल साकी बाकी आपले सरकारची जास्ती आम्हाकडेस पडली अन आम्हावर हा वख्त पडला अन कुटूब तो भाहोत आहे याजकरिता आपल्यास बोललें जातें जे, बाकीचा झडच्या या हावालात होत नाही. आम्हीं पेचात, व तशात तगीरी, सर्व प्रकारें कुटूबाची अबरु राहे तो अर्थ, आपले पदरी बालगावे नाही तर नरमदेपार करूण द्यावे, यैसे बोलणें जालें. यानी काहीं उतर निरोत्तर केले नाहीं. आणी खानमार बोलले की, जागा बजागा भाम तालोख्यात ठानें जोरजरबेने आम्ही घेतली त्याचा बदोबस्त जैसा करावयाचा तैसा करावा, येणे प्रो बगाजीपत यासी पत्रें येविसीची लिहीलीयावर सालार हुशेन, नवाब याचा दरोगा रहेमानयारखान याजकडून, हे येथे आले याचा दर्प पूर्वी लिहीन्यात आलाच आहे. सालार हुशेन यानी भवानी नागनाथ यासी भापण केले की, काहीं सरकारातून आमची खर्चाची वेगमी करूण द्यावी, तेव्हा सरकारातून योजना न जाली, निदान कर्जाऊ रु॥ पनास मागू लागला तेही मिलाले नाहींत. भवानीपत यानी उतर केले की, सरकारात दसरीयास दोन रुपये मात्र मिळतील, वरकड पथ या दरबारीं नाही, तेव्हा तो ग्रहस्त छ १३ रोजीं दरबारी येऊन बोलला की, माझे घरीं शादी आहे, मज निरोप द्यावा, मग उभाउभीच चादनीचबुतऱ्यावर सेनाधुरधर याचा निरोप घेऊन छ १४ उषकालीं स्वार होऊन गेला. पत्राचें उतर यानी दीधले नाहीं, व त्यानीही मागितले नाही, येणे प्रो रुष्ट होऊन सालार हुशन गेले. अनी कलकत्याहूण मीस्तर चारलीस अरल कारनवालीस साहेब बहादर व वेनीराम सिवभद्र याचें पत्रें सेनाधुरधर व भवानी नागनाथ यासी येथे आलीं होती, त्यात मार कीं, ईमाजुतदौलासाहेब या कामावर होते, त्यास त्याचा व आपला बहूत प्रकारें श्नेहे होता त्याच प्रो आमचा व आपला श्नेह व घरोबा असावा, पहेलेप्रो सिलसिला चालवावा, व कागजपत्री परस्परें वर्तमान कलत असावें, येणे प्रो व सकराच्यार्ये याजविसी लिहीले होते की, काहीं चौकीचा उपद्रव न लागता हासलासी माफी होऊन श्री कासीस बमये याजसमागमे यात्रा असल ते कर न पडता सुरक्षीत पोहोचून मागती येतील, तोही बदोबस्त करुन द्यावा. त्यास पत्रा अन्वई सकराचार्ये यासी पावते करुन, यात्रा होऊन, मागती आपले कडेस आले हे पोहोचतील, त्यास त्याचें पत्राचे उतर छ १४ रोजी त्याची जोडी आली होती ते पत्रे देऊन रवाना केली अस्तु. विठलपत सुभेदार आज पावेतो अकोटावर होते. हली श्री गणपतीचे उछाहास

आपले घरीं पाहुणे आले व सलाबतखान व महावतखान यांनी अलजपुरीहून रामचंद्र दादो यांस हुजूर पाठविले, करितां उभयेतां बंधू सेनाधुरंधर यांचे भेटीस येतों येविशीं बसून पत्र पाठवावें, म्हणून नागपुरास येऊन, ते रामचंद्र दादा छ १५ येथें दाखल जाले, त्यांस रोखमारी भवानी नागनाथ यांचे समाचारास शाईमर्ली सेनाधुरंधर व सेनासाहेबसुभे व सव मुतसदीसमवेत पंतमार त्यांचे घरास गले होतें दान घटका बसून शरीरप्रकृत पाहून यांचेचें सरकारांतून दवीले त्यास समाधान नाहीं म्हणोन गेले होते त्याच प्रसंगी पंतमार यांचे वाडियांतच रामचंद्र दादो येऊन भेटले अन पत्रें उभयेतां बधूंची छ १६ सेनाधुरंधरास दीधली सिलदखान यांचे प्रकर्णीही कांहीं बोलणे होते असु. विठलपत सुभेदार यांनी पातुरीहोण पुत्रप्राप्ती जाली म्हणोन नजर मोहरा सुमार ५ व साकर पाठविली त छ १६ प्रातःकाळीं त्याबराबीव वकील आपाजी लक्षराव यांनीं हजूर पावते करून विठलपत यांचे पत्र दीधलें त्यांस पुत्र जाला असे रामराम मुकुंद सुभे करंजवाले यांनी हत्ती मनोरगज व ल्हाम हत्ती दोण व हतन्या तीन अनून सरकारास पोहोचावला मनोरगज हत्ती घरप १८ चा आहे चांगला व धीटपनातही आहे सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि

## २७९

| | |
|---|---|
| रु. म ९६ | श्री ता. २ सप्टेंबर १७८० |
| फा नं १ | पौ छ २० जिल्हेज सन |
| पत्र नं ५० | समान समानीन भाद्रपद मास |

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घरप कृतानेक विज्ञाती एसीजे, येथील क्षा। ता। छ ७ जिल्हेज पावेतो मुकाम नागपूर येथें साहेबांचे कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचें वर्तमान येथारथीत असे विशेष इकडील वर्तमान तर छ १८ जिल्कादी साहेबांचे सेवेसी विज्ञाती लिहिलीच आहे त्यानंतर श्रीमंत राजश्री सेनाबहादर यांची शरीर प्रकृत दिवसें दिवस बरीच आहे, परंतु केवल आरोग्य जाले नाहीत त्यास मूर्ती विष्णूची व लक्ष्मीची व गरुडाची ऐसे पुण्याहून आल्या त छ १९ जिल्कादी येथ दाखल जाल्या त्या तोफखान्यांतच सिताबर्डीवर ठेविल्या त्यास पाहावयास प्रातःकाळीच श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभे गले, मूर्ती पाहून बहुत संतोषे जाला, तेथून येऊन श्रीमंत राजेश्री सेनाधुरंधर यांस वर्तमान सांगितले जे, जैशा मूर्ती असाव्यात तैशा आहेत, त्यावरून सेनाधुरंधर यांचीही मर्जी बहुत खुश जाली सकरदऱ्याच्या बागाजवल देऊळ बांधावयास जागा नेमून सांगितला आहे व राजश्री चिंतामण नाईक बांकर पुण्याहून श्री माहायात्रेस जावयास आले ते छ १८ जिल्कादी संध्याकाळी आले सेनाधुरंधर यांची व सेनासाहेबसुभा यांची व सर्वे मधुरी मडळी यांची भेट घेतली राजश्री उमाजी माहादेव यांचे बागांत उतरले होते तेथून दुसरे दिवशीं राजश्री विठल बल्लाल सुभेदार यांचे वाड्यांत जागा दिले, आनी बाहे मानूस दोनसें यांचा सरंजाम सिदा व खासमाजी व फाटे सकूज व घोडयांस दाना वैरन ऐसे जो पावेतो होते तो पावेतो दिल्हे दानच्यार रोज राहून अगत्य सागत्य बोलणें जालें पुण्याचे मुकामीं सेनाधुरंधर यांणी खर्चासाठी नाईक मजकुरनिलेन्या ऐवज कर्जाऊ घेतला होता त्यापैकीं सा हजार सासे साठ रुपये येथें दिल्हे, कर्जाची हुंडी करून दिल्हे. छ २२ जिल्कादी निरोप घेतला त्यास वस्त्रें कंदी पागोटें व शालजोडी हिरवी व महमदी पवणीची व किनखाप येणे प्रो वस्त्रें दिल्हे बाह्यास ठेट येक बक्षीस दिल्हा, व बरोबर राऊत पंचवीस पाहारा यक सिवणीलेपर्यंत पावेतो दिल्हा व कलकत्यास फिरंगी यास व यो वेनीराम सिवमझ यास पत्रें दिल्हें जे, चिंतामन नाईक बांकर हे श्री माहायात्रेस जात आहेत तर यास व यांबरोबर यात्रा आहे त्यास हासील चौकी न पडे तें करावे, ऐसे माफीचे पत्र दिल्हें यात्रा करून सुरक्षीत येई ऐसें करावे, ऐसा बंदोबस्त करून दिल्हा आहे राजश्री भवानी काळो यांचे येथें निरोपास गले, त्याणी सेला पागोटे पैठणी दिल्हें तेथून राजश्री कृष्णराव माधव चिटनवीस यांचे येथें गळे, त्यांनी सेला पागोटें कुसुंबी नागपुरी दिल्हे, तेथून राजश्री भवानी नागनाथ यांचे येथें गळे, त्यांनी नागपुरी सेला पागोटें दिल्हे, ऐसा सर्वाचा निरोप घेऊन कूच करून साहा कोस गोंडेगांव टेकाडीस गले तेथून दुसरे दिवसी श्रीरामक्षेत्रास गले व छ २१ जिल्कादी सेनासाहेबसुभे व राजश्री श्री चिमणाजी भासले ऐसे भवानी नागनाथ यांचे येथें गले होते सलाबतखान प्रकरणीं बोलणें जाले तर्थ भवानी काळो व राजश्री बाजीराव बेरारकर राजश्री रामचंद्र दादू ऐसे होते, नंतर या बोलजी मनाशी करून मीस यांचे येथ फराळास गळे, तर्थ साभाप्यावीसंपन्न मातुश्री माहादेव व राजश्री परशोजी भासळे एहे आले होते, फराळ करून विडे घेऊन वाड्यांत आले, नंतर

सध्याकाली दधिकदणास सेनाधुरधर व सेनासाहेबसुभा व सेनाबाहादर व व्यकोजी भोसले व परसोजी भोसले ऐसे गेले होते, दधिकदग होऊन परसाद दर खाशास येक तबक भरून बरफी व पेडे व बतासे व केले व येक येक नारेल ऐसे तपके भरून पाठऊन दिल्हे, याणी विडे घेऊन वाड्यात आले. त्यास छमजकुरी भवानी नागनाथ वाड्यात आले होते त्या दिवसापासून दरबारास येत असतात शरीरप्रकृत काहीसी बरी आहे छ. २६ जिल्कादी कृष्णराव माधव चिटनवीस याचे येथे दधिकदग जाले तेथे सेनाधुरधर व सेनासाहेबसुभा व व्यकोजी भोसले व सर्व मछुदी मडली ऐसे गेले होते दधिकदग होऊन, नतर परसादाची तपक दोन च्यार भरून, बरफी व पेडे व बतासे व केले व येक नारेल ऐसे पाठऊन दिल्हे, नतर विडे घेऊन वाडयात आले त्यास छ २७ जिलकादी सेनाधुरधर यास ज्वरे आला होता, स्नान देखल केले नाही, दुसरे दिवशी श्नान केले, त्याम उजव्या पायास गुडध्याचे वाटीखाली जवलच केसतोड जाला, त्याने दोन तीन रोज अलफासलफातच गेले, नतर दिवसेदिस केसतोड बलकाविला, त्याने आगास कडागी येती, दोन दोनच्यार रोज वाड्यातच आहेत, राजश्री विटलपत सुभेदार याचे वाड्यात गणपती होत असतो तो आनावयास छ २ जिल्हेजीं सेनासाहेबसुभा व सेनाबाहादर व व्यंकोजी भोसले व परसोजी भोसले ऐसे प्रा.यकाली स्नान करून च्यारी जरीपटके घेऊन व हातीवर नवबदी घालून व तासे मोरफे ऐसे घेऊन मोठ्या समारभाने गेले तेथे जाऊन गणपतीचे पूजेन करून, पालखींत घालून, घेऊन आले, तो सेनाधुरधर वाडयाहून मानसाचे खाद्यावर हात देऊन, वहुत श्रमाने बाहीर चादणीचौत्र्यावर येऊन बसले गणपती वाड्यात आनिला तैसेच गणपतीचे दर्शण घेऊन बरोबर देवघराजवल आले, वहुत श्रमसे वाटू लागले, मग तैसेच वाड्यात गेले, शरीर प्रकृत ठीकसी नाहीं. त्यास दाहा घटीकाचे आतच गनपती बसविला, पूजा करून आरती जाली आरतीचे वेलेस तोफाची व गारद्याची सिलक जाली, व तोफखाण्यातही तोफा करविल्या, व नित्य रात्रौ किरतन होत आहे, व दिवसास कलवातनीचा नाच होत असतो, व गवै गात असतात, ऐसा सालदरसालप्रो गणपतीचा उछव होत आहे. व इभरामखान याची पत्रे वासीमचे मुकामचीं येथे सेनाधुरधर यास छ जिल्हेजी आले व छ २९ जिलकादी हातीची व वाघाची लढाई वाड्यापुढे लाविली होती हाती निऊन वाघावर घालीत परतु कोन्ही वर जाईना दहशेद खाऊन पलाले नतर सभुपरसाद बाका जुना बगालि दास नि ××× तेव्हाच मारिला मोठा पटाईत वाघ होता दुसरे दिवसीही येक वाघा तैसाच मारिला हाथी धीटाई चागला आहे, व छ ३ जिल्हेजी सेनासाहेबसुभा व सेनाबहादर व व्यकोजी भोसले व परसोजी भोसले ऐसे सकरदऱ्याचा बाग पाहावयास गेले होते साहेबाचे सेवेसी श्रुत व्हावे सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

## २८०

रु. न ९६ **श्री** ता २९ सप्टेंबर १७८७
फा न १
पत्र न. २२१

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घरपे कृतानेक विज्ञाप्ति ऐसी जे. येथील क्षम ताा छ १६ जिल्हजपावेतो मुकाम नागपूर येथे साहेबाचे कृपावलोकने करून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित आसे विशष इकडील वर्तमान श्रीमत राजश्री सेनाधुरधर याचे पायास केसतोड जाल्याचे व श्रीमत राजश्री सेनाबाहादर याचे शरीरप्रकृत बरी आहे व सलाबतखान परकरणी रा रामचेंद्र दादो यासी बोलणे जाले हे तर छ ७ जिल्हजी साहेबाचे सेवेसी विज्ञाप्ति लिहीलेच आहे त्यानतर छ ८ जिल्हजी धुरधरानी सलाबतखान यासी पत्रे देऊन रामचेंद्र दादो याची रवानगी केली व श्री गणपतीचा उछाहव साल दरसाल प्रो होऊन भाद्रपद शुध ९ रात्रौ ललीत जाले आनि दशमीस सात घटिका दिवस राहाताना हातीवर नवबदी व निशाणे घालून मोठ्या समारभाने गणपती नेऊन शुक्रवार तल्यात बोलविला. बरोबर सेनाधुरधर व श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा व सेनाबाहादर व राजश्री व्यकोजी भोसले व परसोजी भोसले व मछुदी मडली ऐसे होते गणपती बोलऊन वाड्यास आले. त्यास सेनाधुरधर याचे उजव्या हातास वावोचा उपद्रव आहे म्हणून बोलत आसतात. त्यास नित्य लेप करून सेकावे लागत आसते व केसतोडाचाहि आजार पायास त्यास बाहेर वारियात व सरदीत गेले म्हणून ते दिवसी काहीसे श्रमी जाले त्या दिवसापासून शरीरप्रकृत बरी आहे व छ १२ जिल्हेजी राजश्री बाबुराव पालकर सेनाबहादर याचे सासरे याचे येथे भोजेनास सेनाधुरधर व सेनासाहेब व सेनाबाहादर व व्यकोजी भोसले व परसोजी भोसले व सोभाग्यादिसपन बाया आदीकरून

गले होते मोजेन करून पानदान आतरदान करून सेनाधुरंधर यास व सेनासाहेबसुभा यास व सेनाबहादर यास व व्यंकोजी भोसले यास ऐसे सेले पागोटे पांढरे दिल्हे व परसोजी भोसल्यास पैठणी सेल्ह पागोटे कुसंबी दिल्हे. या पांडुरंग गणेश यास कुसंबी सल्ह पागोटे दिल्हे बाकीस कोणी दिल्हे नाही नंतर दिवे लाऊन वाड्यास आले त्यास कपिलाषष्टीस ब्रह्मांडदान करायाचे श्रीरामक्षेत्रास जावे न जावे ऐसे होतेच वैशाख मासेनहि बहुत लागला व वाटेस स्नान नदीहि भरली म्हणून दानाची योजना येथेच केली त्यास छ १५ जिल्हेजी प्रातःकाली सेनाधुरंधर यांणी स्नान करून देवपूजा करून देवघराजवळ येऊन बसले श्री रामभी चाचा उपाध्या व नाना उपाध्या व येसोबा शास्त्री व नारायेणभट सारधूल व श्रीमान्य वैद्य व भवानी काळे व या बानराव येशवंत व रो नागाजी चिटनवीस ऐसे बसऊन ब्रह्मांडदानाची योजना करून शांतीस लागले साहेबांचे सेवेसी श्रुत होवे साहेबांनी तेथून मूर्ति विष्णूची व लक्ष्मीची व गरुडाची ऐशा पाठविल्या त्या पावल्या तेव्हा सेनासाहेब यांणीच पाहिल्या होत्या नंतर सेनाधुरंधर यांणी व व्यंकोजी भोसले यांणी पाहून बहुत संतोष जाले मूर्ति सक्करदऱ्याचे बागात हावेलीत नेऊन ठेविले आहेत देऊळ तयार करीत आहेत त्यास त्या मूर्तीचे उत्तर व साहेबी स्वराचे सिरसीमाघदचे उत्तर व हुकमा करून पाठविती म्हणून पत्र पाठविले आहेत व रामभी बाबूजी सिवदेव यांचे पत्रें आले होते त्याचेहि उत्तर पाठविले आहेत व येथून यांणी रामभी आपा बलवंतराव यासहि पत्रें लिहिले आहेत साहेबास श्रुत व्हावे साहेबांचे सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञप्ति

छ १६ जिल्हेजी साहेबांचे सेवेसी विज्ञप्ति लिहीतोच आहे त्यानंतर कपिलाषष्टीचे दिवशीं सेनाधुरंधर यांणी ब्रह्मांडदान केले सुवर्णाचे ब्रह्मांड तीनसे चोवीस तोळे होते त्यावर दक्षणा दोन हजार रु॥ दिल्ही व दाहा गोप्रदान सिंगे सोन्याची व खूर रुप्याचे करून प्रतिगोदानावर दक्षेना मोहरा पांच ऐसे दोघा उपाध्यास व चोवीस शास्त्रीमंडळी यांस दिल्हे व ब्रह्मांडाचे अवयवाचे विभाग सवीस केले तेहि दोघा उपाध्यास व शास्त्री चोवीस येकून सवीसास दिल्हे व सेंभर गोदान प्रती गोदानास रुपये पांच दक्षणा या प्रो तेलंग ब्राह्मणांसी देऊन आणिक ब्राह्मण राहिले त्यास ब्राह्मण पाहून रुपया आर्धा रुपया पावला भुरसी दक्षेणा दिल्ही यासिवाये श्रीमंत रामभी सेनासाहेबसुभा यांणी पंचवीस गोदान प्रती गोदानावर दक्षणा रुपये पांच व श्रीमंत रामभी सेनाबहादर यांणी दाहा गोदान प्रति गोदानावर दक्षणा मोहोर येक व रामभी व्यंकोजी भोसले यांणी गोदान पांच प्रती गोदानावर दक्षणा रुपये पांच व रामभी परसोजी भोसले यांणी गोदान पांच दक्षणा रुपये पांच व सौभाग्यादिसंपन्न चिमाबाई यांणी गोदान दाहा प्रती गोदानावर दक्षेना रुपये पांच व रा सोमाजी मोहिते धुरंधरांचे आजे यांजकडोन देविले गोदान दाहा प्रती गोदानावर दक्षणा रुपये पांच येकूण गोदान येकसें येकसष्टावर दिल्हें ब्राह्मणभोजन चालीं लागले आहे. प्रती ब्राह्मणास दक्षणा पावला यावेगळें नारदादि वगैरे इतरयासी भोजेणदक्षणा पैसा अधू येक येणें प्रो दानें दिल्हे साहेबांस श्रुत व्हावे व श्रीक्षेत्रींहून धनकराम्याचे येथें श्रीरामक्षेत्रास आले आहेत त्यास ते येथून श्रीरामेश्वरास जाणार आहेत त्याजवरून सेनाधुरंधरांनी नवाबास पत्रें पाठविलें ज, सुरळीत मार्ग आसेल तिकडून सुरक्षित पोहोचेत ऐसें करावे व येथून दसऱ्याची वस्त्रें श्रीमंत् माहाराज रामभी रावसाहेब यांस व साहेबांस व श्रीमंत रामभी सात्यासाहेबांस व रामभी दामोधरसाहेबांस व रामभी आपा बलवंतराव यांस व श्री रामभी गोविंदभटजीबावा निसुरे यांस व रामभी गोविंदराव कृष्ण काळे यांस ऐसे सेनाधुरंधर सांडणी स्वाराबरोबर रवाना करितात व रामभी चिमाजीआपा भोसले यांजकडे वस्त्रें कुटुंबसुद्धे व श्री रामभी कृष्णभटजी यांस ऐसें वस्त्रे पाठऊन दिल्हें व त्याचे दिवाण या भाऊ माहारेन त्यांस साल दरसाल जात होत ते येंदा मना जाली साहेबांचे सेवेसी श्रुत व्हावे व साहेबी दत्ताजी नाईक वारम्मल इकडे रवाना केले ते येथून चालला फौजांबर आले आहेत ते आज उदेक मु॥मजकुरीं दाखल होतील. टपाल

## २८१

रु. नं ९१  श्री ता. ९ मार्च १७८०
का. नं १
पत्र नं २२०

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपडे कृतानेक विज्ञप्ती ऐसी जे येथील क्षेम ता छ २९ जिल्हेज पावेतो मुक्काम नागपूर येथें साहेबांचे कृपावलोकनें करून आज्ञाधारकाचें वर्तमान येथास्थित आसे विशेष इकडील वर्तमान तर श्रीमंत रामभी सेनाधुरंधर यांणी ब्रह्मांड दानाची योजना करून शांतीस स्थापिले आहे हे वर

जाल्यानतर साहेबाचे सेवेसी श्रुत होईल. व साहेबानी सेनाधुरधरा व सेनाबाहादरास पत्रे पाठविले ते छ २३ जिल्हजीं पोहोचले. ते पत्रे सेनाधुरधराकडे व सेनाबाहादराकडे घेऊन गेलो. प्रविष्ट करून त्यानी पत्रे वाचून सेनाबाहादर आत वाड्यात घेऊन गेले व रो गुज्याबा गुजर धुरधराचे नातू याचे लग्न हाली सालो आहे म्हणून देशीं राजश्री रामराव गुजर आहेत त्यास आणावया येक कारकून व पालखी व घोडी मानसे पा आहे. व मिस्तर चार्लीस आरल कारणवालीस फिरगी कलकत्याहून श्रीकासीस आला तेथून पर्यागास येणार आनि सुजलद्दौला याचा लेक मल्का आमीन आजुतददौला याची भेट घ्यावी म्हणून सावकारी बातमी आहे परतु तथ्य नाही. त्यास सेनाधुरधर याचा विकील राजश्री वेनिराम सिवभद्र तेथे आहे त्यानी तर काहीच लिहीले नाही. त्यास या आगोधर श्रावणमासीं वेनिरामपताचे पत्रे आले होते त्याचे उतर याणीं दिल्हे आनि त्यास लिहीले जे, फिरगी कासीस आल्याची बातमी सावकारी आली आनि तुम्ही काहींच लिहीले नाहीं तर कोठे आहेत ते लिहून पाठवावे. व त्यास सेनाधुरधर व सेनाबाहादर त्याची शरीरप्रकृत बरी आहे. स्वारी बागात जात आसते. साहेबाचे सेवेसी श्रुत व्हावे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

## २८२

| | | |
|---|---|---|
| रु न. ९६ | श्री | १७८७ |
| फा. न. १ | | |
| पत्र न. १३४ | | |

पुरवणी साहेबाचे सेवेसी. कालपीस गेल्यानतर राजश्री बालाजी गोंविद यास व त्याचे कारभारी यास येकाती गवसून विच्यारले कीं, सरकारातून तुम्हास दोन च्यार पत्रे आले परतु त्याचा मान तुम्ही करीत नाही. तर यास प्रात यावयाचा आहे की नाही. तेव्हा त्यानी उत्तर केले की, आम्ही प्रात उगाच कैसा द्यावा. नतर + + उतर केले की, श्रीमत साहेबाची आज्ञा आसेल त्याप्रा द्यावा. त्यास त्याचे बोलण्याचे भाऊ दिसून आले जे, प्रात न द्यावा. तेव्हा मी आपाजीपताचे पत्राचे उतरे मागीतले. त्यानी म्हटले की, आपाजीपत गेले त्यामागे पत्र [फाटले] नातसे कलले मग रामराम करून आलो. त्यास येथे धुरधरानीं म्हटले की, आता आम्हाकडे काहीं नाही. आम्ही काही वेइमान नाही. परतु दौलत आमची बसली तेव्हा मी उतर केले की श्रीमत राजश्री नानासाहेब व श्रीमत राजश्री तात्या (साहे)-ब येकदर जाल्यावर ऐसे घडनार नाही हे साहेबी खातरजमा ठेवावी. तेव्हा धुरधरानी म्हटले + रे खातरजमा तर आहे परतु सध्या ऐसे जाले इतके म्हणून वाड्यात जेवायास गेले. त्यास हे भासेन म्या तेथे किवा येथे कोन्हास कलविले नाही. साहेबी हे पुरवणी तेथे कोन्हास कलऊ न्यायाचे नाहीं. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

## २८३

| | | |
|---|---|---|
| रु. न. ९६ | श्री | १७८७ |
| फा न. १ | | पो छ १ सफर |
| पत्र न. ५५ | | |

पुरवणी साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मलहारजी वोरवे कृतानेक विज्ञापना ऐसीजे. हासतेखान जालनापुरकर याजकडेस बदगानअलीकडोन जागीर खेडल व मलकापूर वगैर दोन लक्ष ब्यासी हाजाराची जागीर होती तो मारनीले जिवत असता काही येक रोज जागीर चालली नतर या काले त्याचा मृत्यु जाला पुढे त्याचे दोन पुत्र खासा येक व कलवतनीचा येक त्यास कलवतनीचे लेकावर तो सरकारची मेहेरबानगीच परतु खासे पुत्रावर इतराज बदगानाअली होऊन ××× साहेबजादीयाचे खालसा दिल्हा त्याजकडोन विलदखान पाचसे स्वारानसी माहाली ठाणे बसवयाकरिता सरकारातून तैनातेस व इनायेतनामे हासमतजग व बलोलखान इसमायेलखानाचा पुत्र त्यासही इनायेतनामे यैसे घेऊन माहाली आले पुढे अवघे येकत्र होऊन माहाली ठाणे बसविले पुढे हास्तेखान याचे पुत्रानी पैगाम बाईसी करोन पचवीस हाजार रुपये घ्यावे मागती अमल माहाली हास्तेखान याचे पुत्र व्हावा यैसा करार जाला तेव्हा हासतेखाचा पुत्र सवाईखान याणे घरचे जवाहीर वगैर तडा मोडा करून पचवीस हाजार रुपये दिल्हे माहाली अमलही बसविला ते बातमी सरकारात पोह्चताच मागती बाईवर इतराजी जाले की त्याजला जिवत धरून माहाली अमल बसवणे त्याजवरोन मागती इनायेतनामे अवरगाबादेकर सुभा यास व हासमतजग यास पाठविले त्याजवरोन अवघे मिलोन दोन हजार गोला जालेत सवाईखान सेसवासे स्वारानसी खडल्यात आहे परतु दो हाजाराचेही ताल पडत नाहीत त्याने खेडल्यात दोनच्यार घरेही

सानले दाणेक लक्षाचे जागा त्यांनी काढली ते सिपायास देऊन बनव होऊन मग्ना × × मसलत आहे. पुढे काये घडेल ते खरे. परंतु या वेळेस येसा प्रकार आहे म्हणून येसी खातमी येथे आली आहे यावर काये घडेल ते साहेबांचे सेवेसी श्रुत होईल हे विज्ञप्ति

## २८४

रु. नं ११ थीनफल्ल ता २२ जून १७८८
फा. नं १
पत्र नं १२५

विज्ञापना येसी जे छ १४ माहे रमजानी मध्यस्तानी हुजुरात जाहीर केली जे, पुण्याकडील टपा आला आहे तो नजरगुजार करून गुजरला पाहिजे त्याजवरून हुकूम जाला जे छ १६ रोज घनवारी दोन प्रहर हाजर होणे त्यास कमतरीनहुकूम मध्यस्त व राजश्री सायेद आबघूतराव यांचे पुत्र राजश्री माधोराव व राजश्री धनेरपंत यांजला हुजुरात घेऊन गेले टप्प्याचे पत्रे वाचून दाखविले त्याजमध्ये श्रीमंत महाराज राजश्री साहेब फौजसह यासी यहाचा मजकूर लिहिला होता जे, येसे मानसे दक्षनेत साहेबहुजुरआत प्रतापी व दूरअंदेश पुढे होणे कठीण सांप्रत श्रीमंत महाराज राजश्री बापूसाहेब व श्रीमंत महाराज दादासाहेब व श्रीमंत महाराज राजश्री नानासाहेब इहि कितेक मरातिबास व गस्त्यास दूरअंदेसीचे मार्गे कायमच समजून आहेत, त्याजला स्याहाये व मुत्सद्दी यांचे कारण नाही त्यास हजरतीण पूर्वीच सिलसिल्याप्रमाणे नक्शा कायम ठरून पाहिजे तैसे पत्रे परान्याचे माग व मावमपूर्वीची सिलसिलात दस्तकखर्चीची लिखत त्याजकडेस पाठऊन बिलकुल दफ्तरील सदर विकडेस हजरतीणहि सदर ठेवण सल्लाह त्याजवरून हजरतीणहि पत्रातील आन्वये मजकूर करून फर्माविले की, इकडूनहि पूर्वील सिलसिल्याप्रमाणे व नक्शाप्रमाणे व तिकडील चिठीत्यावर लक्ष्ये देऊन करीनसल्ल्याने तेच आमलात यावा. सिलसिलात वगैरे पत्रे तयार आहेत व मीरहैदरखान मुनसी याचे मार्फत इमतडणखान नामे याजला त्याजबरोबर व्यवस्थेने रवाना केले नंतर पुण्याचे पत्रात उमरखान वगैरे येथील गुलामाचे दास्तानाचा मजकूर लिहिला तो मजकूर देखून मध्यस्तानी माधवराव सायेराजी व धनेर बापुराव या उभयतास उत्तर केले की, तुमचा एवज देणे याजमुळे सतर लाख रुपयाचे वराड प्रांत बिलकुल तुमचे स्वाधीन करिता आमची आमलदारी ता बिलकुल गर्दी राजा मुधोजी भोसले यांचे कबज्यात गेल्यामुळे मुलूक गारद जाला पुन्हा पूर्ववतप्रमाणे मुलूक आमचे कबज्यात येणे व आमलदारी कायेम होणे याजला दाहा वर्षे पाहिजेत तेव्हा शमशुद्दौला बाहादर व पासीमिया या उभयेतानी अर्ज केला जे, सांप्रत हा प्रसंग आहे दाहा वर्षे कशास पाहिजेत दाहा महिन्याचे काम आहे सरकारिता हुजूरचे हुकूम जाल्यास लवकरच आमलात येईल तेव्हा मध्यस्तानी दौलतमंदुल्यासी उत्तर केले की, तेहि आज मोमाचे आहेत येसे नाही यांचे पाठी खिसारा वा चंदरचंद मुश्कील आहे हे उभयेतांचे म्हणणे मुसम्मानी आयेकोन हास्यवदन करून फर्माविले की, वर्षाच्या गोष्टी महिन्यावर आल्या तेहि गनीमत मोजावे नंतर माधोराव सायेराजी व धनेर बापुराव या उभयेतास हुकूम जाला जे आराम करावे उभयेता सलाम करून गेल्यावर मध्यस्तासी दोन घटका येकांत जाला नंतर हजरत बरखास्त फर्माऊन माहालात गेले सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना

## २८५

रु. नं ११ भीनफल्ल ता २५ जून १७८८
फा. नं १
पत्र नं १२६

विज्ञापना येसी जे छ १९ रमजानी सैद रजा व रोशनखान यांचे बंधू वगैरे कितेक मनसबदार मध्यस्तांचे येथे हाजर[त] होते व आशीकिताहि ते समई हाजर होता तेव्हा मध्यस्तानी फर्माविले की, राजे रघोजी भोसले व पासीमिया याची दोस्ती व येकदिली परस्परे करावी व चाकरी व नाव बरे येसे पाठवावे, येसे आसता त्यांणी हातुपाय नाना प्रकारे आज करावे व मुख्य हजरतीचे दिलात किंचीक दरम्यान धोक्याचे ते हारवक्त मांडून विपरीत कारण करितात हे गोष्टी कसी! इतके आसता तिकडून सिलसिला ज्यारीच आहे हे फार तानूस आहे. तेव्हा आशीकितानी आज केला जे येसीयासी यांन्ही हातुपाय केल्याहि आज करा परंतु आमची खातरजमा आसी की, मुख्य हजरतीची खातमुबारक व आपण आमचे दौलतीचे नखकार मकुलच दूरअंदेश तेव्हा जे करीनसल्लाह तेच दूरअंदेसीचे पाठी आपण चालवितील. तेव्हा फर्माविले की, तिकडील सिलसिला पूर्ववत् ठेविल्यास इकडेन दोस्तदारीस कसूर होणार नाही सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## २८६

र न. ९६ श्री नकल ता. २६ जून १७८८
फा न. १
पत्र न. १२७

विज्ञापना यैसी जे, छ २० माहे रमजानी मााद सलाबत खान बाहादराचे पत्रे मध्यस्तास आले. त्यात मजकूर लिहीला की, आम्ही नागपुरास मातमपुर्षीचे वस्त्र घेऊन गेलो. त्याजवरून खफा होऊन फर्माविले की, मााद सलाबतखान बाहादर लाखोच रुपयाचे जागी राखतात. परतु हाजुरातीत वर्तमान राजे मुधोजी भोसले याहाचे न लिहीले. येव्हडी मोठी गोष्ट आसता न लिहीली हे अपूर्व आहे. नाहाक मुफतात जागिरा खातात. शर्त नवकरीची यैसी आसत नाही नवकरीची खवाफ त्याचे दिलावर बिल्कूल नाहीच नाही. हे गोष्ट त्याचे हाकात फार वाईट आसे. याप्रमाणे भाशन केले. याजबरोन विन्नाप्ती लिहीण्यात आली आसे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

[वरील तीन नकला निजामाकडील पत्राच्या]

## २८७

रु. न. ९६ श्री १७ ऑगस्ट १९८८
फा न १
पत्र न १३०

माा मल्हारजी वोरपे यासी बालाजी जनार्दन आसिर्वाद सुाा तिसा समानीन मया व अलफ तुवा छ ६ शाबनची व छ २६ सवालची पत्रे पाठविली ती पावली. भवानी काळे याचा मजकूर (हा शब्द खोडला) व दुखवट्याची वस्त्रे गेली नाहीत येविसीचा मजकूर (खोडला) व मडळे प्रकर्णी वगैरे मजकूर बोलावयाकरिता दताजी तोरडमल याची रवानगी केली आहे 'दर्शनाती सर्व वि' (आवतरणातील मजकूर खोडला) म्हणौन लिाा ते कळले ते कळले ऐशास दताजी कुसाजी तोरडमल येथे येणार आहे आल्यानतर सविस्तर बोलण्यात येतील त्याप्राो लिहून पाठवीत जाणे. पुढे होत जा लिहीत जाणे

[पाठीवर]

उतरे गेली [पत्र नाना फडणिसाचें].

## २८८

रु न. ९६ श्री ता. २१ ऑगस्ट १७८८
फा. न. १
पत्र न. ९६

पुरवणी साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञापना ऐसीजे. राजश्री सोमाजीराव मोहिते याची बोली कैलसवासी सेनाधुरधर यानी सात हाजारा रुपयाची जातीस करून दिल्हे होते. त्याचा सरजाम लाऊन दिल्हा होता. साप्रत त्यानी सेनासाहेबास विनती केली जे, चालीस घोडी खाजगत आहे याचा बदोबस्त करून द्यावा. त्यावरून सेनासाहेब यानी उत्तर उत्तर केले जे पेशजी तुमचा बदोबस्त आपासाहेबानी करून दिल्हा त्याप्राा दोन च्यार महिणे चालो द्यावा नतर पुढे घोड्याचाही बदोबस्त केला जाईल. मोहिते आपले घरी रुसव्याणे आहेत. सेनासाहेबानी बोलाविल्यास दरबारास येतात ऐसे आहे. पुढे घडेल तैसे सेवेसी लिहून व सेनाधुरधर कैलासवासी जाल्या दिवसापासून गगाजान्हवी मातुश्री चिमाबाई देवदरात येत नाहीत म्हणून माहादेवाचे लिग सोण्याचे तिशा तोल्याचे केले त्याची प्राणप्रतिष्ठा छ १५ रोजी केली ब्राह्मणास दर आसामीस अधिली दक्षेणा दिल्ही. चोर धरले होते त्यापैकी तिघाचे हात छ १७ रोजी तोडोन सोडून दिल्हे सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति

## २८९

रु. न ९६ श्री ता. २२ ऑगस्ट १७८८
फा. नं १ पैाा छ ५ जिल्हेज
पत्र न. ८९ भाद्रपद तिसा

यादी नवाबाकडोन मातमपुर्षीचे वस्त्रे व जवाहीर आली ते गुजरली वितपसील.

५ सेनासाहेब सुभा यास
 १ नवाबाकडील
  ४ खिलआत कारचोबी पारचे
   १ दुशाला
   १ किनखाब
  २ जवाहीर
   १ सिरपेच
   १ जेगा
   —
   २
 —
 ८

३ साहेबजादे याकडील
　१ सिकंदर ज्याहा
　　४ कुरत्याची पारचे
　　१ दुशाला
　　१ किनखाब
　　१ सिरपेच
　　७
　१ फरुखुनज्याहा
　　४ कुरत्योची पारचे
　　१ दुशाला
　　१ किनखाब
　　१ सिरपेच
　　७
　१ उमदतुल्मुल्क बाहादर
　　४ कुरत्योची पारचे
　　१ दुशाला
　　१ किनखाब
　　१ सिरपेच
　　७
३ २१
　१ मायनुदवला याजकडील
　　४ पारचे कुरत्योची
　　१ दुशाला
　　१ किनखाब
　　१ सिरपेच
　　७
८ २८
२ आपांस साउथा भाउत्या २ नबाबाकडील
　४ सेनाबहादर यास
१ नबाबाकडील
　　६ वस्त्रें
　　१ सिरपेच
　　७
१ साहेबजादे तीघे याजकडील
　　१८ वस्त्रें
　　३ सिरपेच
　　२१
४ २८

४ व्यंकोजी भोसले
　१ नबाबाकडील
　　६ वस्त्रें
　　१ सिरपेच
　　७
　३ साहेबजादे यांजकडील
　　१८ वस्त्रें
　　३ सिरपेच
　　२८
४

सदरहू येणे प्रमाणे

## २९०

रु. नं ९६ श्री ता. २२ ऑगस्ट १७८८
फा. नं १
पत्र नं १०

पुरवणी साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपडे कृतानेक विज्ञापना येसीजे नबाबाकडील मातमपुर्सीचे वस्त्र तेथून रवाना जाले म्हणून पेशजी सेवेसी विनंती लिहिलीच आहे सांप्रत त्याजकडील मुनशी यांचा भाऊ नामे इब तख्तस्थान छ १४ (जिल्कादी) सोनेगावास आला छ १५ प्रायश्चली त्याजकडील रघुनाथपंत कारकोन त्याजबराबर अर्जदस्तोजी घेऊन पुढे पाठविला राजश्री भवानी नागनाथ यांचे येथे आला त्यासी भेट घेऊन वर्तमान सांगितले खान मजारेनीले मातमपुर्सीचे वस्त्र घेऊन आले ते सोनेगावी मुक्कामावर आहेत आमची राजश्री सेनासाहेबासी भेट करून यांसी पुढे खान मजारनिले यांचे येण्याची आपले व सेनासाहेबांचे विच्यारे ठरेल त्याप्रमाणे करणे जाईल त्यावरून भवानीपंत मुनशी यास समागमे घेऊन सरकारचे वाड्यात आले सेनासाहेबास त्यांचे हाते दोन रुपये नजर ठेऊन भेटविले मुनशीनें सांगितले की खान मो॥ रनिले सोनेगावी आहेत त्यास कोणत्या वाड्यात जागा यांसी यांविशी आज्ञा जाली पाहिजे त्यावरून रहमान खान पठाण आलजपुरकर यांच्या वाड्यात जागा यांसी आणि कारकोनास आज्ञा जाली की त्या वाड्यात येऊन राहाणे त्याचा कारकोन जाऊन खान मोशरनिलेस छ मजकुरी घेऊन आला छ १५ सेनासाहेब व राजश्री सेनाबहादर व राजश्री व्यंकोजी भोसले व राजश्री परसोजी भोसले व मनसुर महाली

आदीकरून भले लोक येैसे दरबार करून बसले. राजश्री सदाशिवरावजीस पाठऊन खानमानिलेस घेऊन आले त्यासी त्रिवर्ग बधु व मत्तुदी आदीकरून भेटिले मुनसीने त्यास विच्यारीले की तुम्ही हैदराबादेहून कधी निघाले त्याणी उतर केले की आम्हास चालीस दिवस हैदराबाद सोडून जाले प्रजन्न भारी यामुले वाटेस दाहावीस जागा बजागा मुकाम जाले येैसे म्हणून पत्रे नबाबाची व त्रिवर्ग साहेबजाद्याची व मोयेनुदवला याचे दिल्हे ते वाचून पाहिले. सरकाराहून पारचे रुपयाचे मागोन वेऊन वस्त्र त्यात घाल्न गुजरेले. ते सोडून न पहाता तैसेच बिदडे जामदारखाण्यात पाठविले खानमारेनिले सलाम करून आपले मकानावर गेले नतर मागाहून सदाशिवरावजी याचे समागमे सरकारचे खजमतगार व जासूद देऊन खर्चास रुपये पाचसे पाठविले. त्याणी खिजमतगारास व जासुदास पधरा रुपये इनाम दिल्हा वस्त्रे मातमपुर्षीचे मात्र दिल्हे जवाहीर दिल्हे नाही म्हणून छ १८ रोजी खान वाड्यात येऊन सेनासाहेब व सेनाबाहादर व व्यकोजी भोसले यासी जवाहीर दिल्हे. नवाबाकडील सिरपेच बाधले व जेगा लाविला व साहेबजाद्याकडील व मोयेनुदवला याकडील त्रिवर्गबधूस ज्याचे त्याजपुढे ठेविले. वस्त्रची व जवाहिराची आलाहिदा याद आहे त्यावरून श्रुत्य होईल सेवेसी श्रुत्य होये हे विज्ञापना

## २९१

श्री ता. २३-८-१७८८

रु न ९६ पौ छ ३ जिल्हेज

फा. न १ भाद्रपद

पत्र नं. ८६-८८ तिसा समानीन

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञापना येैसी जे येथील क्षेम ता। छ २० जिलकाद पावेतो मुकाम नागपूर साहेबाचे कृपावलोकने करून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित असे. यानतर इकडील वर्तमान राजश्री सेनासाहेबसुभा व राजश्री व्यकोजी भोसले व कारभारी मिलोन मालेमामलतीचे कामे करितात. राजश्री सेनाबाहादर श्नान करून देवपूजा प्रहर दहा घटका परीयेंत जेपज्याप आदीकरून करीत आहेत नतर वाड्यात जाऊन भोजेन करून निद्रा करावी. बागात जावे. येणेप्रमाणे नित्य मर्जीस आले तर दोन घटका कचेरीस त्रिवर्गानी येकत्र बसावे. श्री विठोबास जागेश्वरास सेनासाहेबाची स्वारी गेल्यास समागमेही जातात, त्यावरून दताजी नाईक तोरडमल व उदाजी नवघरा जासूद याजकडील छ २६ शवाली साहेबाकडे रवाना केल्या दिसापासून मोहगमातच आहेत. राजश्री लक्षेमणराव पानटकर लोकाचे देण्यामुले दोनच्यार महिणे सरकारच्या वाड्यात होते. पगतीस जेऊन तेथेच निद्रा करावी स्वारी सिकारीस सरकारचे घोड्यावर बसून जावे त्यानतर त्याचे लोकानी पाटनकर मारनिलेची बातमी राखून चादनीचौक्यावर गाठ घालून गोटात घेऊन गेले दुसरे दिवसी दाहा कोस याहाडास गेले. त्याचे समजाविशीकरिता राजश्री सुमानराव रननवरे यास जा म्हणत होते, त्याणी उतर केले जे, कोन्ही सरकारचा ग्रहस्त समागमे द्यावा, त्यावरून सेनासाहेब म्हणू लागले जे, तुम्हीच सरकारचे आहा, तुम्ही जावे त्याणी उतर केले की, त्याजकडे सरकारचे कर्ज आहे म्हणून आम्हास येकटे जाणे पुरवत नाही. त्यावरून त्याची तेरीख बद केली. त्याजकडील माहाल येनिकोटे उब्रावती राणीची व चादगडी वगैरे होते ते जप्त केले त्याचा जमाव सव्वादोनसे लोक होते त्याचा हिसेब करावयास सागितला. त्यावरून हिसेबही करितात. पाटनकर याहाडावरून कुच करून बाजारावर मुकाम केला. दोनच्यार दिवस तेथे राहून नतर कुच करून कोढालीस गेले. तेथे मुकाम करून होते. कारभारी याणी विनती केली जे, कोन्ही पाठवून त्यास घेऊन यावे त्यावरून राजश्री गोविदराव मुगुटराव व सताजी नाईक जाधव यास पाठवून समजावीस करून छ८ मिनहूस घेऊन आले. सेनासाहेब कारभारीयास म्हणू लागले जे, सेवट आमचे जासूद नाइकानी आणिले. छ ३ मिनहूस गगाज्यान्हवी मातुश्री आनदीबाईकडून रायेभानजी जासूद नाईक छतीसगडाहून पत्रे घेऊन आला, त्यात मजकूर की, राजश्री धोंडो महादेव व मोहमदखान तरीन व मुजुमदार व बक्षी वगैरे आशाडी पौर्णिमा जालीयावर याची रवानगी आपणाकडे करून देतो धोंडो माहादेव व मोहमदखान याणीही सेनासाहेबास व कारभारी यास पत्रे लिहिली होती जे बाईसाहेबानीं रवानगी केली म्हणजे सेवेसी लवकरच पोहचतो सेनाधुरधरानी, व्यकटराव गोपाळ व यादवराव छेतीसगडास सटवाजी भोसले याचे बदोबस्ताकरिता पाठविले होते त्यादिवसापासून तेथेच होते. कैलासवासी बिबाजीबावा भोसले हे तेथे असताना आले. येथून याणी लिहिले जे, तुम्ही तेथेच आसावे आणि तेथील वर्तमान लिहीत जावे म्हणून राहिले दरबारास नित्य जाण्याचा रस्त होता. येके दिवसी दरबारास गेले. प्यादाचा जमातदार याचा पाये, व्यकटराव

याच लागल्यावरून कजिया जाला रावमारनिळेच दोन जखमा लागल्या याबद्दलचरही मानस होती त्याणी समाचारास जखमी केले म्हणून लिहिले जे, रागास न यावे, येसवे पथकेन सेनासाहेब कारभारी यांस म्हणून लागले जे, आमचा फारकेन त्याणी तागाना मधाच बंदोबस्त घाडा माहादेव करितात कारभारी याणी उत्तर केले जे, परस्परे मानसा मानसी कजिया जाला उभयेताही आपलेच आहेत राग कोनावर करावा मग स्तब्ध राहिले पत्राची उत्तरे सेना साहेबानी व कारभारियाणी छ ११ मिनहूस दिल्ही जे फैजमसखासी आपासाहेब जाल्या दिवसापासून त्याची रवानगी आपण करितात परंतु अद्याप येत नाही त्यास असे नसावे सांप्रत त्याची रवानगी लवकर जाली पाहिजे घाडो माहादेव व मोहमदखान यास लिहिले जे, लस्कर येणे, याविसी राजश्री भवानी काळो व राजश्री भवानी नागनाथ याणीही लिहिले आहेत राजश्री माधवराव राम विसे व येसाजीपंत पागे याची रवानगी छत्तीसगडास धाडोपत वगैरे आम्ही ययास करणे होती त निधान मायनीमोहद येथून नाना कोस तेथ गले होत छत्तीसगडाहून पत्रे आली त्यावरून त्यास पलऊन घेतले त्याबद्दल पत्रे दिल्ही होती तेही सरकारात मागून घेतली त्यानंतर गंगाबाईसाहेबी अहिल्याबाई व राजश्री तुकोजीबावा होलकर व राजश्री नाना गणेश याचे समाधानार्थ पत्रे आली होती त्याचे उत्तरे छ ८ मिनहूस दिल्ही राजश्री आपा बळवंतराव व राजश्री गोविंदराव कृष्ण व राजश्री गोविंदराव पिंगले व राजश्री बापुराव विश्वनाथ यांची पत्रे *समाधानार्थ आली होती त्याचेहि उत्तर दिल्ही कलकत्त्याहून* छ ५ मिनहून पत्रे समाधानार्थ आली ते फास्तर ज्यारल फिरंगी दरबारास घेऊन आला. भिकाजपंत व मुत्सद्दीआगी करून ठेवले होते फिरंगी याणी पत्रे देऊन दोन घटका बसोन त्यास विडे देऊन बिदा केले त आपले घरास गेले. राजश्री देनीराम सिवभद्र याणी लिहिले होते की, याजकडून कोन्ही मातबर पत्र घेऊन येणार आहेत माहमद अमीरखान सिवनीछपारी याचे जाण्यास निरोप छ ५ मिनहूस दिल्हा घोडे पितापुत्रास दिल्हे सेले पागोटे पैठनी व जामेवार येक व किनखाप येक असे दिल्हे विडे दत समद सेनासाहेब याणी सांगितले जे, विजयादसमीस येथ यावे, त्याणी उत्तर केले की, मल्हा सरकारचे देणे व येण्याची सरमरा करणे याची साये जाल्यास यऊन पोहचतो मुन्याबेतदखा याचा पुत्र जन्मली येथ आला होता म्हणून सेवेशी विनंती लिहिली होती त्यानंतर येथून निरोप न देता स्वार होऊन गेला हातीचा कारभारी राजश्री उमाजी माहादेव व राजश्री सिवराम हरी याजकडे होता तो करून हातीची हाजीरी घेऊन राजश्री जनार्दन विश्वनाथ याजकडे सांगितला हातीची हाजीरी येकसेन्यासी आली त्यात तैनातीस हाती तीन, राजश्री विठल बल्लाळ सुभेदार याजकडे दोन, व राजश्री रघुराम मुकुंद सुभेदार प्रांत कटक याजकडे येक, येकोन तीन, बाकी येकसे आसी आवर्घ सिल्लक आहे. सिलेदार व पागा वगैरे याचे रोजमारे सालमजकूरचे बाकी कराही राहिले होते त्यापैकी चौथाई ठेऊन देवात वासोडी म्हणून गांव नागपूरचे उत्तरेस चौदा कोसावर आहे तेथ पूर्वी ब्राह्मण देशमुख मातबर होता त्याचे येथ अकस्मात मोहऱ्याचे सापडले च्यार होन कलदाचे व परात दोन च्यार व सताळे दोन च्यार, व सपीली पांच सात व तस्त येक व चंबु येक वगैरे चौपगे असाम मोठी मोडी निघाली ते वालजी यादव कमाविसदार याणी सरकारांत गुजरली हकडे प्रजेस भारी पचरा दिवस लागल्या यामुळे भुटाल्याचे तलावास पाणी फार आले म्हणून सेनासाहेब व व्यंकोजी भोसले व परसोजी भोसले पाहावयास गेले पाणी फार जाले म्हणून सोड करून द्यावयास सांगितले खेमा तयार करावयास सिवराम हरि यासी सांगितला आहे. पांच सात कनाता व राहुट्या व चांदण्या असे चांघास व येथ करविले आहेत चोरानी रंगारी याचे व कंचेनीचे घर फोडिले मानसेही जखमी केले चारासही जखमा दोघांस लागल्या साहा चोर. त्यात पांच मांग व येक चांभार, असे धरिले त्याणी राजश्री बाहेरराव पाटनकर याचे नाव घेतले जे, आम्ही त्याचे *गोटास असता चोरानी कापड, छीटे वीस, व रुपये वीस* साटकाचे घरी ठेविले होते त सरकारास आणिले आणीक कोठे कोठे ठेविले होत, तेही सरकारात आणिले चोर चौकसी करून वेशीसमोर टाकिले चार धरल्यापासोन शहरच चोराचा फार उपद्रव जाला म्हणून पाहाऱ्याचा बंदोबस्त केला शहरातील व पेठेतील नाकेबंदी केली त्या दिवसापासोन काही गलबला नाही चोरानी बाहेरराव पाटनकर याचे गोटात असता म्हणून त्याचे कारभाऱ्यास बोलाऊन सांगितले की तुम्ही आपली हाजरी देणे आणि तुमची तेरीस बंद आहे बक्षीस सांगितले जे याचं कसब करावे पवाजी चार कैदेत होते त्यातील शिपाई होते छ १७ तारीख सोडून दिल्हे गंगाबाईसाहेबी मातुश्री चिमाबाई कलकत्त्यासी सेनाधुरंधर जाल्या दिवसापासून देवदर्शनास येत नाही म्हणून सोन्याचे माहादेवाचे लिंग, तिस्या तांब्याचे फळ, त्यासी प्राणप्रतिष्ठा छ १५ केली माहागाव दर आसामीस आहेत दरम्यान दिल्ही साहेबाचे सेवेशी श्रुत होय हे विज्ञापना

## ३२२

रु. नं. ९९ श्री ता १६ मार्च १७८९
फा नं १
पत्र नं ११

पुरवणी साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपे कृतानेक विज्ञापना ऐसी जे छ १७ रोजी कूच होऊन बेहीझाडांस गेले व स्नेकस निरपा दिल्या होत्या त्यांचे फडछे करणे होते व येथे पेशव्याचा गुंतास्ता होता म्हणून सेनासाहेब व बानरूष्ण येशवंत व पांडुरंग गणेश व माहाराजीपंत लस्करी येसे येथें मुक्काम करून राहिले आणि लस्करावराबर सदासिवपंतगदा व भवानी नागनाथ वगैरे गेल आहेत याचा येथून पेशव्याचा गुंतास्ता उरकोन निभाव किंवा मानस्वीद किंवा गारत्थद मथपावता लस्करास आटपोन जातील सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञाप्ति

टीपः—खालील तीन पत्रें कृष्णाजी आवजी यांचीं नागपुरच्या बातमीचीं आहेत

## ३२३

रु. नं. ९९ श्री ता ६ मे १७८९
फा नं १
पत्र नं ११२

पुरवणी सा दंडवत विज्ञापना येसी जे छ २९ रजबी शुक्रवार तस्यावल श्री विनेश्वाचे देवळीं घर्ततपुष्य मुरू फळी दान तीन चम्पा दिवस राहावांना गंगाजळ(निर) मळ मातुश्री चिमाबाईसाहेब व गं(गाज)ळनिरमळ बम-ल्याबाइ व श्रीमंत राजश्री सेनाबहादर व श्रीमंत राजश्री व्यंकोजी भोसले येसे जाऊन देवळपासी पडदे लाविल्याहात तेथें प्रथम दाहा वीस ब्राह्मणाचे पाये चिमाबाईनीं धुतले (व)रून सेनाबाहादर यांनी पाणी घातले कमलजा बाइ यांनी पंल्याने धारा बाह(णा)वर घातला नंतर गंध लाऊन गर्भांत फुलांचे हार घातले दुसरे ठिकाणीं वरकड टोनच्यारसें ब्राह्मणांची पुजा व्यंकोजी भोसले यांनी केली नंतर गाईंगाण्याचे पा(गें)त काढून ठेविले त्यास पूजा होतच हाती +++ मसघारीमाया भागांतून तस्यात(वल) ++[आले]से तिकडे सेनाबाहादर गले नाम बाळाऊन नाचत गुरू आरम करून तल्यांत स्नान चम्पा फत्तन बाहेर आले नतर घाघा मर्मांत गले आणि सेनाबाहादर बाइकडे आले बाईसाहेबांनी त्यांचे हातीं फुले दिले व त्या पागेच्या दरवाज्यांतून ब्राह्मणावर टाकून दिले आणि बाईसाहेब व सेनाबाहादर वाड्यांत आले नंतर व्यंकोजी भोसले व उपाचे दरवाज्यांत उभे राहून ब्राह्मणास दक्षिणा सर्वत्रांस येक येक पैसा व पानाचे विडे कोन्हास पावले (कोन्हा)स न पावले ऐसे देऊन व्यंकोजी भोसले बागांत जाऊन ब्रह्मचारी बा (बाव) यांच्यांत घेऊन आले याचा सारा पाहून दोन घटका बसून आपले मकानास गले प्रथम दिवसाप्रमाणें दररोज छ ९ सावानपावेतो घर्ततपूजा चाली छ मजकुरीं ये थे (पु)जा करून व्यंकोजी भोसले सकरदऱ्या(स)गेले तयेही वीस पंचवीस ब्राह्मणांचे पूजनें करून दक्षिणा देऊन बाडयास आले व राजे मुन्हागदो यांचे कुंवर मधारांस आगवरधा यास रक्तपित्तीची व्यथा होती त्यांनी बहुत श्रमी होऊन छ ४ सावानी दोन प्रहर दिवसा नंतर त्या(स) देवआज्ञा झाली तेथें सेनाबाहादर गले ++ दुसरे रोजीं व्यंकोजी भोसले व मतुदी मडळी येसे जाऊन दोन घटका बसून मुन्हागदो राजे यासी समाधानाचें बोलणें बोलून उठोन वाड्यांत आले हे विज्ञापना

## ३२४

रु. नं. ९९ श्री ता ९ मे १७८९
फा नं १
पत्र नं १११

पुरवणी सा दंडवत विज्ञापना ऐसी जे श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा सेनाधुरंधराचे बराभाडास येतात म्हणून बातमी आली त्यावरून येथें व्यंकोजी भोसले यांणी योजना करून + + र पालख्यांची व हातीची डाक दाहा दाहा (को)सांवर घापावेतो छ ४ सावानीं बसविले तो से(ना) साहेबांचे येम घडलें नाही मात्र [ल]क्षीतच राहिले व सौ सिंगाबाई मोहिते यास कांहीं दिवस समाधान वाटेत नाही ज्वर येत होता सात माहाची गरोदर म्हणून कांहीं औषध देता नये ज्वराचें बल फार झालें म्हणून छ १२ सावानीं पोटांतून गोळा पडला त्यामुळे फार श्रमी आहेत यो राजश्री भीमरदाजी औषध देत आहेत आराम जाल्यावर [लि]हीण्यांत येइल त्यामुळे घरांत बाइ(सा)हेब व सेनाबाहादर व व्यंकोजी भोसले उदास धार दिस आहेत व छ ११ सा[वानी] सेनाधुरंधर यांचे साहाभाग्य चाचे जो विषी आधाचा करवयाचा ता सेनाबाहादर यांचे हाते करून व्यंकोजी भोसले बसून बसल हाते प्रथम पांचा ब्राह्मणांची पूजा करून त्यास येक येक धाम व येक

येक ताव्या व दक्षेणा तीन तीन रुा दिल्हे. नतर देव-घरचे ब्राह्मण उपाधे व शास्त्री ऐसे चौदा ब्राह्मण बसले होते त्याचे पूजा करून चौदास चौदा धोत्र रसीमकाठी व चवदा चत्रृ व चौदा पचेपात्र व चौदा ताम्हणे व कळ्या सोण्याच्या चौदा पाच पाच तोल्याच्या व चौदा चौकडे आहतो [?] + + + व चौदा पैत्र येक तोल्याचे व से[ले] चौदा व शाल फरद चौदा आणि दोन दोन मोहरा दक्षणा देऊन प्रदक्षणा घालून सेनाबाहादर गाईची पूजा करावयास गेले. चौदा गाईची पूजा करून सुवर्णसिंगे सिंगात घालून खूर रुप्याचे पायास बाधून मोत्याचे लड + + + हाण होते ते सेपटास बाधून त्याच चौ(दा)जनास चौ[दा] दिल्या नतर हाजार पाचसे ब्राह्म[ण] होते त्यास दक्षणा उतम मधम कनिष्ट पाहून येक रुपयापासून (पै)शा पावेतो दिल्हे भोजनास त्याचे सो(यरे) पितार व मानकरी लोक से-पनास (सागि)तले होते. भोजन होऊन आकरा पित(रा)स आकरा धोत्र व आकरा सेले पागोटे (दि)ल्हे. हे विज्ञापना

## ३२५

रु. न ९६ श्री ता ११ मे १७८९
फा. न. १
पत्र न. १२३

पुरवणी सा दडवत विज्ञापना यैसी जे झिंगाबाई सेनाधुरधर याचे कण्या सोमाजी मोहिते याची स्त्री यास कांही दिवस ज्वर येत होता. कांही औषध करावे तर गरोदर म्हणून कांही उपाये के(ला) नाहीं. तो ज्वर अधिकसा बलाकावला नी पोटातून गोला पडला त्याने बहु(त) श्रमी होऊन त्रिदोसावर घातले. त्यास उपाये कांहीं चालेना व छ १३ रोजी पाच हाजार रुा दान केले परतु कांहीं गुणास आले नाही. बहुत श्रमी होऊन छ १४ साबानीं रविवारी सवा दोन प्रहर दिवस गेल्यानतर देव-आज्ञा जाली तेव्हा [घ] रान मोठा आकात जाला तो कोठवर ल्याहावा नतर प्रहर दिवस राहाताना जो आहेव—पनाचा विधी करावयाचा तो करून पालखीत घालून पुढ तासे मोरफें + हाथीवर नवबाद घालून वाजवीत+++ सेनाधुरधराजवलच आग्न दिल्हे (बरा)बर सेनाबाहादर व व्यकोजी भोसले व मत्सुदी मडली ऐसे गेले होते जैसिगराव मोहिते याणी पानी पाजले ईश्वरे मोठे वा[ई]ट केले. चिमाबाईस दुखात दुख जाले. हे विज्ञापना.

## ३२६

रु न ९६ श्री ता. ९ मे १७८९
फा. न. १
पत्र नं. ११९

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे दडवत विनति विज्ञापना यैसी जे ताा छ १३ माहे साबान मुा गोव कृष्णातीर नजिक कोटेश्वर येथील वर्तमान तो ताा छ १२ चे तारखेस पत्र लिहून पाठविली त्याजवरून सविस्तर कलले आसल. वानोडीचे मुकामाहून बापूसाहेबाचे कूच जाले ते कातरजचे घाटाने येऊन मुा मारी मुकाम केले. घाट चहडता मोठी दिकत लागली ते लिहीता पुरवत नाही. हराल्याचे घाटावर भवाणजी भोसले याची घोडी मेली बापूसाहेब पायेउतारा होऊन घाट चहडनेत समागमे येक पाडुरगपतदादा होतेत. वरकड मागाहून आलेत. कालचे उनाब्दिक श्राध व बाबासाहेबाचे श्राद्ध उगविले दाहा ब्राह्मनास चवदा चवदा रुपये दक्षना दिल्हेत. आजचे आब्दिक श्राध आहे ते उगवल दक्षेना वगैरे काये जे देतील ते पुढे लिहीन्यात येईल. बाबुराव वैद्य व कासिराव वैद्य+++बाचा पुत्र यैसे त्रिवर्ग येऊन बापूसाहेबासी येऊन भेटलेत येक मोहर नजर केली. दुसरे सिधभट ठकार याचे चिरजिवानी कारकुनाबरोबर केले व फनस वगैरे पाठविले. सारास स्वारीचा गळाठा मोठा जाला समागमे सभू घोडा व वेसरा घोडा व तुरकती यैसे निभून आलेत व येक मोतादार समागमे आला. त्याजला पागोट व ताडपत्री पासोडी यैसे इनाम दिल्हा व मुदब्राखातील दोन रोट्या नित्यच्या करून दिल्या कलावे छ १२ तारखेचे पत्र त्याजवरून कलेल. हे विज्ञापना.

## ३२७

रु. न. ९६ श्री ता १० मे १७८९
फा. न. १
पत्र न. ११२ ते ११४

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे दडवत विज्ञापना यैसीजे ताा छ १४ माहे साबान रोज रविवार मुा मौजे गोव कृष्णातीर साहेबाचे कृपावलोकनें करून सेवकाचे वर्तमान येथास्थित आसे ताा छ १३ साबान रोज सेनवारी प्राथःकालचें पत्र रवाना केले त्याजवरून ध्यानात आले आसल. तदनतर गंगेत श्रीमत

सेनासाहेबसुभ्यांनी गंगेंत (स्ना)न करून देवपूजा करीत होतव तितक्यात सातान्याहून येऽमूर्ति रामभी सिंधमग उद्धार यांचे पुत्र रो नारायेन दीक्षित भेटीस आलेत दोन घटका पसले भीमंतांनी त्याहासी न्यायार्थ वतन देशमुखी मोहत्यांची आहे येविशींचे बोलनें फर्ले कीं, तुम्ही मोहत्यांचे उपाध्य आहात, याचा आभिमान आपणास येसे बोलून दीक्षितांनी उत्तर फर्ले कीं, या गोष्टीचा उद्योग करावा आग्रहास उचित आहे येसे परसपरे बोलनें करून पुढें भाषाचा उद्योग होता म्हणून सत्वरीच विडे देऊन निरोप दिल्हा साहेबाउठीं त्याहाकडून फरासास बुधीचे स्याहू पेगान्यांत घालून ब्राम्ह नाशीर पाठविले होते ते भीमंतांनी देवघरात दाखल केलेत दुसरे भाषाचा मजकुर तो चांगला येथापथ्यवीन उगविल्या समागमे उपाध्या वगैरे ब्राम्हन होते यवग ब्राम्हनास येक येक फद शाठीचा व येक येक धोत्रजोडा येक गफ चवकडा व येनेच प्रा ग्ळ पवित्र व चबू पंचपात्र व येक येक मोहर दक्षेना व दशदानाचे पंचावन रो गोदान येकसे दाहा दर गोदान पांच रो प्रा साडे पांचसें रो दिल्हेत व मन्हार पितर दाहा यांसी चांगले मोस्नास फक्षाम व धोत्रजोडे व पैठनी सेले सुद्धाले येसे दिल्हेत बहुत चांगल विधिपूर्वक भाषाचे कार्य तिसरा प्रहरपावेतो उगऊन नंतर भीमतानी भाजने केली यावर रामभी बाबुराव येव व त्याचा बंधू व पुत्र येसे सरकारचे डेरियास आले बोलनें फर्ले कीं, वडील तुम्हांपासी होतेत आम्हीहि काही दिवस होतो आताहि हेत आहे कीं, बंधूस व पुत्रास आपनासांगाते ठावें येसा हेत आहे येस म्हणोन भीमंतांचे हातात हात दिल्हे भीमंतांनी हातात हात घऊन उत्तर फर्ले कीं, बरें आहे. हे पुरवीपासून आमचेच आहेत येसे परसपरें बोलनें होऊन साहेबाची संध्या गंगेस उगऊन विन्हाडास गलेत रो विस्वनाथ जोसी सातान्याहून मुलास घऊन भटीस गे प्रहर आलेत साहेबास पानेसा राहून मागती सातान्यास गेलेस रो येसोजी मोहिते देहि हाघा मुलास घऊन मायंकालींच भेटीस आलेत दोन घटका बसून गावांत गलेत मागाहून भीमंतांनी आपला प्रहस्त पाठऊन जयायास सांगितले हाते त गाप मूल व आरन व आणिक डाय मले मानस पंसे भाजनास आलास दुसरे रामा स्वारीचा हेत आहे कीं, धोम व मामलेश्वराचें स्थानास जावें येसा हेत आहे म्हणोन रा भवानी नागनाथ व सदाशिव राम याहास पत्र लिहीलीत तेथोन उतर आल्यासारिखें करनार परतु हेत बहुत करून आहे किर्तीक कामाकाजाचे गुंते आहेत या अर्थी दोन स्थानाच्या विकडे फेल्यात दुसरे आज मायंकाळीं भीमत मुसलमानिन करून बसले जवळ रो पांडुरंग गणेश व बाजी राव येशवत हे उभयेतां होतेत त्याहासी विचारना होत होती कीं, पूर्वी पुरंदरास स्वारी आली होती तेथा नेनो खीचा बाग रो नानांनीं बहुत चांगला केला परंतु तयार जाला नोहता आता तयार जाला आसल तरी बहुत रूपास आला आसल बाजीराव येशवंत यांणी उत्तर फर्ले कीं, मी त्या स्वारीसमे होतो येसे परसपरे बोलन होतेत बागाची व देवाची फार तारीफ होत होती ते लिहीता पुरवत नाही त्याजवर त्या विनंति फ्ली कीं, आपली स्वारी नेनोखीस जानार आहे कीं काय? भीमंतांनीं आज्ञा केली कीं, हे तू काये विच्यारतोस आमचे चितास येईल तें करू जावयाचे आसले तर जाऊं अथवा न जाऊं. आमचे घरच आहे येसे दोन तीन वेल मोठ आनंदाने बोल लेत त्यां विनंति केली कीं, आपले तो घरच आहे परंतु त्याहि विनंति केलीच पाहिजे नाहींतरी धटू येऊ पाहातो म्हणोन विनंति करणेच प्राप्त आहे काठेहि स्वासा भारी चालिली तरी येलेस विनंति करावी कीं, स्वारी कोठ जाते येसी विनंति केलीस नेनोखीस जानार येसा निश्चय आहे फलाये भारीचा आजचा मु॥ कृष्णातीरचा आहे त्रिरात्र तीर्थी क्रमावी याअर्थी आज मुकाम येथलाच करून उदईक कूच करून धोम व मामलेश्वराचे दर्शनास जावे मुनसी व रो सदाशिव राम याहास पत्रे गलीत त्याचें उतर न येता भारी कूच करून जानार. पुनम्याचें मुकाम जेवरावर आहे ते तेथेंच राहाऊन सडे माघ जानार, येसे आहे रो परसराम बाबुराव मुजमदार पांचेवाडीहून भीमंताचे भेटीस आलेत ते येथच आहेत विनंति फ्री कीं, घर जवल आहे. तयावर चलावे सेनासाहेबांणी सांगितलें की, पुढें आवकाश पाहून सांगू. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ती

## ३२८

ह. नं ९६ श्री ता १० मे १७८९
का नं १
पत्र नं ११५

साहेबाचे सेवेसी विज्ञापना येसी ज सा छ १४ साबान या रविवार मुा गाव कृष्णतीर. आपले कृपापत्रानें

येथास्थित आसो. येथील वर्तमान तरी काल छ १३ साबानीस श्रीमत सेनासाहेबसुभा याचे येथील श्राधाचा गुंता उगविला समागमे ब्राह्मन उपाध्य वगैरे होतेत. चवदा ब्राह्मनास चवदा शालीचे फर्द व पिटा(दिडा?) ची जोडी व चवदा चवकडे व येणेप्रमाने दळ पवित्र व चत्रूपचपात्र व येक येक मोहर दक्षना दिल्ही व दरदानाचे पचावन रुो व गोदान येक दाहा दर पाच रुो प्राणे साडे पाचसे रुपये दिल्हेत व मऱ्हाठे पितर दाहा यासी चागले भोजनास पक्वान्न व दाहा धोत्र जोड्या व दाहा सेले पागोटे पैठणी. तिसरा प्रहर पावेतो गुता चागला विधिपूर्वक उगविला. गो नारायेन दीक्षित सातारकर व बाबुराव वैद्य व त्याचा बधु व पुत्र येसे त्रिवर्ग व विस्वनाथ जोसी व परसराम बाबुराव मुजमदार व व्यकोजी मोहिते येस भेटीस आलेत. तीर्थी श्रीरात्र क्रमावी येदर्थी आजचा मुकाम कृष्णातीरचा आहे. उदईक सडे स्वारी कूच करून धोम व माभलेश्वर जानार आहे बहुत काये लिहीणे हे विज्ञापना सेवेसी मल्हारजी वरपे दडवत विज्ञापना येसीजे. हें पत्र गोविदा जासुदानी लिहीलें यावरुन कलेल. म्याहि आपना ल्याहावे तरी आडचनीमुळें लिहीने जालें नाही हे पत्र म्याच लिहीले असे. गोविदा व नामाजी येसे मजपासी आहेत बुनग्याचा मुकाम आज जेवरचा आहे कलावे हे विज्ञापना ता म्या प्रथक ल्याहावे तरी मजकूर येकच आहे. तेथे दुसरे काये ल्याहावयाचे आहे. हे विनति

## ३२९

रु. न ९६ श्री ता १२ मे १७८९
फा न १
पत्र न. १४९

साहेबाचे शेवसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे. कृतानेक विज्ञापना येसी जे. साहेबाचे कृपाआवलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. मु॥ धूम ऐशीयास साहेबाकडे छ १४ माहे शाबान रविवारी पत्र सध्याकाळीं येक घटका दिवस राहाताना गव्याचे [गोव्याचे]- मुकामीहून सेवसी पाठविली ते प्रविष्ट जाहाली आसतील त्यानतर ते दिवसीं सध्याकाळीं राजश्री वेंकोजी मोहिते गोव्यात आपले वाडियात घेऊन गेले श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा यासी पैठणी सेला व तिवटे व महमुदी व किमखाब ऐसी वस्त्रें दिल्ही व समागमे पाडुरग गणेश व जानराव येशवत व येशवतराव भवानीशकर होते. त्यासी सेला तिवट जालन्याची त्रिवर्गास दिल्ही. तेथून उठोन निंब्र कृष्णातीर दक्षेनतीर येथे राजश्री बाबुराव केशव याचे वाडियात वेदशास्त्रसपन्न नारायेण दीक्षित याचे बिन्हाड होते तेथे जाऊन त्यासी खटाऊ प्रकरणीं बोलणे होऊन त्याणी पैठणी सेला तिवट व जामेवार व किमखाब ऐसी च्यार दिल्ही. मागती भेटीचा योग घडावा ऐसे बोलून उठले. माहुलीस आल्यावर भेटीस यावे येसे बोलून तीन घटका रात्रीस तेथून आपले डेरियास आले. त्यानतर रा बाबुराव वैद्य व त्याचे बधू व पुत्र या त्रिवर्गास वस्त्रें देऊन निरोप दिल्हा बाबुराव यासी साडेतीन वस्त्रें व सेला पागुटी उभयेतास दिल्ही. उपरातिक राजश्री रणसिंग मोहिते व विश्वनाथ जोसी व वैजनाथ सुकल यासी सातारियास घरास जावयासी निरोप दिल्हा मग रात्रीस फराळ करून आपणाकडून आनानसे तीन व पत्र साडणीस्वाराबरोबर आले त्याची उतरे खास दस्तुरें आपणाकडे रवाना केले ते सेवेसी पोहचले असतील. मग आडीच प्रहर रात्रीस निद्रा केली त्यास दोन घटका रात्रीस उठोन मुखमार्जन करून कूच करविले. मुकाम धुमेचा करविला आणि स्नान देवपुजा करून प्रहर दिवसानी स्वार जाले ते वाईचे वाटेणे आले. त्यास राजश्री अनदरावदादा रास्ते याणी कारकून आदकोसावर पाठविला की, घर आपले आहे मुकाम येथेच करावा आणि तुमची आमची भेट व्हावी. त्यासी उतर केलें की, दादास गणपतीच्या देवळास घेऊन यावे. तेथेच आमची भेटी होईल. आज सोमवार आहे धुमास बुनगे गेल असे. तिकडून येतेसमई येथेच येऊन मुकाम करू घर आपले आहे, म्हणोन सागून मज त्या कारकुना (समाग)मे व आणिक कारकून देऊन दादाकडे पाठविले. मग दादा व गगाधरराव व त्याचे पुत्र व जिवबा राज्याचे पुत्र ऐसे येऊन गणपतीचे देवळाचे उतरेस माहादेवाचे देवळीं भेटी जाहाल्या. क्षणभर बसून तिकडून येतेसमई मुकाम करीन ऐसें बोलून उठले मार्गी नेनोली (मेणोली) यासी येऊन वाडयाचे पुढून मार्गानी आले राजश्री नानाचा वाडा या वाडियात पुरधरचे साली येऊन भोजन करून गेलो होतो मग श्री विष्णूचे व माहादेवाचें दर्शन घेऊन येक घटका बसून देवळे पाहून जवळ त्रिवर्ग व मानापा घाटगे व लोक होते. त्याणी व सेनासाहेबानी तारीफ केली कीं, नानाचे जें करणें तें बहुत समजोन करावयाची तारीफ हेच आहे ते वेलेस माहादाजीपत आले. त्यास आसोच होते. त्यासी बोलले

र्दी, आम्ही विंझूहून येताना येथे फराळ करून चाळ मग माहागावीपर्यंत यांणी संध्याकाळीं घुमच्या मुक्कामीं येऊ- फुलें व फनसे तीन व वांगी पाठविली फार चांगली होती व साहेबांनी पाहून सगळीं फरविलीं आज रात्रीस सोमवारीं देवाची पुजा अभिषेक निवेद करून रात्रीस राहून मंगळवारी स्नान करून माहाबळेश्वरास स्वार होऊन गले सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि छ १६ शाबान रोज मंगळवार दोन प्रहर दिवस

## ३३०

रु. नं ९६ श्री ता १० मे १७८९

फा नं १

पत्र न १०६

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे विज्ञापना ऐसी जे ता छ २० रोज मंगळवार च्यार घटका रात्र मुक्काम देऊर. मायकार्गी यांचे मुक्कामीहून मेजमानीचें वर्तमान व कुचाचें वर्तमान लिहून पाठविलें तें सेवेसी श्रुत जालें असेल यानंतर मायकार्मी गे घटका रात्रीस उठून सेना साहेबसुभा यांनी स्नान देवपुजा करून बुनगे पुर्ढे वेवरास रवाना केले माग प्रहरा स्वारी सेनासाहेबसुभे यांनी कृष्णेवरी स्नान करून मांडवाखाले बैसलेच तो राजश्री आनंदराव लक्ष्मणराव व गंगाधरराव रास्ते एकत्र होऊन घोड्या पाहिल्या पाहून च्यार पांच वाडिया आणून नवा वाडा येथें गंगाधरराव घेऊन आले त्या वाडियांत सेना साहेबसुभे येऊन बसले हात घोड्या फरून पाहिल्या तो एकहि वाडी सेनासाहेब सुभे यांचे मर्जीस न आली लक्ष्मी मनरायपैकी घोड्या अगोदर पाहिल्या होत्या त्यांतपैकीं न दिसल्या याकरिता फिरून दिसल्या ल्यागस्तानीयांत जाऊन बैसले रास्ते मागनिले यांनी फराळास आणिले तेव्हां सेनासाहेबसुभ व मानाजी घाटगे वगैरे च्यार पांच पान बैसली सेनासाहेबसुभे यांनी तो कांहीं भक्षिलेंच नाहीं परंतु पड पारक पैमेमार मधिले पानगान आतरगान घेऊन वाघांचे पटकस स्वार जाले गर्मीयांसी सेनासाहेब सुभे यांनी यत्न दिसली नाहींत मुक्काम मजुरास येतांना सिरगांवचे मार्गांत पुरांचा फराळ धरमांन्ळी फरून च्यार घटका दिवस राहतांना मुक्काम मजुरास आले ससेंच पाण पुढें चेगले पाढी मिगर माग पाहिलें नागपुरीहून टोपची पत्रें आलीं ते वाचून पाहिलीं राजश्री व्यंकोजी भोसले यांनी लिहा आहे कीं, सौभाग्यवती सिंगाबाई मोहितीस ज्वर नव दाहा दिवस येत असतो आवघेच उपाये करितात मुक्कामास आलीयावरी देवीचें दर्शन घडतें नाहीं ननोळीचे मार्गाहून दोन फनश सेनासाहेबसुभे यांनी त्यांपे बोलाविली तेव्हां राजश्री माहादाजीपंतभानाकडेस जासूद पाठऊन मालिमाहातीं बोलाविली ते आलीयावरी गुजरविली मेजमानीचे दिवसीं खाल्ली होती तैसीच त्या जातीची बोलाविली ता छ २१ रोज रविवार दीड प्रहर दिवस सेवेसी श्रुत होये हे विज्ञापि

## ३३१

रु. नं ९६ श्री ता १९ मे १७८९

फा नं १

प नं १८८

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक दंडवत् विज्ञापना ऐसीजे ता छ २३ माहे शाबान रोज मंगळवार मुक्काम देऊर येथें साहेबांचे कृपावलोकने करून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष वाईहून रास्ती यांचा निरोप घेऊन देऊरास मुक्कामास जाल्यावर सविस्तर वर्तमान सेवेसी लिहिल्यांत आलेच आहे. रविवारीं दोन प्रहरानंतर श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा देऊरांत डेरीयां- तून श्रीमुधाईचें दर्शन घेऊन देउळ+ वेदमूर्ति राजश्री येशमर्ट दीक्षित उपाध्ये यांचे घरीं भोजनास गेले सुमार दाहा वीस आसामी भोजन करून डेरियास आले भोजनास उसीर फार करितात आजीच सवा दोन प्रहर दिवस लागतात नित्यशा एसेच आहे डेरियास येऊन निद्रा दोन घटका करून उठले आणि राजश्री पांडुरंगपंत यांसी साकिद फली कीं, वाईहून लोकांची हजरी घेणे तुमची हजरी निराळी घेऊ वा आणि आपले करकून पाठऊन दाखल आमविती ऐसा नम करून खासगीचे निराळे करकून पाठऊन हजरिया आणविल्या आहेत पथकीच्या व खासगीच्या करकुनांचे हजरीची रुजुवात जाली नाहीं पुढे बुनगे वगैरे कारखाना व वरीपत्का वाट लावून आपन सडे राहणार. सामवारीं व मंगळवारीं दिवस चांगले नाहीं बुधवारीं समागमें कूच व्हावें याचा निश्चय ठहराऊन देऊ एसे घास्ने वेदशास्त्रसंपन्न राजश्री नारायेण दीक्षित डेरियास आले होत व सेनासाहेबसुभा यांसी बहुत तऱ्हेने भारम

करीत की, उदईक सोमवारी माहूलीस येऊन कृष्णास्नान करून राजाचे समाधीचे दर्शन घेऊन माहागावास यावे. तेथे वेदशास्त्रसंपन्न राजश्री सदाशिवभट दीक्षित वाजपेययाजी याची भेटी घ्यावी आणि सोमवारचे भोजन तेथेच करावे. स्वटाव प्रकर्णी बोलणे उगऊन यावें. ऐसे बोलल्यावर इकडून उत्तर जाले की, सोमवारी वैधृत मगळवारच्या भद्रा आहेत. जेवावयाचा आग्रह आपण करू नये. मी माहूलीस स्नानास येऊन समाधीचे दर्शन घेईन. तुम्ही म्हणाल की, वाईस आपले भोजन जाले तरी तेथे आपले सपाकी पाठ पाठऊन भोजन केले. स्वटाऊ प्रकर्णी आम्ही सोनरे. उगेच कोणे आधारानून बोलावे. वतनसमर्धी कागद व त्याच्या नकला आणून दाखवाल तेव्हा आमचे आनभवास येईल. इतके म्हणोन त्यास निरोप दिल्हा. ते देऊरात सरकारवाडीयात जाऊन राहिले. रोज सोमवारी प्रात:काळापासून दोन प्रहरपावतो वशी चालवावयाचा बन्दोबस्त करविला. कैलासवासी आपासाहेबी तोफेचे गोळे दाहा बारा हजार व दारूचे बुधले येथे ठेविले होते. ते न्यावयाची तजवीज होत आहे त्यापैकी जे जातील ते जातील. राहातील ते मागाहून लिहीण्यात येईल. तिसरे प्रहरी देवीचे दर्शन घेऊन गोळे समक्ष पाहिले त्याजवर विठोबा व माहादेवाचें दर्शन घेऊन शेरी व आवरगडे व धरन पाहून सध्याकाळीं डेरियास आले. सांहीकाळीं सोमवाराचे स्नान केले सभू भारथी यासमागमे पुण्यास पत्रे पाठविलीं होती त्यापैकी याचे कारभारीयाची उत्तरे घेऊन गोसावीमजकूर दीड प्रहर दिवसा येथे आला पत्रे वाचून स्तब्ध राहिले. आज मगलवारी सध्याकाळीं देवीचा गोंधळ आहे. जाला मजकूर सेवसी लिहीला आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति. छ मजकूर रोज मगळवार प्रातःकाळ.

## ३३२

रु न. ९६ श्री ता १९ मे १७८९
फा. न १
पत्र न १९०

पुरवणी साहेबाचे शेवसी वेदमूर्ति राजश्री नारायेणभटजी बावा दीक्षित याजकडे राजश्री भगवतराव गोपाल याचे चिरंजिव पाठविले होते. ते भेटीस रात्रीस घेऊन आले भेट सा घटिका रात्रीस जाहाली. गावात सरकारवाडियात राहिले आहेत. हेहि वाटेनें मजल चालून आले याजकरिता बोलने जाहाले नाही. उदई[क] बोलने होईल म्हणोन विदा केले. वाो येशभटजी उपाध्ये याचे येथे खाशास मेजवानी आहे. समागमे दाहावीस भले माणोस जातील. पुढे दिनचर्याचे वर्तमान होईल ते लिहीण्यात येईल. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

## ३३३

रु न. ९६ श्री ता २० मे १७८९
फा. न. १
पत्र न. १७७

साहेबाचे शेवसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक दडवत् विज्ञापना ऐसीजे. ताा छ २४ माहे शाबान रोज बुधवार मुाा देऊर येथे साहेबाचे कृपेआवलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. यानतर मगळवारीं प्रातःकाळी पत्र पाठविले तें सेवसी दाखल होऊन दिनचर्याचा मजकूर श्रवणात आलाच असेल त्याजवर श्रीमत सेनासाहेबसुभे मगळवारी प्रातःकाळी मुखमार्जन करून स्नान करून देवपूजा केली आणि गावात जाऊन श्रीमुधाई देवीचे दर्शन घेतले. गोंधळाचे साहित्य रात्रीसच करविले होते. त्यास आज उपाधियापासून देवीची माहापूजा करविली देवीस पैठणी पातळ जरीपदराचें व जरीवढणी व पैठणी चोलखण ऐसे चडविले. पूजा साग करून निवेद समर्पन करून आपण देवीपासी बसले होते ते बाहेर आले. तोफेचे गोळे तेथेच सन्निधच होते. त्याची तजवीज समागमे घेऊन जाययाची होती. त्याप्रो तमाम फौजेंत हती व उट व बैल व छकडे याची हारगण करून गोळे वाटून दिल्हे. आकरा हजारपैकी च्यार हजार गोळे तेथे राहिले. त्याचेहि तजवीज भाडे वगैरे करून नेतील. तजवीज न जाली तरी येथेच राहातील. खेरीज दारूचे बुधले ४२ बेतालीस आहेत. त्यासहि बैल येकवीस करून नेतात आणिक सिसेयाच्या बुधूकीच्या गोळया आहेत ते दारूच्या बैलावर घालून नेणार याची तजवीज करावयासी दीड प्रहर दिवस आला तो साहेबाकडून साडणीस्वार पत्रे व पेटारी मेवेजात घेऊन आला पत्र वाचून पाहिलें आणि पेटारी तैसींच जासुदाचे हवाली करून आमानत ठेविली. इतकीयात नागपुराहून डाकेबराबर श्रीमत सेनाबाहादर व राजश्री व्येंकोजी भोसले याचीं पत्रे आली कीं, सौभाग्यवती छुगाबाई मोहिती यासी ज्वर येत होता औशद उपाये करीत असता पोटसी होती त्यात बाधा होऊन

गमनात आला तेणेकरून बहुत श्रमी होऊन प्रकृतवार्ई आरास्य आहे. मग याचे ऐसी गुस्ली आहे म्हणोन उभयेतांनी लिहीले आहे ते पत्रें वाचतांच मर्जी खिन्न होऊन डेरियास आले च्यार घटका रात्र पावेतो मोकळे देखीलहि न घेले मर्जी बहुत विकल्प राहिली रात्रीस मोकळे से पनास श्लोक गोंधळाचे पंचवीस मोकळे करून प्रहर रात्र जाहाल्यावर नंतर देवीस गेले श्रीगंगाबाई कधी आराम होऊन पत्र येतपावेतो चित स्वस्त नाही ऐसा वारवार प्रस्ताव करितात श्रीमाहालक्ष्मीश्वरास संकल्प केला होता त्याप्रा सिरपेंच व पैठणी सेला खिवट तेथील तीर्थ उपाधीयाचें हवाली करून देवास पाठविलें असे आज बुधवारीं येकादसीस माहुलीस मुकाम. आज विश्वनाथ जोसी व मिसर हरि सातारीयाहून येथें आलेत फौजेची हसरी झाली ते आडीच हजार समये पागासुधा आहेत छ मजकूर रोज बुधवार प्रात काळ सेवसी श्रु[त] होये हे विज्ञप्ति

## ३३४

र. नं ९६ श्री ता ११ मे १७८९
फा. नं १
पत्र नं १७१

साहेबाचे सेवसी

आज्ञाधारक मल्हारजी बरपे कृतानेक दंडवत् विज्ञापना ऐसी जे, ता छ २६ माहे शाबान मुा वेरुळ येथे साहेबांचे कृपाअवलोकने करून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष छ २४ रोज बुधवारीं श्रीमंत सेनासाहेबसुभा यांची स्वारी माहुलीस गलीयाचे वर्तमान संकलीत सेवसी लिहीण्यांत आल्य आहे. त्यास माहुलीहून महागांवास येन्यासमये राजश्री सदाशिवपंत ठकार दीक्षित यांनी याजी यांचे येथें जाणें होऊन प्रथमता उभयेपक्षी सिष्टाचारि यांची बोलणीं जाहाली त्यावर मराठा प्रकर्णी राजश्री मानसिंगराव मोहिते व रा पांडुरंगपंत व येशवंतराव व गनराव येशवंत व नारायेण दीक्षित ऐसे बसून बोलन्याचा अर्थ की सेनासाहेबसुभा यांनी त्यासी उत्तर केलें की, तदर्याविसी तुम्हास राजश्री बाळाजीपंतनाना यांणी पत्र लिहीलें आहे तरी मराठाप्रकर्णी जा बंदोबस्त करून यावयाचा तो करून देतील येविसी करारपत्र वतनसंबंधी असतील त्याचा नकल घेऊन बालाजीसी फार्दी गले पाहिजे याजकरिता येविषीची बोलणी सारा पक्का होऊन

निश्चये ठरला की, नारायेण दीक्षित यांसी सत्वर जेजुरीचे मुक्कामी करारपत्र घेऊन पाठऊन द्यावे तेथे येकदान मुक्काम आहे, ऐसें बोलणें होऊन फराळ करावयाचा आग्रह दीक्षितांनी केला परंतु यांणी म्हटलें की, येकादसीस संध्या करणीं देवपुजा करण्याखेरीज फराळ करीत नाही जे असेल ते समागमें द्यावे त्यावर दीक्षितांनी पेढे व बरफी व केळें व पिकले आंबे व फणस ऐसे देऊन डेरीयास पाठविले की, संध्याकाळीं देवपुजा जाहलीयावर हाच फराळ करणे मग यांस दिल्ही जोनाबादी खिवट सेला व माहमुदी व किनखाप ऐसी च्यार थानगे दिल्ही समागमे मुतसदी पांडुरंगपंत व येशवंतराव पांडुरंगपंताचा पुत्र रघुपतराव व गनराव यशवंत यांसी सेला तिवटे प्रा दिल्ही मग तेथून वैतापुरास चिटनिविसाचे घरास गेले राजश्री रामराव जिवाजी व लक्षुमणराव गोविंद चिटनिवीस यांणी अगत्य स्वागत होऊन पानसुपारी व अत्तरदाण गुलाब व लोकाव विडे देऊन त्यांचास पैठणी तिवट सेला व माहमुदी जोडी व किनखाप ऐसी च्यार यांस दिल्ही समागमे मुतसदी पांडुरंग गणेश व येशवंतराव भवानीशंकर व रघुपतराव व गनराव येशवंत व कृष्णाजी विष्णु व बापू वैद्य व वेदामूर्ति यांसी दोन दोन वस्त्रें दिल्ही तेथून निघोन कृष्णा उत्तर तिरास स्नान करून दाणापाणी घेतले तेथून निघोन घटका रात्री डेरीयासी दाखल झाले मागेर रणसिंग मोहिते आले यांचा रामराम जाहला (अपूर्ण)

## ३३५

र. नं ९९ श्री ता २१ मे १७८९
फा नं १
पत्र नं १७६

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बरपे कृतानेक दंडवत विज्ञापना येसी जे ता छ २७ माहे शाबान मुकाम वेरुळ येथे साहेबाचे कृपावलोकने करून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा यांणी सडे होऊन जुनगर वगैरे कारखाना कूच पुढें रवाना केल्याचें वर्तमान साहेबांस काल छ २६ रोज शुक्रवारीं विनंति पत्र लिहीले आहे त्यावरून श्रुत जाले असेल. येदयावतसंपन्न राजश्री नारायेण दीक्षित ठकार यांसी मराठा प्रकर्णी साहेबांकडे येथून निरोप जाणे साहेबांनी वस्त्रें देऊन निरोप घेणे समागमे राजश्री मानसिंगराव मोहिते व भगवंत

गोपाल यासी दिल्हे. आज निवर्गाचे येथून कुच होऊन मुक्काम केनज[ल]चा असे. राजश्री सोमाजी मोहिते याचे समाधानास्तव येथून राजश्री रघुपतराव पांडुरंग व विश्वनाथ जोसी यासी सातान्यास पाठविले होते. त्याणी त्याचे समाधान बहुता प्रकारे करून विश्वनाथ जोसी आपले घरास राहिले आणि रघुपतराव येथे आले. विश्वनाथ जोसी घरास राहिले आहेत ते आज येथे येणार आहेत. छ २५ रोज गुरुवारी विठल बलाल सुभेदार प्रांत वराड याणी हनमतजग प्रकर्णी पत्रे येथे सरकारात पाठविली होती. ती येथून पत्र व खास दस्तूर चिठी येसी कारभारी याजकडे पाठविली आहेत. आनानस घऊन साडणीस्वार आला होता. त्याच उतर खास दस्तूर घेऊन पाठविले आहे सेवेसी पोहोंचेल रोज छ मजकूर रोज शनवार प्रथम प्रहर दिवस सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति.

## ३३६

रु. न ९६ श्री ता. २४ मे १७८९
फा. न १
पत्र न. १९१

साहेबाचे शेवसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक दंडवत् विज्ञापना ऐसी जे. ताा छ २८ माहे शाबान मुा देऊर येथे साहेबाचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे. यानतर येथून बुनगे रवाना जाले व नारायेण दीक्षित व मानसिंग मोहिते व भगवत गोपाल साहेबाकडे रवाना केले. याचा मजकूर कालचे पत्री लिहीला आहे त्याजवरून श्रवणात आलाच असेल. आज रोज रविवारी प्रातःकाळी मुखमार्जन करून सेनासाहेब सुभा खातगूण पिराचे स्थळ. तेथें नवस गलफ करावयाचा आहे याजकरिता येथून किती कोस पुसत होते. त्यास बारा कोस आहे चिमणगावावरून जावें लागते, ऐसे तहर्कीक करून आपण जावें ऐसा निश्चये ठहरला नाही. कदाचित जाणे जाल्यास सेवेसी लिहीण्यात येईल. महमदआली याजबराबर गलफ पाठवावा ऐसेहि आहे. साप्रत येथे काहीं काम नाही. रिकामपणी देऊर येथील पाटील पांडे कुलकर्णी जमा करून त्यास पुसत होते की, रामोसी येथे वतनदार असता गावात चोरिया जाहाल्यात. येसाजी खडेराव व विठोबा सरकारचे कारकून याचे घरावर दरवडे घालून चीजवस्त नेली आहे, त्याची वाट काये? ते चोरी कोण्हे भरून द्यावी, ऐसे पाटिलास पुसत होते. तेव्हा पाटिलानी उतर केले की, ज्याची चोरी जाली असेल त्याने वाजवी सागावे त्या प्रो रामोशाचा इनाम जफ्त करून चोरी भरून घ्यावी आणि तुम्ही पाटिलानी आपला जिमा करून द्यावा की, पुन्हा गावात चोरी होऊ नये. यैसी ताकीद करून येथील बदोबस्त करवितात. येविसी जो ऐकनार नाही त्यास नागपुरास घेऊन जावे. सारे पाटील मिलोन येक कारभारी करून ठेवावा. वरकडानी नागपुरास चलावे तेथून जो बदोबस्त करणे ते करून देऊ. तेथील कामाकाजाचे गुते साहेब उगऊन देऊन कारभारीयासी निरोप देतील तेव्हा त्याचे पत्र येथे येईल कूच करून जेजूरीस यावे तेव्हा येथून कूच होऊन जेजूरीस येतील. आता सडे होऊन बसले आहेत. वरचेवरी कारभारीयासी डाकेबराबर पत्रे लेहून पाठवितात की, लवकर तेथील गुता उगऊन यावयाचे करावे. प्रर्जन सन्निध आला आहे ऐसे येथे बोलत असतात. तिकडील सधान राखून वाट पाहात आहेत. खर्चाचाहि लोकाचा गळाठा जाला आहे. जो पोटासाठी जिकीर करतो त्यास पुढे जावयाविसी निरोप देतात. धारन तीन साडेतीन पायेली जोरी बाजरीची धारन आहे. येथेहि सरकारात कधी जागा होतो कधी निमचदी होती. कारण की, येथे कोण्ही साऊ सावकार बराबर नाहीं याजकरिता कूच लवकर होण्याविसी बहुत उतावळी करितात. उपाये नाही. सेवसी श्रुत होये हे विज्ञाप्ति रोज रविवार छ मजकूर दोन प्रहर दिवस

## ३३७

रु न ९६ श्री ता २५ मे १७८९
फा. न. १
पत्र नं १७४

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक विज्ञापना यैसी जे ताा छ २९ माहे शाबान मुा देऊर येथे साहेबाचे कृपाकटाक्षेकरून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष. येथील वर्तमान छ २८ रोज रविवारीं दोन प्रहर दिवसाची पत्राची रवानगी साहेबाकडे केली आहे सेवेसी श्रुत जालें आसेल. त्याउपरात छ मजकुरी साईकाली श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा सेरीचे बागात गेले तेथे घोडी फिरली. त्याजउपरी तेच समई येथून पत्राची रवानगी राजश्री भवानीपत मुनसी व माहादाजी बलाल याजकडे केली, त्यानतर आपले डेरियास आले. छ २९

रोज सोमवारीं प्रातःकाळीं मुक्काम कूच करून पवारगावर आले तेसमई मुनशीजी व माहाराजांची पलटण व कुंपणी चिरनिसीस यांसी पत्र लेहून सांडणीस्वार रवाना केला तो साहा घटका दिवस आला त्याच पुण्याहून सांडणीस्वार पत्र घेऊन आला ते अवलोकन करून दीड प्रहर दिवस चढता स्नान देवपूजा करून पुन्हा डेरीयासी येऊन असले सांडणीस्वार पत्रे घेऊन आला त्याची उत्तरें तेथील कारभारी यांसी दोन प्रहर दिवसा येथून दोन सांडण्या पाठविल्या उपरांत साकरपाणी घेतलें येथून कुनगे पुढे रवाना केले त्यांजबरोबर मस्त हाती रवाना केला तो तेथून चालेना म्हणोन कुनग्यांतून देशाधीपत पागेकडील यांचे पत्र आले आणि काल तेथे मोरेश्वरानजीक मुक्काम कुनग्याचा केला त्याचें उत्तर येथून पाठविलें कीं, त्या स्थलावर मोरेश्वरी हाती ठेऊन पुढें तुम्ही कुनगे वगैरे कारखाना कुल दर मजल घेऊन जाणे हाती बहुत मजबुत बांधणे की, कोणास उपसर्ग न होई आम्ही येताना हाती घेऊन येऊ. येसें उत्तर पाठविले नागपुराकडील पत्रें आज प्रहर दिवसा आले तेथे लिहील की महिपतराव दिनकर यांणी साहाग पुरस्कर हास्य करून ते स्थल जमीनदाराकडून घेतलें शहा पगास मागस जमासी आली व वीस पंचवीस माणसे कामास आली येथ महिपतरायास आले जे स्थल घेतलें ते मात दीर्घ मजबुताचे आहे ऐसी पत्रे सांडणीस्वार घेऊन आला साहेबास श्रुत होय हे विज्ञापना

## ३३८

द. नं. ११ श्री ता. २७ मे १७८९
फा. नं. १
पत्र नं. १०८

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बरवे कृतानेक विज्ञापना येसी जे ता छ १ माहे रमजान येथे साहेबांचे कृपाकटाक्षें करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष काल छ २९ रोज सोमवारीं दोन प्रहर दिवसाचे वर्तमानाची पत्रांची रवानगी साहेबांकडे केली आहे त्यावरून श्रवण जाहलें असेल. त्याउपर सायंकाळीं श्रीमंत राजश्री सेना साहेबसुभा यांणी स्नान करून देवपूजा येथे राहुटीस गेले तेसमई रा विश्वनाथ शास्त्री सातारियाहून आले श्रीमंतांसी तेथेच भेटले त्या दिवशी चाले त्यासमई वायू आसमंत मान आला त्यामुळें राहुट्या व कनाता वगैरे उडाल्या तेव्हां श्रीमंत सेनासाहेबसुभा तैसेच देवपूजेचे राहुटीहून वाड्यांत आले वायो पाव घटका रात्रपर्यंत मोठा सुरळ उपरांत स्तब्ध जाला, तेव्हां श्रीमंतांनी भोजन केलें आज छ मजकुरीं रा राजश्री देशमुख नाना उपाध्ये यांणी श्रीमंतास व मुतसदी मंडळीस भोजनास सांगितलें त्यास श्रीमंतांनी स्नान देवपूजा करून दोन प्रहर दिवसा खासे व च्यार पाच मंडळी लोक व पांडुरंग गणेश व देशपांडे राव भवानीशंकर व मानराव देशपांडे वगैरे कारकून असा मारा चौदा ऐसे श्रीमंताबरोबर श्रीमुखादेवीचें दर्शन करून उपाध्यायांचे येथें भोजन करून मागती आपले डेरियास गेले तोफेचे गोळे बाकी राहिले होते ते मराठी वासुदेवाबरोबर पुढें पाठविले साहेबास विदित व्हावे रोज मंगळवारी साहा घटका रात्रीस उदाजी वासुदेव यांचें पत्र आलें की, राजश्री सदाशिव राम यांसी ज्वर आल्यामुळें थांबले आहे याजकरिता येथून माहादाजीपंत लस्करी यांची डाके बरोबर प्रहर रात्रीस प्रथम प्रहरी पत्र लेहून रवाना केले असे येथून सांडण्या पाठविल्या आहेत त्याची उत्तरें काही आली नाहीत देऊरचे रखवालीबद्दल मोरो रामाजी नेरुरकर ठेविला असता त्याची वस्ती पडली त्यासी जमीन तीन चावर इनाम सात असता गांवांत चोरी जाली व दरवडे येक दोन बराबर पडले याजकरिता त्या नेरुरकर पुण्याचे मुक्कामी चोरीचे तहकीकातीबद्दल बोलाविला असता तो पळोन नांदगिरी व चंदन येथील बेरडाकडे गेला आणि तेथे बेरड जमा करून आणिक गांवावर चोरीचा उपद्रव करणार म्हणोन पानसे यांसी पत्र सखारामपंतास लिहिलें आहे रा छ मजकूर रोज बुधवार प्रातःकाळ सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ३३९

द. नं. ११ श्री ता. २८ मे १७८९
फा. नं. १
पत्र नं. १८९

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बरवे कृतानेक विज्ञापना येसी जे ता छ २ माहे रमजान मु॥ देऊर येथे साहेबांचे कृपा [व] अवलोकन करून सेवकाचे वर्तमान यथास्थित असे विशेष काल छ १ रोज बुधवार प्रातःकाळीं येथील वर्तमानाची पत्रांची रवानगी साहेबांकडे केली त्यावरून श्रुत जालें असेल त्याउपर स्नान देवपूजा करून भोजन श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा यांणी करून

दोन प्रहर दिवसा येथून पत्राची रवानगी तेथे कारभारी याजकडे केली. उपरात निद्रा केली. त्याजवर तिसरे प्रहरीं सेरीचे वागात गेले. तेथे निशानावर गोल्या हाजारी वगैरे याजहातून लाविले व जातीने येकदर गोली चालविली व घोडी फेरविली. धरनाजवल भोई बोलाऊन मासे धरविले. साईकाल जाला. दोन घटका रात्रौ आपले डेरियास आले. उपरात प्रहर नव घटका रात्र जाली. तदोतरी निद्रा केली तो पुण्याहून कारभारी याचें पत्रे साडणीस्वार मागील पाच घटका रात्र राहाता घेऊन आला. तैसेच श्रीमत सेनासाहेब उठून पत्रे आवलोकन करून सऊचविधी सपादून मुखमार्जन करून स्नान देवपुजा केली. प्रहर दिवस आला. साडणीस्वार पत्रे घेऊन आला त्याची उतरें खास दस्तूर लेहून तेथील कारभारी याजकडे पाठविले आहेत × × × (राजश्री) (सदा)शिव राम यासीहि खास दस्तुरें पाठविले असे. त्यात मजकूर लिहीला आहे कीं, प्रतिनिधीकडील तालुकियात कहीच्या चिठ्या आम्हाकडील होत नाहीत. येथे आल्या दिवसापासून वैरन विकत घेण्यात आली. हरयेक फरमावीस देखील केली नाही, कदाचित हाजरी बिगारीची बैलाची चिठी जाली असेल. ते बैलहि बिगारीचे माघारे आलेत. येविसीची तहकिकाती जिल्ह्याचे फडनिवीसासच बोलाऊन पुसावे. ऐसे येविसीचे मजकुराचें सदाशिव राम याचें पत्र आलें होतें त्याचें उतर त्यास लिहीलें आहे. येका दो रोजात येथून कूच करून हलके मजलीने जेजूरीस येणार. विणीवाल्याचे स्वार वाटेचे पाणी पाहावयाकरिता पाठविले होते. परतु निश्चये नाही. निश्चये ठहरल्यावर सेवसी लिहीण्यात येईल. साहेबाचे व राजश्री कृष्णराव जोसी याचीं पत्रें साडणीस्वार घेऊन आला आहे त्याचीहि उतरें देतो ऐसे म्हणतात. उतरें घेतली म्हणजे साडणीस्वार रवाना करून देतो. सेवसी श्रुत होये हे विज्ञाप्ती. रोज गुरूवार दोन प्रहर दिवस

## ३४०

रु न. ९६ श्री ता. २९ मे १७८९
फा. न. १
पत्र न. १७५

साहेबाचे सेवेसी

आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक दडवत् विज्ञापना ऐसी जे. ता। छ ३ माहे रमजान मु।। देऊन (देऊर) येथे साहेबाचे कृपावलोकने करून वर्तमान येथास्थित असे. यानतर येथील दिनचर्याचा मजकूर छ २ रोजचा लेहून सेवसी पाठविलाच आहे. त्याउपरी श्रीमत सेनासाहेबसुभा निजून तिसरे प्रहरीं उठल्यानतर साहेबा-कडून जासूदजोडीबराबर पत्रे आली ते निजून उठल्यावर गुजरलीं. वाचून पाहून नागपुराकडे श्रीमत मातुश्री बाईसाहेबास खास दस्तुरें पत्र शपतपूर्वक लिहीले की, होणार तें जालें. वारवार झिगाबाईचा शोक करीत न जावे ऐसे पत्र लेहून डाकेबरोबर रवाना केले. काल दोन प्रहरी राजश्री दुर्गोजी महाडीक याजकडे कर्ज पधरा हजार रुो होते त्याचा करार पहिले मातुश्री बाईसाहेबीं तगादा केला होता तेसमई विश्वनाथ जोसी व बाबुराव सुभेदार याचे विद्यमाने करार केला की, कैलासवासी आपासाहेब बदामी-कडून पुण्यास आल्यावर मी वाट करून निर्गत लाऊन देईन म्हणान दोबापाची शफत लेहून दिल्ही असता तो पुण्याचे मुकामी न आले. त्याजवरून हाली रा। पाडुरग गणेश याचे नावें पत्र लेहून बाणदाराचा कारकून वासुदेवपत व बाणदार च्यार तगादियासी पाठविले होते. त्यास दुर्गोजी माहाडीक याणी तो भेटी घेतली नाही गावात आसता भेटी न घेतली त्याचे पुत्र व नारायेणजी मोहिते घरीं होते. त्याणीसुदा जाबसाल न केला आणि पत्रे वाचून न पाहिले. आणि कारकुनास बसूहि न दिल्हे. तेव्हा तो तैसा रात्रीस उपासी त्याचे दारीं राहून उठोन आला आणि या प्रा। येऊन बोलला, याणीहि कारकून पाठविला. त्यास सागितले की, सोयरे आहेत त्याजवळ रोज न घेणे. ऐसे असता त्याणी विचार न करिता कारकून काढून दिल्हा. त्याजवरून येथून गुलामआली चक याचे स्वार तयार करून पाठवीत होते तेव्हा म्या व विश्वनाथ जोसी याणी विनति केली की, तेथें स्वार पाठऊ नये त्याजवरून मज म्हणो लागले कीं, तूच जा. तेव्हा म्या उतर केलें कीं, मी जाईन परतु आपल्यापासी कोणही नाही. आला जाबसाल करावा लागतो. मग तेथे पत्र पाठवावयासी मज व विश्वनाथ जोसी यासी आज्ञा केली. त्याजवरून बाबूरावजीस आम्ही उभ-येतानी पत्रे लेहून आपले सरकारची जासूदजोडी पाठविली. कारण की, ते यासी माहीत आहेत इतला पुण्यास साहेबा-कडे यावा लागेल म्हणोन त्याचे पत्री लिहीले आहे. त्याचे उतर येईल तैसे लिहिण्यात येईल. येविसीची सविस्तर पत्रे राजश्री सदाशिवपत गुणे व मुनसीजीस लिहीले आहे. तिकडून उतर येईल तैसे करतील सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति. रोज शुक्रवार प्रात काल

## ३४१

रु. नं ९६ श्री ता १० मे १७८९
फा नं १
पत्र नं २१०

श्रीमंत साहेबांचे सेवेसी

आज्ञाधारक मल्हारजी बरवे कृतानेक दंडवत विज्ञापना ऐसीजे ता छ ४ माहे रमजान मुा वेऊर येथे साहेबांचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे यानंतर येथील दिनचर्येचा मजकूर छ २ रोा शुक्रवारचें पत्र साहेबांचे सेवेसी पाठवण्यात आले आहे त्यावरून मजकूर अवगांत जाला असेल त्यानंतर रा रामचंद्र नाईक वानवळे पटणकर यांचा गुमास्ता त्यांची पत्रें काल प्रात काळी घेऊन आला होता त्यांत मजकूर लिहिला होता की, वीयरूमानी हिंदुस्थानांतून यांचा छासाव्या हुंड्या मजवर केल्या आहेत त्या हुंड्यांची सरबरा करून हुंड्यांवर भरपाई करून द्यावी लागती यास्तव बक्षिस पत्रेच तीर्थरूपांची पाहावयासी पाठविली आहेत याजकरिता या प्रसंगी आपणासी बोलली होतो व आपणही आज्ञा केली होती तो अर्थ मजकडून घडत नाही म्हणोन महाराजांपर्यंतासी उत्तर करणे आणि जे चाकरी करावयाची ते पैठणीचे मुकामी करणे त्याचा येवज लाऊन द्यावा आणि गंगाधरपंत यैवज लाविला आहे त्याची ताकीद करून येवज या प्रसंगी द्यावा ऐसे गुमास्तीयाने बोलणे केले त्यावरून गंगाधरपंत ताकीद आपासी गायाऊ यासी दिल्ही आणि त्यांचे पत्राचे उत्तर लिहिले की, आम्ही लवकरच नागपुरास जातो तिकडे गेल्यावर तुमचा येवज राहिला असेल तो लाऊन देऊ एसे पत्र देऊन गुमास्ता निरोप केला परंतु महाराजांपर्यंत त्यांणी या प्रसंगी कबूल करून दिसका लिहा हेही चितांत आहे परंतु उपाय नाही त्यावर विश्वनाथ जोशी यांसी बोलले की, पूर्ववत् प्रा तुमचे वेतन करून दिल्हे आहे त्या प्रा तुमचे चालवू तुम्ही आपले कुटुंब दसरा जाल्यावर नागपुरास घेऊन यावे ऐसें बोलल्यावर त परवा सातारियास गेले फिरोन आणिक सोमाजी माहिते पाथरडवर येणे ऐसें सांगून निरोप केले त्यावर वैजनाथ कुळकर्णी यासी शालजोडी व पंचा निरोप व शभर रुपये देऊन त्यास निरोप केले त्या उपरांतिक पुण्याहून चार भारी यांची पत्रे व नागपुरची पत्रें डाक स्वार आली तें वाचून पाहिल्यावर पुण्याहून डाक लोखंडी पर्यंत या करितां गारपीर व मारेश्वरावरून डाक बसावयाची आज्ञा केली त्यावर निद्रा करून उठल्यावर विश्वनाथ जोशी यांचे पत्राचे उत्तर सातारियाहून बापूराव यांचे आले की या दुर्गोजी माहाडिक पुण्यास श्रीमंताकडे चाकरीस गेलेत येथें नाहीत सेनासाहेबसुभा यांचा तगादा आहे तरी त्यासी तिकडेच समजोन घ्यावे ऐसे बोलावे ते पत्र वाचून पाहिल्यावर येथून कारभारीयांस व सदाशिव राम यासी पत्र लेहून त्यांजकडे हें पत्र पाठविलें आणि दुर्गोजी माहाडीक यांसी तेथें तगादा करून ऐवज वसूल करणें ऐसें लिहिलें मग लक्षुमणराव व बयेरामराव पाटणकर कुटुंब घेऊन आले त्यांचे चांदनीखाली जाऊन बसले तेथें विडे घेऊन गांवांत देवीच्या दर्शनास गेले दर्शन घेऊन वेदमूर्ती येथ म दीक्षित उपाधे कुटुंब घेऊन नागपुरास जावयासी प्रस्थानी निघालेत तेथें गेले त्यासी बोलून त्यासमागमे सिवसिंग हजारीचे पचवीस स्वार मार्गाचे व चौकी पाहारीयास दिले त्याणी पैठणी सेला तिवट व श्रीफळ दिल्हें मग नमस्कार करून डेरियास आले त्या साहेबांचे पत्रांचे उत्तरांचें पुसलें उद्यांक देतो ऐसे बोलले उत्तर घेतल्यावर सेवेसी पाठवितो सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति रोज मंगळवार प्रातःकाळ

## ३४२

रु. म ९६ श्री ता ११ मे १७८९
फा. नं १
पत्र नं १८७

साहेबांचे सेवेसी

आज्ञाधारक मल्हारजी बरवे कृतानेक दंडवत विज्ञापना ऐसीजे ता छ ५ माहे रमजान मुा वेऊर मेघ साहेबांचे कृपावलोकने करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे यानंतर येथील दिनचर्येचे मजकुराचें पत्र घनघारी मातःकाळी सेवेसी रवाना केले हें घेऊन पोहचलें असेल त्यावर नागपुराहून डाकेवरावर रामटेकी पानें आली त्यापैकीं समर पानें रामजी भवानीपत मुनसी (याजकडे)स पाठऊन आपणाकडे यावयाविशी त्यांस लिहीले आहे उपरांतिक भोजनउत्तर निद्रा करून उठल्यावर च्यार घटका पावसांनी अतीशय केली मग प्रहर रात्र पावेतो थोडा थोडा होता लस्कर मुनग पाटे लाऊन सज राहिले आहे आमचेवर लस्करावर पाऊस पडला नव्हता काल पाऊन पडल्याने गरमी जाहली येथून सांडणीस्वार कारभारी

याजकडे पाठविले आहेत. त्याची वाट पाहातात तेथून उलगडा जाहालीयाची पत्रें आली म्हणजे येथून कूच करावे आणि जेजूरीस येऊन दर मजल आपले प्रातात जावे हाच निजध्यास आहे कारभारी याजकडून साडणी यावयाची वाट पाहातात. आजहि दुर्गोजी माहाडकाकडील यैवज वसूल करून घ्यावे म्हणोन कारभारी यासी लिहीले आहे. रामटेकी लेहून पानाचा तलास तांबोली याजकडे आम्ही करून सेभर पानें निघाली ते आणऊन साहेबास चिठी लेहून पानें साहेबाकडे पाठविली असेत. आणिक पानें डाकेबराबर यावयाविसी ताकीद केली असे. प्रतिनिधींच्या तालूकियास उपद्रव न व्हावा म्हणोन साहेबाचें व कृष्णराव जोसी याचें पत्रे साडणीबराबर आली होती त्याची उतरें देऊन साडणीस्वार विदा केला असे. बागाचे शेरीपासी धरण होते ते पाहावयासी गेले (ते) थे जागा पाहून येथून काळीतून कूच करून + + + च बरडावर मुकाम करविला. विठल नीलकठ याचे सरकारचा कारकून याचे सरकारचा कारकून याचे घरी देऊरात भोजणास जाणार. समागमें खासेसुधा मऱ्हाटे साहाजन व कारकून मुतसदी पाडुरगपत व येगवतराव व रघुपतराव व जानराव ऐसी दाहा आसामी जाणार. पुढें जे दिनचर्या होईल ते सेवसी लिहीण्यात येईल. सेवसी श्रुत होये हे विज्ञाप्ति. रोज रविवार दोन प्रहर दिवस.

## ३४३

रु. न. ९६ श्री ता. १२ जून १७८९
फा. नं. १
पत्र नं. १७२

साहेबाचे सेवेसी

आज्ञाधारक मल्हारजी वोरपे कृतानेक दडवत विज्ञापना ऐसी जे. येथील क्षेम ताा छ १७ माहे रमजान मु॥ नजिक जेजोरी येथे साहेबाचे कृपावलोकानें करून सेवकाचें वर्तमान येथास्तित असे विशेष दिनच्यर्याचें वर्तमान छ १६ गुरुवारीं प्रातःकाली करजीयाचे मुकामीहून लिहीले आहे त्याजवरून ध्यानारूढ जाहालीच आसेल. त्याजवर छ मजकुरी गुरुवारीं करजीयाहून कूच करून जेजोरीवर मुकाम नेमला होता. बुनगे देखील गावाजवळ उभे राहिले परतु पाणी नाहीं याजमुळें घोडे उडान करानदी उतरतिरी येऊन राहिले. तेथून जेजोरी येक कोस आहे. सेनासाहेबसुभे याची स्वारी मागाहून स्नान करून देवपूजा करून गाईची पुजा जालियावर कारभारी याचे पत्रे आलीं तीं वाचून पाहिली. त्यानतर बोलू लागले की, पाये दुखतात व उभे राहिलो म्हणजे भोड येती यैसे बोलून तेथून उठोन सोमया माहादेव याचें दर्शन घेऊन देवपुजाराणी प्रमाद दिल्हा तो घेऊन तेथून कूच करून स्वारी मौजे कोल्हार नजिक जेजोरी येथें आली तो आणीक कारभारी याचे पत्रे आली तीं वाचून पाहून त्याचीं उतरे तेथें बागात बसून लिहून देऊन साडणी व स्वार यास पाठविलें आणि ताकीद केली की, उदईक जलदी येऊन पोहचणे यैसे बोलून तेथून निघाले ते देवदर्शन न घेता येक कोस देव डावा टाकून परभारें बुनगियात आले. त्याजवर तिसरे प्रहरीं पाऊस आला त्याजमुळें नदीस पूर आला म्हणून नदीवर दोन घटका दिवसापासोन दोन तीन घटका रात्रपावेतो तमाशा नदीचा पाहात बसले होते मग उठोन डेरीयास गेले चतुर्थीचा उपवास होता. स्वारी येताना चिठया कडबा व लाकडे याच्या गावोगाव करितात व येतेसमई मौजे कोऱ्हार खुर्द याजवर कडे बुनगीयाणी केली त्याजमुले गावची तसनस फार जाली. सरकारातून ताकीदहि केली व गावावर ताकीददार ठेवीत होते परतु गावकरी ताकीददार याचा खर्च बसतो, दाणा व पोटास व सवा रु॥, याजकरिता ठेविनात याजमुले खराबीत आला. गावोगाव चिठया आपण करितात आणि गावकरी पाटील व मोकासदाराकडील कमाविसदार आला म्हणजे मला बोलाऊन सागतात की, याजकडून सरजाम देवणे. तेव्हा सागणे तो प्राप्तच जाले आणि भवताले गाव मातबराचे यास उपाय जाला पाहिजे म्हणून सेवेसी विनति लिहीणे प्राप्त जाली. याचा बदोबस्त करणार धणी समर्थ आहेत येथे मला बदलामीस पात्र करितात. छ मजकुरीं मुकाम आहे. बहुत काये लिहीणे हे विज्ञाप्ति. रवाणगी प्रातःकाली.

## ३४४

रु न ९६ श्री ता. १३ जून १७८९
फा न. १
पत्र न. २५३

साहेबाचे सेवेसी. अज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक दडवत विज्ञापना ऐसी जे ताा छ. माहे रमजान मुाा

जजुरी येथ साहेबाचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे यानंतर राज रविवारीं दिनचर्येचा मजकूर सेवेसी लेहून पाठविला आहे त्यावरून अवगत जाला असेल त्यावर राज सोमवारीं शिखरे महरीं राजश्री सदा शिव राम व भवानीपंत मुनसी व माहादाजी बल्लाळ व कृष्णराव माधव चिटनीस श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा यांसी जजुरीचे मुकामीं येऊन भेटले चौघाही च्यार मोहरा नजर केल्या फडनीविसाकडील नागोपंत फडके यांणी पांच रुपये व बाळाजीपंत यांनी पांच रुपये व मल्हारराव महादजीपंताचे भावे यांणी पांच रुपये येकूण पंधरा रुपये नजर केले तदनंतर सरसरी बोलणें जाहले सदासीव राम येथेंच बल्लारियाचे बागेंत राहिले बरकड मुनसी वगैरे लस्करांत उतरावयास निरोप घेऊन गेले आज कार्तीं मंगळवारी येथेंच उतरावयास बोलाविले आहेत येथें कारभारी आल्यावर जें बोलणें होईल तें सेवेसी लिहिण्यांत येईल सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना रोज मंगळवार प्रात काल

देवापुर्ढे भंडार व खारीक व खोबरें पंधरा रुपयांचें उधळलें व गूळ येकसें पंधरा रुपयाचा वाटला परकड देवाची ठिकाणें आहेत त्यापुढें रुपया कोठें कोठें अधेली मोहोरा ठेविले असेत तेथून येऊन ब्राह्मणांकडे संकल्प सोडिला त्यास ब्राह्मण आले व बाबा मुरळी व गुरव वगैरे पांच साहासें ऐसें हजार माणसांचें संतर्पण जालें ब्राह्मणास मोहन दक्षिणा दोन आणे प्रमाणें दिल्हे बाबा मुरळीस च्यार पैसे प्रमाणें वाटून दिल्हा येथील देवब्राह्मणांचा गुंता आज रविवारीं वारून उगविला आतां कारभारी भाचीच वाट पहातात ते आलियावर येथून कूच करून मोरेश्वराहून कुरकुंभावर जाणार. निवरेस उतार असल्यास गारदखेडेवर उतरून जातील पाणी असल्यास सिध्दटेकावर नावा जमा करून उतरून जाणार ऐसा बेत आहे नागपुराहून कृष्णाजी आबट वायुद व मल्हारजी घरपे यांस नागपुरचीं मातमीच्या पुरवण्या दोन आल्या ते सेवेसी पाठविल्या असेत त्यावरून सेवेसी श्रुत होईल हे विज्ञापना रोज रविवारीं संध्याकाळ साहा घटका रात्रीं रवाना केले असे

## ३४५

रु. नं ९१ श्री ता १५ जून १७८९
फा नं १
पत्र नं २५२

साहेबांचे सेवेसी

आज्ञाधारक मल्हारजी घारपे कृतानेक दंडवत विज्ञापना एथील क्षेम ता छ २० माहे रमजान मुक्काम जजुरी येथें साहेबांचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे विशेष राज शनवारीं श्रीमंत सेनासाहेबसुभा यांचे डोंगरावर सवारी येथील दिनचर्येचा मजकूर लेहून पाठविला आहे त्यावरून अवगत जाला असेल त्यानंतर देवाचें पदरावरचे वाड्यांत हात त्या वाड्यावरून नगरखान्यावर आले गायन त्या वाड्यावरून संध्याकाळीं दोनप्रहर पर्यंत बागेंत जाऊन राहिले तेथून संध्याकाळीं देवदर्शन करून आल्यावर डंगर मारवाड्यांना भेटाव करावयाची तजवीज करविली त्यावर रविवारीं प्रातःकाळीं स्नान देवपूजा करून देवाचे भांडार ब्राह्मण आभिषेकास पाठविले आणि मल्हारीवरून आपण देवाचे जाऊन पूजा करून देवापुर्ढे पंचवीस रुपये ठविले व पंणी वगैरे मध्य निरप घाली पातळ दिल्हे व निरंजन लिंग मंगरामहा च्यार दम्रें पाठविली

## ३४६

रु. नं ९१ श्री ता १७ जून १७८९
फा नं १
पत्र नं १२९

साहेबांचे सेवेसी

आज्ञाधारक मल्हारजी घारपे कृतानेक दंडवत विज्ञापना ऐसी जे ता छ माहे रमजान मुक्काम जजुरी येथें साहेबांचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे यानंतर काल रोज सोमवारचे दिनचर्येचें वर्तमान साहेबांस लेहून पाठविलें त्यावरून अवगत जालें असेल आज रोज मंगळवारीं प्रातःकाळीं श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभा यांणी स्नान देवपूजा करून गडावर देवाचे दर्शनास गेले देवदर्शन करून उतरेच्या पाठशाळेमध्ये बसले ता दीड प्रहर दिवस आला तो लस्करांतून राजश्री भवानीपंत मुनसी व त्यांचे नातू श्रीधरपंत व माहादाजीपंत व कृष्णराव माधव चिटनिसी वैगेरे आले त्यांणी देवदर्शन करून सेनासाहेबसुभा यांजवळ आले येतांत पांच साहा घटकापावेतो येतांत बसून बोलणें जालें उपरांत त्यास गडावरून उतरून डेरेसीच गेले कारभारी आपले उपाध्ये यांस यें जाऊन आपलाला देवब्राह्मण केले

तिसरें प्रहरीं श्रीमतानी निद्रा केली. मागील च्यार घटका दिवस राहाता उठले. दोन घटका दिवस राहाता राजश्री सदासिव राम व मुनसी व त्याचे नातू व कृष्णराव चिटनिवीस यैसे कचेरीस आले. वाड्यात राहूटीत खासे व कारभारी यैसे च्यार घटका रात्रपर्येत येकात बसून बोलणे जाले. उपरात कारभारी लस्करात आपलाले राहूटीस गेले. उपरात येथून कूच करून मोरेस्वरचा मुकाम नेमला आहे. प्रातःकाली लस्कराचें कूच करवोन रगोबानाईक वानवले व गगाधरभट आले. यासी बोलणें करून आपण तिसरें प्रहरी येथून मुकामास जावे यैसा वेत आहे. याजवर जैसे होईल तैसे सेवेसी लिहीले जाईल. सदासिव राम हेहि सेनासाहेबसुभा याचा निरोप घेऊन राजेवाडीचा मुकाम करितील किंवा येथेंच राहातील. सटवाजी पाटील गावडे आले ते गडावर सेनासाहेबसुभा यासी पाच साहा आसामियाने भेटले सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति

## ३४७

रु न ९६ **श्री** ता. १८ जून १७८९
फा. नं १
पत्र न २२६

साहेबाचे शेवेसी

आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक दडवत विज्ञापना ऐसी जे ताा छ २३ माहे रमजान मुाा मोरेश्वर येथे साहेबाचें कृपालोकनें करून सेवकाचें वर्तमान येथास्थित असे. यानतर काल रोज बुधवारीं जेजूरीहून कूच करून मोरेश्वरास श्रीमत् सेनासाहेबसुभा रात्रीस मुकामास आले राजश्री सदाशिव राम याणी कूच जेजूरीहून जाल्यावर स्वार होतेसमईं सेनासाहेबसुभा यासी वस्त्रे व घोडी करडी चागली याचे पसदीक येक दिल्ही. घोडी पाहून खूस जाले आणि यासीं विडे देऊन निरोप दिल्हा. जलदीने यावयाविसी आज्ञा केली मामापासून माझी घोडी घेऊन येणे, ऐसेहि बोलले. सचिवाकडील दाजीबा व नऱ्होबा सेनासाहेबसुभा याजकडे आले याची भेट घेऊन सदाशिव राम याचे विद्यमाने समागमें त्याचा कारकून घ्यावा ऐसे कबूल केले आणि त्या उभयेतासहि निरोप दिल्हा सदाशिव राम निरोप घेऊन आले ते सेवेसी येऊन पोहचले असतील. सचिवाकडील कारकून चिमणाजीपत ठेऊन उभयेता गेले. सटवाजी पाटील गावडे आटोले याचे अदणी आबले गावचे जाबसालाबद्दले आले. त्यासहि कबूल केले की, गावचा घासदाणियाचा बदोबस्त करून देवितो. त्यास हणमतराव आटोले यासी सेला पागूटे देऊन विदा केले. आज गुरुवार मोरेश्वर ब्राह्मण करून प्रहर साहा घटकाणीं ब्राह्मण जालियावर स्वार होऊन गारदवडेच्या मुकामीं भिमा उतरतिरास जाणार. बुनगे पुढे लाऊन दिल्हा असे. भिमेस पाणी माड्याबराबर आहे ऐसी बातमी आली आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञाप्ति रोज गुरुवारी रवाना च्यार घटका दिवसी

## ३४८

रु. न. ९६ **श्री** ता १९ जून १७८९
फा. न. १
पत्र न. २५१

साहेबाचे शेवेसी मल्हारजी वोरपे कृतानेक विज्ञापना यैसी जे. येथील क्षेम ताा छ २४ मुाा गार. साहेबाचे कृपावलोकनें येथास्थित आसे विशेष. छ. २३ तारखेचे वर्तमान मोरेश्वरीहून कूच जाल्याचें सेवेसी लिहीले आहे. काल देवदर्षणास सेनासाहेब गेले ते वेलेस देवास चीरा व दुपाटा तासाचा व रुाा ५ श्री गणपतीपुढे ठेऊन डेरीयासी आले व दाहा बारा ब्राह्मण यासी भोजन घातले. देवापासी सेनासाहेब ह्यासी प्रसादीक पागोटे पुजारी याणी दिल्हें भोजन जालीयानतर जरीपटका येशवतराव याजबरोबर मार्गस्त करून आपन मुनसीचे राहोटीस आले तो मुनसी भोजनास बैसले होते भोजन होये तावत्कालपरीयेत बैसून मुनसी भोजन करून उठल्यानतर मुनसीस आज्ञा केली की, आपन पुढे चालावे मजल दूर आहे. येणे प्राा सागून आपन रगोबा नाईक वानवले यासी बोलण्याविसी माहादाजीपत व कुशाबादादा व जाणराव येशवत यैसे दोन प्रहरपरीयेत तलावर राहोन रगोबा नाईक यासी बोलणे करून विडे देऊन वीदा केले देवाचे पुजारी येकदर रुाा २५ विदागी दिल्ही नतर स्वार होऊन चालले. कुरकुमचे देवीचें दर्षन करून मार्गी येताना घाटाखालीं प्रजन्य लागला. तो सतत भीमातीरपरीयेत प्रजेन्यात आले एद गगेस उतारच होता. स्वारी दाखल होताच पाणी विसेष आले ठाव मात्र मोडला तेव्हा खासे नावेवर बैसून गारेस मुाा डेरेदाखल जाले. आस्तमानची वेले स्वारीचे लोकास उतरावयासी फुरसत नाहीं. सबब दवडेस कुशाबादादा व

माहाराजांपर्यंत व खासगत बैसे राहिले व मुदलसांचे उंट तसेच विकडे राहिले धुनगे वगैरे लोक आधीच आले होते मुनशीही उतरून आले श्रुत होये गार हे गांव आपला साहेबांचा त्याजवरून घोनविसी उपसर्ग लागणे नाही याचे विठलराव यांसी पाटीलल्यांचे हकडे वकीलीस खाण्या विसी लिहे दिल्हे विठलराव आणराव येसाबत यांचे मासे आणी यिन्ल्लराव यांचे बधू यहील विमखेच आहेत श्रुत हाय पाणी गंगेस कालचे पक्षी पाच हात उतरले. त्यासे हीसी घाटावर मायकाळी मुसलमानाश्न करीत बसले होते नाथा उतरावयासी शुरु जाल्या लोकही पाच चारसें आहेत आज यावल्याचे पिंपरीस मुा साडा कोसावर आहे श्रुत होये हे विज्ञापना

## ३४९

रु. नं ९१ श्री ता २० जून १७८९
फा नं १
पत्र नं २१७

साहेबांचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बापूजी कृतानेक विज्ञापना येसी जे आज्ञाधारकाचे वर्तमान साहेबांचे कृपावलोकने करून येथास्थित असे विशेष छ २४ तारखेचे व भिमा उतरून आलीयाचे सेवेसी लिहीलेच आहे जे लोक माग उतरावयाचे राहिले होते तेहि उतरून आलियावर सेनासाहेबसुभा यांनी गारेहोन कूच करतांना येसाजी गमोन गऊमान हिरण्येश्वराचे देवपुजेचे रार्टीत करून रुा ५ दक्षणा दिल्ही नंतर भिमेस स्नान करून तपण करून आणि स्वार जाले तो मुकाम यावल्याचे पिंपरीस भिवांचे मही डेरेदाखल जाले डेरियांत दोनचार घटका बसले तो नितक्रियात गंगाजलनिमळ मागेरथीबाई सिंदे यांणी आपला कारकून यो चिमणाजीपंत नामे यांजबरोबर दास्या आंब्याच्या सुमार २ गोन भीगोंद्याहून पाठविल्या त्या सेनासाहेब यांणी घेऊन कारकून मार यांसी पाईकडील आगतस्वागत वर्तमान विचारिलें त्यांनाहि यथानुक्रमें निवेदन करून कारकून मार मुकामीच राहिले नंतर साहीपाली पिंपरीस समीप स्नानास हवे आहे, तर्थे सेनासाहेब जाऊन बसले तो राजश्री दारकोजी यावले व राजश्री मुधुराव व त्यांचे मुलें व समागम च्यार भले माणसें देख येऊन भेटले उभयतांची मारगें हिंदुस्तानांतील राजश्री++++++ यांच्या लग्नाच्या प्रकरणी बोलण++

तीन घटकापर्यंत येकत्र बैसले होते सेनासाहेबसुभे यांस यावलेमार यांणी सेला व पागोटे कुडी व येक घोडा येस दिल्हे नंतर सिंदे यावले यांसी दिल्हे आणि उठोन डेरियास आले यावलेहि आपले घरास गेले सेनासाहेब डेरियास येऊन स्नान केले तो गंगाजलनिर्मळबाईंनी भीगोंद्याहून निरपणाचे उपहारास्तव गुळभसाकरी व पेढे व बतासे व हलवा व मुरबा आंबल्याचा येणेप्रो पाठविले कारकून मार याने आजूर (अंजीर?) आणून दिल्हे नंतर छ २५ रोज शनवारी पिंपरीहोन कूच करताना यावले मार निरोपास आले त्यास वर्जे सेले पागोटे पैठणी ती आसामी यांसी दिल्ही यावले यांणी सेनासाहेबांस बकुला २ छाहोरी दिल्हा नंतर यांणी यावले यास सांगितलें की, आम्हास कुतरेयाच्या जोड्या दोन चांगल्या मेळवून देणे आज आपल्या आसल्यास उत्तम आहे तेव्हा यावले यांणी उत्तर केलें की, आमचे कुतरे येथें नाहीत त्यास उजेनी होन जोडी येक पाठवून देऊ आणि राजश्री पाटीलबावा यास लिहून जाल्या २ आणवितो, त्याही पावत्या करू उपरांत यावले समागमे बाबुराव येक कोसभर बरोबर आले तदोत्तर माघारे फिरोन आपले गांवास गेले पिंपरीहोन कोस पांच घोटवी मुा करद येथे मुकामास आले छ २६ रोज रविवारचा मुकाम येथून कोस सुमार आलय सिना उतरून पैलीकडेस नामे रई प्रांत कडेवलीत येथें आहे पुढें करवीचे घाटे उतरून जावे येस आहे दुसरे गंगा देवीच्या घाट समीपच आहे परंतु करवीचे घाटेंच जावे हेच मानस फार आहे साहेबांचे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ३५०

रु. नं ९१ श्री ता २१ जून १७८९
फा नं १
पत्र नं २१८

पुरवणी साहेबांचे सेवेसी येथून श्रीमंत राजश्री सेनासाहेबसुभे यांणी साहेबांस व तात्यास व सदाशिव राम यांस पत्रें लिहीलें ते येऊन पावतील साहेबांस पाण विसर्यानी सेनासाहेब यांणी आपल्यास न ठेविता पाठविली हाक बराबर आली होती उगाची बाबूजी व पाळगीरस्त यास ठणक निरोप देणार तरि सेवेसी येऊन पावतील मागरथीबाईचे कारकुनास सेला पागोटे दिल्हे आणि सनू

बाई सिंदे याचा कारकून येथे आले की, राजश्री मालोजी घोरपडे याचा नातू यास बोलीचाली करून पदरी ठेवावे याणी उतर केले की, दसऱ्यास कारकुन पाठवणे मग योजना केली जाईल. सेवेसी श्रुत होये रवाना छ २६ रोज रविवार दिवस घटका दाहा हे विज्ञापि

## ३५१

रु. न ९६ श्री ता २२ जून १७८९
फा नं. १
पत्र न. २५०

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी बोरपे कृतानेक दडवतर विज्ञापना ऐसीजे ता छ. २७ माहे रमजान मुा रुई येथे साहेबाचे कृपावलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे यानतर रोज रविवारी सेवेसी दीनचर्याचा मजकूर लिहीण्यात आला आहे. त्यात रामटेकी पानें पुण्यास रवाना केली म्हणोन लिहीण्यात आले आहे. त्यास पानाची पेटारी रवाना करते समई सोडून पाहिली. तरी पाने मार्गानी येताना पेटारीत सडून गेली म्हणोन रवाना करावयाची महकूफ केली. त्याजवर तलाहून स्वारी स्वार होतेसमई नारायेणजी बावले व मुगूटराव पिंपरीहून आले होते मुगूटराव याची बोली करून आपले पदरीं ठेवावे ऐसे श्रीमतर सेनासाहेबसुभा यासी बोलू लागले. याणी पाडूरंगपत व जानराव येशवत याजकडून बोलविले की, आम्ही पनास पाउनसे मात्र ठेऊ. ते सेदोनशें ठेवा ऐसे म्हणत होते त्याजवर मागाऊन कारकून पाठऊन द्यावा. त्याजवल जें निश्चयें करणें ते करून देऊ, ऐसे बोलून विडे देऊन निरोप दिल्हा. तेच वेलेस नागपुराकडून डाकेची पत्रे आली त्यात मजकूर की, महमदखान तरीन आजारी होता तो मृत्य पावला त्यासाठी सेनासाहेबसुभा याणीं फार खराखरा केला की बहुता दिवसाचा सरदार मोठी बाजू गेली. तो छतीसगडाकडे बिंबाजीबाबाबराबर सारे सरदारीचा आला त्याचे जिमेस चालत होता. चालीस वर्षे पदरीं होता. मोठे उमदे काम सागावयाचा सरदार होता. तो गेला होणारास उपाये नाहीं त्याचे घरास समाधानास राजाश्री भवानी कालोजी गेले होते. ते परतोन येते समई घोडीहून पडले त्याचा जीववा हात दुखुन जरबेत आला आहे. त्यास उपाये महमदखान फिरगी करीत आहे म्हणोन वर्तमान आले असे आज सोमवारी येथून कूच होऊन करजीचे घाटावरील पिंपलगाव येथें मुकाम नेमिला असे सुरापूरवाल्याची पत्रे देउरचे मुकामी आली होती. त्याची उतरें दिल्हीं व येथून दोन बदुखा त्यास पाठविल्या. बालाजी सिवदेव उदाजी जासूद साहेबाकडे पुण्यास रवाना केले. येऊन सेवेसी पोहचतील. येथून सातमालनजीक करजी येथील घाट उतरून जाणार सेवेसी श्रुत होय हे विज्ञापि. रोज सोमवार दोन प्रहर

## ३५२

रु. नं. ९६ श्री ता. २५ जून १७८९
फा. न. १
पत्र न. २५४

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी वरपे कृतानेक दडवतर विज्ञापना ऐसी जे. ता छ. १ माहे सवाल मुा मौजे कवसान गगादक्षेनतीर पैठण उतरतीर येथें साहेबाचे कृपेलोकने करून सेवकाचे वर्तमान येथास्थित असे यानतर रुईच्या मुकमाहून बालाजी सिवदेव व उदाजी नवघरे जासूद रवाना केलीयाचे वर्तमान लिहीलें आहे तेही सेवेसी येऊन पोहचले आसतील. तेथून कूच करून श्रीमतर सेनासाहेबसुभा केलपिपळगावचे मुकामास आले तेथून मगळवारीं कूच केले ते सातमालच्या घाट करजीचे पूर्वेस दोन कोस चागला घाट आहे. परतु तीन कोसाची लामन आहे. त्या घाटानी काहीं गुता न पडता घाट उतरून तीसगावावर आले. तेथील बागात बसून फराळ केला तेयेंच तीसगावचे कमावीसदारानी सेनासाहेबसुभा यासी तिवट शेला दिल्हा. तेथून स्वार जाले ते आबडापुराहून भगुरच्या मुकामास आले. बारा कोसाची मजल जाली. रोज बुधवारीं प्रातःकाली स्नान देवपूजा करून भगुराहून स्वार जाले ते मार्गीं का सेगाव येथील रामराव देशपाडे, मनाजी शामराज याचे व्याही त्याचे घरास गेले. त्याणी सेनासाहेबसुभा यासी पैठणी तिवट सेला दोन वस्त्रे दिल्ही वरकड कारकून मडळी भोजनास देशपाडे आपले घरास वेऊन गेले. मुनसी व माहादाजी बलाल चिटनीविस गगास्नानास आले वरकड कारकून मडळीने भोजनें केली. त्यासही दोन दोन प्रो वस्त्रे कारकून मडळी(स) दिल्ही. आणि तेथून मुा मजकुरास आले गगेची पूजा करून नमस्कार केला की, उतार द्यावा त्याजवर येथे भोजन करून गगातीरी छावनी देऊन बसले पैठणी उतरतीराकडे तीन नावा होत्या. त्या अलिकडे आणऊन पागेचा कारखाना उतरावयासी लाविला. टोक्याकडील व गळनिमे व काळेगावच्या वगैरे नावा व पेटेकरी

मोकळविले असत गंगेस पाणी फार नेमस्तच आहे परंतु पाट मोठा, येक दोन रोज उतारास्थाची लागतील सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ति रोज गुरुवार प्रातःकाल.

### ३५३

रु. नं ९१ श्री ता २५ जून १०८९
फा नं १ पो छ ८ सवाल सन
पत्र नं १६ तिसैन मायाव

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी योरपडे कृतानेक विज्ञापना येसी जे, येथील क्षेम ता छ १ सवाल पावेतो मुक्काम पेठ साहेबांचे कृपावलोकनेकरून आज्ञाधारकाचे वर्तमान येथास्थित असे यानंतर राजश्री सेनासाहेबसुभा गुरुवारी राजश्री भवानी नागनाथ मुनसी यांचे येथें गले नागपुरास गमन होण्याचे मुहूर्त आगाऊ शुद्ध १२ स क्रिया वद्य ७ स उत्तम म्हणून सेनासाहेबांनी मुनसीस विचारले त्याचे उत्तर आलें कीं, राजश्री विठलपंत सुभेदार प्रांत वऱ्हाड यांचीं पत्रें आलीं कीं, हैदराबादेहून दरवेश महंमद नवा सुभा यांचा पत्रसार आला व यांचे मजकुराचीं पत्रें सरकारस्थान यांचीहि आलीं वऱ्हाडांत त्यांची गढीयावर ठाणे मानिले भेटीस येणार त्यास ठाणे मानिले आळजा पुरबाहेर नियाईयावर सच पत्रमस्केमचीं पस्ती आहे, त्या पत्रामध्ये नवा सुभा सुद्ध करून आल्मबुरचा बंदोबस्त करू म्हणून पत्र यावे तेव्हां सरकारस्थान पुढा शहरांत जातात हे कुवास्त गोष्ट आहे तिघनी भास त्यास काहींच संचार होणार नाहीं यास्तव भेटीस न यावे म्हणून ठाणमारानिल्हे पत्रें पाठवावीं व राजश्री भवानी रघुनाथ यांसहि पाठऊन सर्व अर्थ मुनयाने पैसा सव ठरऊन द्वितीय प्रहरीं पत्रांची रवानगी करून डाकेवर राजश्री विठल बल्लाळ सुभेदार याजकडे पत्रें त्याणीहि लिहिलें आहे कीं, सरकारस्थान यांस पत्रें पावती करावी म्हणून व मुनयाची भवानी रघुनाथ यांचीहि रवानगी केली आणि ठाणमारानिलचे मुनरमारपसमागमें उत्तर लिहून पाठविलें मुनयाचीं येथून कूच करून पांच कोस सांदुर घाटीचा मुक्काम पस्त रात्रीं गावे देवपुरेचे पाट येक व आमीन स्वारची पार्टी गेल्या यहून तीन पार्गी चोरांनीं नगी त्यास नवाबाकडील मामलेदार व पेठचे जमिदार आणविले ते मामलेदार व जमिदार गिरफदार झाले, याजमुळें सेनासाहेबांची मर्जी भारी रिक गर्मी मोर्गी

घतल्यासेरीज व्यागार नाहीं म्हणून मुनसीशीं मुद्दा चालला तेव्हां राजश्री रंगोबानाईक व रामचंद्रनाईक धानवडे यांचे घरकून येऊन रदबदली करून दोन हजार रुपयावर तोडून समजोती पाडली ब्राह्मणभोजन सुमार आसामी तीसपर्यंत पाठून आपण भोजन करून राजश्री रामचंद्रनाईक धानवले व बिजा छ्यू व बापू देव व बनोबानाईक हिंगे यांचे घरीं गेले वस्त्रें जालीं नंतर नांदुरघाटीस मुक्कामास गले शुक्रवारीं द्वितीय प्रहरी आणीख गंगेस पाणी आले ठाव मोकळ नावा चालत आहेत सबब पुढें जाणेयाचे ठरलें नाहीं पुढें ठरेल तैसी विनंति लिहीन गुमानजी माणे यांचे येक माणूस गंगेंत वाहून गेले सेनासाहेबांनी गंगा उतरलेयाचे वर्तमान साहेबांस लिहिले आहे. सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति

### ३५४

रु. नं ९१ श्री ता २५ जून १०८९
फा नं १
पत्र नं ११०

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घरपडे कृतानेक विज्ञापना ता छ १ सवाल मुक्काम कायस गंगातीर दक्षण-तीर सेवकाचे वर्तमान साहेबांचें कृपावलोकने यथास्थि[त] आहे विशेष काल बुधवारीं श्रीमंत सेनासाहेबसुभा मुक्कामास ये[ऊन] पोचल्याचा व कारस्थाना उतरा[या]चा मजकूर पाठविला तो सेवेस श्रुत जाहालाच असेल आज गुरुवारीं त्यासे पारावर मकान नावेवर उतरीत होते तो गंगेस प्रहर दिवसा उतार ठाव जाहाला त्यास सेनासाहेब भोजन करून उतरून जाणार. कांहीं लस्कर राहिलें ते आज सायंकाळापावेतो पार जाईल उद्यां कूच की मुक्काम त सेवेसी विनंति लिहीली जाईल डाकेचेमथोवर पत्र नागपूरचें मातबरीचें आलें तें आल्याहिरा सेवेसी पा आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञप्ति ता छ १ सवाल दोन प्रहर दिवस

### ३५५

रु. नं ९१ श्री आक्टोबर १०८८
फा नं १ पौठ १ सफर
प नं ५१

पुरवणी साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घारपडे कृतानेक विज्ञापना ऐसीजे, राजश्री सेनासाहेबसुभा व

राजश्री व्यकोजी भोसले व कारभारी ऐसे मिळून माले-मामलनीचे कामे विलेस लावितात व सेनाधुरधर असता व त्याचे हातची राज्यात जुणी मानसे होती त्याजवर त्याणी तस्करा काढायाचा उद्योग धरिला आहे. खुशालजी देशमुख याजकडे वराड प्राती व्याल्याचा किला नजीक बालापूर व वगैर काही माहालही होते त्यास छ २८ जिल्हेजी पावणे दोन प्रहर रात्रीस खुशालजीस व त्याचा कारभारी विठलपतास बलाऊन माहोतपदार व जेरबद आनऊन विठलपतास उभे केले त्यास म्हणू लागले जे, तुम्हीही कैसा कारभार केला तो सागा तुमचे मुदई याणी लिहून दिल्हे आणि तुम्ही रुजू करून देत नाहीत तेही समक्षेच आहे. तेव्हा हे वर्तमान भवानी काळो यास कळलें, ते येऊन त्यानी विनती केली जे, साहेब हे काये वडीलाचे हातची मानसे आहेत त्याचे अगी काम केवडे त्याचे साहेब खापर करतात हे ठीक नाही, याची विनती साहेबासी मी करीन त्यावरून उगच राहिले राजश्री धोंडो माहादेव व महमदखान तरीन याजवर सेनासाहेब रागास येऊन म्हणू लागले जे हा हारामखोर आहे याचे पारपत्यच करावें म्हणून फौजेची रवानगी करणार आहेत. त्यास येथील चाली या प्रकारच्या आहेत यावर काये घडेल ते साहेबाचे सेवेसी श्रुत होईल व सेनाधुरधर असताना मगलसेन जोहारी श्रीकासीचा राहणवाला येथे जवाहीर देत घेत होते तो घोड्याचा सरजाम हिऱ्याचे जडावाचा कडापटा येक व दुमची येक ऐसे याजकडे आणिले होते ते याणी जामदारखाण्यात मो[घ]मच ठेविले होते त्यास हाली सेनासाहेब राजश्री माहादाजीपत लस्करी याचे मारफतीनें पासष्टी हाजारास कडापटा व दुमची ऐसे घेतले त्याची वरगणी कुल कमावीसदारावर लक्षास दीड हाजार घातले आहेत. नजर सरकारात करावे ते राजश्री उमाजी माहादेव याचे हाती देऊन त्यानी सेना-साहेबास नजर केले साहेबाचे सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञाप्ति

## ३५६

रु. न. ९६ श्री १७८९
फा न १
पत्र नं. २९८

पुरवणी साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपे कृतानेक विज्ञापना येैसी जे. राजश्री सेनासाहेबसुभा यानी राजश्री जेनार्दन विश्वनाथ यास म्हटले की, तुम्हाकडे दप्तरखाना व मुलकी हिशेब आहे व कारभारहि करिता याजकरिता आम्हास मदत खर्च लाख रुपये द्यावे. त्यास त्यानी पचतीस हाजार पटऊन दिल्हे. बाकी राहिले तेहि मागतात व राजश्री बापू हालद याजकडे वराडपाडेपणाचे काम आहे त्याजपाशी पनास हाजार रुो मागतात. त्यानी निमे लाऊन दिल्हे. बाकी राहिले तेहि घेतात. राजश्री सिवराम हारी याजकडे खासगीचे काम आहे त्याजपासी लाख रुो मागतात त्याणी चालीस हाजार दिल्हे बाकीचेहि मागतात व हुसन महमद पेठेचा कोतवाल याजपासी लाख रुो मागतात. त्याचे मोगमच आहे परतु तो देईलसे वाटते व राजश्री विसाजी उमाजी निा पीलखाना याजपासी लाख रुो मागतात त्यानी उतर केले की, साहेबी मजला येक वस्त्र द्यावे आणि जे आहे ते साहेबाचे. त्याजवरून त्यास येकत्र नेऊन त्यास म्हणू लागले जे, तुजजवल पैका आहे नाही तो आम्हास ठाऊकच आहे, परतु तू का गरबडू नको, तुजपासी काही घेत नाही. परतु चौथाबरोबर म्हटलेच पाहिजे व देवगड व नागपूर व चादे व झाडी वगैरे प्रात याचे फडनिसी ज्यानी केली त्याचे व्यतनाचे यैवजी मामलत पाहून हाजारा बाराशापासून तीशा पावेतो मागितले त्यापैकी चालीस पनास हाजार रुो वसूल जाले व पेठतील साहूकार याजवल काही मागत होते. त्याजवरून पेठत दोन तीन दिवस गडबड जाली. तो राजश्री माधोजी नाईक काले येऊन येकात होऊन महकूब केले. पुढे काये घडेल ते घडो, सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञाप्ति.

## ३५७

रु. न. ९६ श्री पावसाळा १७९५
फा. न. १
पत्र न. ७५

[प्रारभी मजकूर फाटला] देऊन आतर पानदान [फाटले] आण राजश्री पाडुरग गणेश पाठऊन राजश्री बलवतराय मुढे व राजश्री मालोजी घोरपडे व रो निबाजी नलवडे यास आमत्रण सागून आले. त्यास या मडळीस आज मेजवानी आहे. सेभर आसामीची याद आली आहे त्यास आज प्रातःकाली सेनासाहेब याणी उभयेता कारभारी बलाऊन मागील प्रकर्णाच्या याठी पाहात बसले होते तो सेवकास बलाऊन नेले आण म्हणू लागले की आमची लाकडे का बद केली आहे ? त्याचे उत्तर केले की, आपले कूच जाले म्हणून खासगीवाल्यानी कायेद्याप्रमाणे बद केली आसेल, त्याजवरून फिरोन म्हणू लागले की, आम्हास

सरकारचा व नानाचा निरोप व्हावा नाहीं आम्ही येथ आहो तापावेतो असावें, येविशीं विनंति नाना यांस त्याहावी याजकरिता सेवेसी विनंति लिहिली आहे याजवर मर्जी आहे ज आज्ञा करणे ते करावी आज छोकास मेहमानी आहे आज लस्कर नाहीं काल उन फिरोन आले आहे व कारकारमारी नारायेणराव वैद्य याचे येथून आलियावर याचे वर्तमान आले ते सांगितले त्याजवरून मर्जी दिक आहे व नारायेणरावहि पानसे याचे येथे आहे तेव्हांहि काही खुलासा नाहीं येविसी विनंति नारायेणराव यांनी कलीच आसेल सेवेसी श्रुत होय हे विज्ञाप्ति

## ३५८

र. नं. ९९ श्री जुलै १७८८
फा नं १
पत्र नं १७८

पुरवणी साहेबाचे सेवेसी राजश्री भवानी नागनाथ याणी पत्रे राजश्री भास्करपंत सिवदेव याजला लिहिले आहे की, यापूर्वी श्रीमंत साहेबास नबाबाचा खरिता आला व आमचे नांवेहि खत आले की, गुग्राहाकडील वराड गंगथडी मामलतसमंधी बाकीवाकी राहिले ते फैसल्यात आले पाहिजे व मसलत प्रकर्णी बोलणे ज आहेत त्यास भवानी नागनाथ याजस्थ विना इकडे कसून यावे त्याजवरून हे पत्रे श्रीमंत राजश्री नाना व श्रीमंत राजश्री तात्या यांस येथून लिहिले व गुग्राहासहि लिहीले त्याजला दोन मास झाले पत्रे प्रविष्ठ पत्री किया नाहींत याचा बाकीबाकी मुमीहि काहीं लिहील नाहीं हे कांहीं समजत नाहीं मसलतींचे काम बहुत नाजूक आहेत तरी श्रीमंत नानांस व तात्यांस विचारून उत्तर लिहून पाठवावे म्हणून छ १० रमजानी लिहीले आहे सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ति

## ३५९

र नं ९९ श्री एप्रिल १७८९
फा नं १

साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपडे कृतानेक विज्ञापना येसिजे राजश्री मेनाबादरमुमा व उमरावा फार मारी व राजश्री बलवंतराव फडके ऐसे असून दोन तीन घटका येथवर होऊन, बळवंतराव फडके गेले तो राजश्री आपा बळवंत आले दोन घटका बोलणे जालेयावर आपास घरों दिल्हीं आग स्वारी तयार जाली बळवंतराव फडके यांचे येथे येतील सेवेसी श्रुत होय हे विज्ञप्ती

## ३६०

र. नं ९९ श्री १७९१ नंतर
फा नं १
पत्र नं १११

पुरवणी साहेबाचे सेवेसी आज्ञाधारक मल्हारजी घोरपडे कृतानेक विज्ञापना येसीजे प्रगणे गंगथडीकडील वर्तमान तर आनंदराव धोंडीराव सुभेदार मौजे धनसांगवी प्रगणे अंबाड येथे मुसलमानवासुधा आहेत फौज कांहीं आजपावेतो आली नाहीं म्हणून व या प्रांतात चौ सेर मापाचे आजीच पायलीची धारण आहे. गरीब गुरीब ठठोन घरास जावास राजश्री बलवंतराव फडके याचा व रोशनखान याचा कजया पडला आहे. प्रगणे पाथूर व प्यारठाणे ऐसे दोन माहाल रोशनखान याजकडे जागीर होती आनी फडके याचे गाव प्रगणे मजकुरी देशमुखी व पाटीलकीचे त्याजवरून स्वानानी फौज पाच हजार स्वार पायदळ येऊन मौजे मनूर प्रगणे पाथूर येथ मारचे खऊन बसले व फडके यांनी गाझीखान व काशीजी नाईक व उदाजी नाईक ऐसे वगैरे फौज आजीच हजार जमाव करून त्याजपासून येथ कोसावर मौजे उमरखेड प्रगणे प्यारठान येथ मुक्कामास गेले मग दाटी करून पाठीसी परंतु रोशनखान याचा जमाव भारी याणे थोडी मानसे जखमी जाली मनगा आन प्यार गिरद मांडले. परतु शस्त्र वगैरे सरंजाम सरला यानी बुरुज खाऊन अर्धा बुरुज पाडला मग टानगार व खेर पाडला विमान धरून बाहेर निघाले गनीत टान रोशनखानाचे बसले मग फडके यांनी प्यारठान मौजातील हाकून आणिले याजवरून याचा व त्याचा सख्त हायाचा कारभार लागला आहे फडके हाकून आहेत रोशनखान चारपासून दो कोसावर आहे, म्हणून खातमी आली साहेबाचे सेवेसी श्रुत व्हावे हे विज्ञप्ति

# 6 पुरवणी पत्रें (अनेकांचीं)

## ३६१

रु. न. ८८ श्री. २ मे १७७४
फा. न. १५ टीप—पत्र हरिपतांचे
पत्र नं. २९

पुा विज्ञापना. बोलिलो की जर आमची बहीण म्हणविता तर ज्यात परलोकचे साधन ती गोष्ट करा नाही तर प्रपच करावयाच्या गोष्टी फार सागतील. परतु परमार्थाची गोष्ट कोणी सागणार नाहीं. येविसी इतिहास फार सागितले. फार सतोषी जाली. आम्हाजवल वचन प्रमाण केलें की तुम्ही जें सागाल तें करीन. सर्व करून पाहिले फजित पडले. मुधोजीचा पक्ष ध्यानात आणावा तर तो दगाबाज आहे, माझे बननार नाहीं. साबाजी गरीब यास दुर्बुधी नाही. माझा लेक हाच याउपरी दुसरी गोष्ट करील ती हजार बापाची असेल याप्रों शफत केली. मग साबाजीस आणून पायावर घातले. तिवे जणच बसोन कितेक भाषणे जाली. उभयताचे आत करणात काहीं कीलाफ ठेविला नाहीं. मग आमचे गोटातून साबाजीचे गोटात गेली. त्याजवर येक दोन वेल मी जाऊन मातुश्रींसी बोलेन, साबाजीबावा त्यास येकत्र बसऊन निखालस गोष्टी जाल्या. आता उभयताचे प्रेम विशेष आहे. येक कारकून मी आपला मातुश्रीजवल ठेविला कारण कसी वर्तणूक करितात ही कलेल. अतर कोणाकडून पडते हेंही पहावे. जी गोष्ट आम्ही केली याजवर काईम आसावे असे वरचेवर सागावे. दिवसे दिवस रग पडावा दौलतीत कुपर होऊ नये, आमचे कारकुनाचे दाखल्यासिवाय मातुश्रींनी खर्चवेंच कोणती गोष्ट करू नये, या प्रो केले. प्रथम कारकून कबूल करीत नवती. परतु साबाजीबावानीं सागितले कीं, कारकून तुम्ही ठेविल्या खेरीज आम्हास ठीक नाही तेव्हा मातुश्रीस बहुत प्रकारें समजाऊन सागून आम्हाकडील कारकून असल्यास तुम्हासी करार केला त्यात अतर पडू देणार नाही. कोणाचा उपसर्ग लागणार नाहीं. त्याणे खातरजमा होऊन कबूल केले. आता भाषण हेंच की, यावतजीवपर्यंत साबाजीसी अतर करणार नाही. व तुम्ही आमचे नीट करून दिल्हे तुम्हास बटा लागू देणार नाही. याप्रो आमची खातरजमा केली. राजश्री नाना जोसी, दिवाकरपंत, भवानीपत, याचे विचारे गोड करून दिल्हें. सर्वांस सतोष जाहाला. साबाजी केवल आपला, दुसरे दैवत जाणत नाहीं. हीच गोष्ट शफतपूर्वक आहे. खातरजमा ठेवावी. येविसी नाना जोसी लिहितील. भवानीपत कारभारी त्याचे देवाजीपताचे नीट नवतें. ते नीट करून दिल्हे. कारभार भवानीपतानीं करावा दिवाकरपताचे महत्व रक्षावें. सान्यानी येकरुप असावें असे शफतपूर्वक करून दिल्हें माझे बुध्धीनें जाले त्यास कसूर केली नाही. व लौकिकातही याच गोष्टी कीं, ज्या गोष्टी न घडावयाच्या त्या घडल्या. सर्व पुण्यप्रताप स्वामींचा व येश स्वामींचे आहे. ती सरदारी केवल आपले खासगीची या प्रो केलें आहे. सविस्तर स्वामींस कलावें म्हणोन लिहिले असे. साबाजीबावा निरोप घेऊन गेले. साबाजीचे डेन्यास गेलों निरोप मडलीसह जाला, येक हती दिला, जवाहीर नाही त्याचे सात हजार रुपये कबूल केले. सरकारचे यादीत आहेत. केवल सरदारी गलाठ्यात आली खावयास नाही तेव्हा मी जातीने दरम्यान होऊन सावकारा कडून चालीस हजार रुा दिल्हे तेंव्हा कूच जालें. भेटीनतर सविस्तर विदीत करीन. तदोत्तर दो चौ दिवसी मातुःश्रीचा निरोप आला की मी निरोप दिला नाही. त्यावरून गेलो. साबाजीबावाकडून आपले तर्फेची वस्त्रे ठेविली येक हती दिला. बहीणभावाचे नाते मोठे खचीत जाले. कचे कलावें म्हणोन लिा असे. हे विज्ञापना.

## ३६२

रु न. ८८ श्रीशंकर १७७५
फा. नं. १५
पत्र न ३३

सेवेसी विज्ञापना यैसी जे. येथे वर्तमान मातबर ग्रहस्ताने राा धुरधरास सागितले. त्यानीं आम्हास सागितले. ते यैकून वृतीस जो क्षोभ जाहला तो श्रीहरी जाणे. राा धुरधरानीं विचारिलें जे पुढें काय? आम्ही उतर केलें कीं ईश्वरें सामर्थ्य दिले आहे, जें कराल तें होईल. त्यावर दिवाकरपतास विचारिलें. त्यानीं उतर केले कीं, आधी वर्तमान गलत आहे कदाचीत खरें जाहल्यास जर माझे यैकसील तर मी तमाशा करून दाखवीन. जर माझे यैकणार नाहीं तर याउपर रोजगाराची उमेद नाहीं. कासीस जाईन.

सान घष यमास यार्ती आता श्रम करणें आहे. आणि आईकल्याचर या गादीचा वा सुइ न येई त्याची आई छोयली घडाचे वियाचा या प्रो उतर केलें तेव्हां राा सेनाधुरधरांनीही याप्रो निश्चय करून हीच शपत त्यांणीही उच्चारिली चार स्थिरपर्यंत चैन उमप्तांस नाहीं हे श्रायरया आली आमची गती ईश्वर याणे हिमाळ्यास जावें हेच यासना दुसरा आय नाहीं तो इतकियांत आनाजी नाईक यानवले यांचें पत्रीं त्यांचे मावास आले त्यांनीं लिा होतें जे श्रीमंत नाना पुण्यास आले होत आम्हासी वालिले आणि आमची रवानगी राा हरीपंताकडे करणार. याप्रा पत्र वारा दिवसांत आलें त्यावरून चित्ताचे समाधान जाहालें आणि संतोष जो जाहाला तो श्रीहरी जाणे आम्ही स्थिरो राा आकुरा दऊन दोघ माणसांस वारा दिवसाचे करारानें राा लक्षुमण पंताकडे पाठविले आहेत या प्रो जाहालें स्वामीकडून पत्रें त्यास त्वरेनी येतील तव्हा सर्व संशय दूर होतील कळावें तावत्यान यास गांव इनाम लिहा त्यास पा बाम्गांव येथील गांव मार्डाबुज्रक पा मार येथील नेमून लिहा त्यास इनामपत्र स्वानमारांचे नांवें बाळी पाहीजेत याकरितां विनंती लिा आहे तरी कृपा करून इनामपत्रें वद्यारे करऊन पाठवावी म्हणजे खानमार यांस संतोष होईल तर लौकर पत्र यावी आनमान न करावा यये नित्य त्याचा उपद्रव आहे या करितां विनंती लिा आहे कळावें बहूत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विज्ञापना

## ३६३

रु. म. ८९ श्रीशंकर १७००
फा. मं १५
पत्र मं ३०

सेवेसी विज्ञापना ऐसी जे राा सेनासाहेबसुभा पुण्यास आले होते तेव्हां सरकारची नाटकशाळा तिचे नांव रमा तिची आई आहे व ती वैद्य टोपीकणी व दोन कुळंबीणी आहेत येकून चौघीजणी येरा सिलेदाराने काढून आणिल्या त्यास आम्हास हे वर्तमान येथ कळलें त्ये दिवीचे प्रनांत आहों इतलग झालीसी आहे स्वराजाची सुती फार येकिली आहे त्यास येथें स्थिर हा पडणार नाहीं परंतु स्वामीनीं येक पत्र श्रारजे नावे राा सेनाधुरधरांस व स्थिरकर पंतोस पाठवावें त्यांत स्वराज्य जे कुटुंबानी घाग्या यांणे सरकारची नाटकशाळा पळवून नेली आहे तरी याउगे मजकूरास ताकीद करून नाटकशाळा पाठऊन यावी या प्रो पत्रें आम्हांस व उभयतांस लौकर यावी, म्हणजे सादर पत्रेल विच्या आंगावर वस्तवानीही पांचुवात हकारांची आहे म्हणून येकल्यांत आले आहे तेथें दोघ त्यांची म्हणजे ठिकाण लागल आम्ही प्रेत्नास चुकत नाहीं सावेळ येसे आहे पत्रें लौकर पाठवावी सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना सारांश, बातीची सावधाई बहूत असावी दिवस बहूत कठीण आहेत ईश्वर सर्व पार पाडील परंतु हुशारी असावी कोणेविसीची उपेक्षा नसावी हेच विनंती वारंवार लिहिण्यांत येते रात्रदिवस नेत्र व अंतःकरणाच्या वृती स्वामींकडे आहेत बहूत सावध असावें वारंवार लिहितो म्हणून त्रास न मानावा हे विज्ञापना

टीप—वरील दोन पत्रें बाबुराव वैद्यांचीं दिसतात

## ३६४

रु. मं ८८ श्री १७७८
फा म १५
पत्र नं ६४

राजश्री नाना स्वामींचे सेवेसी विनती उपरी राजश्री स्थिरकर पुरुषोत्तम व बाबुराव विश्वनाथ यांचे पत्र त्यांस आपले पत्र ऐसीं आलीं त्यांतच चौकशीचा घरोबर. ते सविस्तर वाचून सेवेसी पा आहेत त्यास आलिकडे आपण जलदी करून करावे लिहिले व कळले नाहीं असो जें लिहिले असेल ते समजोनच लिहिलें असेल त्यास आगादर बाबूराव यांणीं यावें मग दस्तऐवजी पत्रें लिहिणें तर त्याहावें यांत सर्व मर्जी ! आपणही सदरहू प्रो केले असेल आणि करवील हे विनती

## ३६५

रु. मं ८८ श्री १७८५
फा म १२
पत्र मं १

पुरवणी श्रीमंत नाना स्वामींचे सवेसी विज्ञापना ऐसीजे दयाजी नाईक योवपराजर महले प्रकर्णी स्वामींनीं सांगोन पाठविलें तें श्रीमंत साहेबांस त्यांणीं निवेदन केलें त्याप्रसंगीं

श्रीमत(र) बोलले की पुण्याचे प्रसगी मडल्याच्या सनदा नानानी ममतापूर्वक दिल्या व आघटीत गोष्ट घडविली. त्या वेलेस राजश्री तात्यासी आमचे बोलणे जाहाले की ह देणे केवळ ममतेचे व लोभाचे व या सरदाराचे उस्तवारी काही बतीसा लाख रुपयाचे जाहागीरप्रमाणे नाहीं. आसलीयास तात्या, स्पष्ट सागावे व बोलावें. तेव्हा त्यानी उत्तर केलें की, तुम्ही म्हणता त्याचप्रमाणे, काहीं बलात्काराचे नाहीं. बहुता प्रकारे आपले समाधान असावे. ये विशई दुसरा विचार किमपी आपले चितात न यावा. या बोलण्याचे वारवार स्मरण करीत असतात तेव्हा जे घडावे तें सोये निघोन घडावे. स्वामी सर्वज्ञ आहेत तेव्हा याचा विस्तार काये ल्याहावा. व श्रीमत येजमानसाहेब सर्वस्व स्वामींचे भरोसीयावर असेत दुसरा अर्थ किमपी नाहीं. तेव्हा ही दौलत सरदारी रक्षणे व पेचातून काहाडने याचा अगत्य पुरतेपनं असावाच असावा. विशेष विनती ल्याहावी येसे नाहीं. सेवेसी श्रुत होय हे विज्ञःपणा

## ३६६

| | | |
|---|---|---|
| रु न ८८ | श्री | ३० नोव्हेंबर १७८६ |
| फा. न. १५ | | पौं छ १७ रबिलाखर |
| पत्र न १०–११ | | सन १२०० मु॥ नागपूर |

राजश्री मल्हारजी नाईक बोरपे व दताजी नाईक तोरडमल गोसावी अखडीत लक्ष्मीअलकृत राजमान्य श्री गणेश महादेव रामराम विनती उपरी येथील कुशल ता॥ मार्गशीर्ष सु॥ ९ रोज पावेतो वर्तमान यथास्थित असे विशेष. तुम्ही पत्र पा॰ ते पावले लिहिले सविस्तर कळो आले केशरी गोंड धुमावाला याणे मडला व छपारे या दोंही तालुक्याच्या दरम्यान लखनादोन व धुमा वगैरे तालुक्याची गावें मारून लुटीतो व कितेक प्रकारें उपद्रव देतो. यामुळे दहशतीनें गावें उजाड होत आहेत म्हणोन बातमी आली. याकरिता त्याचे पारपत्य करणें प्राप्त परंतु बातमी येविसींची लिहावी त्यासारिखे पारपत्य करू म्हणोन लिहिलें त्यास केशरी गोंड धुम्याचा यास राज्याच्या अमलामध्यें जागा होती. आपला अमल जाहल्यापासून त्याजकडील जागा सरकारात ठेविली. त्यास बारा वर्षे होत आलीं. हालीं छपारा व लखनादोन व हरईवाले याच्या जाग्यामध्यें राहून धुम्याचे गाव पाच सात मारिले व जमीदार धरून नेऊन दाड केला व वेपारी यास लखनादोन येथें छेकून च्यार पाचशे रु. घेतले. त्यावर येथून स्वार व प्यादे पाठविले. तेव्हा तो पळोन हरईच्या जाग्यात व छपारेवाले या दोघी जाग्यामध्ये राहातो त्याजवर येथोन स्वार प्यादे पाठविल्यास दोही जाग्यास उपद्रव लागतो. याजकरिता छपारेवाले यास व हरईवाले ठाकूर प्राते सावथाहो गाववाले जमीदार यास ताकीदपत्रं श्रीमत राजश्री सेनासाहेबसुभा यास विनती करून घेऊन पाठवावी. माहादजी जासूद व फिरंगोजी याजबरोबर बिदा करावी. हे इकडील वाकीफगार आहेत याजसमागमे आम्हीही कासीदाची जोडी पाठविली आहे आपले जासूद यावयास दिवसगत लागलीयास कासीदाबरोबर ताकीदपत्रे देऊन रवानगी करावी. गोंडमजकूर याणे दोन महिने बखेडा केला आहे. पाहाडात राहून रात्रीचा येऊन गाव मारून नेतो. त्याचे पारपत्य चागले झाले पाहीजे. शे दोनशे स्वार आपले सरकारचे येऊन गोंडाचे पारपत्य जाहलीयास आम्हाकडून कोणेयेक शब्द नाही. येथून स्वार व प्यादे जाऊन पारपत्य केलें जाईल, परतु आपले जाग्यात खराबी होईल. आणि येविसीचा बोभाट सरकारात जाईल यास्तव ताकीदी घेऊन पाठवाव्या. राजश्री मोरोपतदादा चदेरीच्या मुलकात गेले आहेत. पाचसात हजार स्वार व प्यादे व तोफा समागमे आहेत. दोन तीन गढ्या खालें केल्या. बरोदीयाचे गढीस मोर्चे लाविले आहेत पाच सात रोजात गढी खाली होईल. उपरात तिकडील बदोबस्त करून लौकरच येणार आहेत तुम्ही आपल्याकडील नवल विशेष वर्तमान लिहीत जावे बहूत काय लिहिणें, कृपा लोभ कीजे हे विनंती

## ३६७

| | | |
|---|---|---|
| रु न ८८ | श्री | मे १७८६ |
| फा न १५ | | |
| पत्र न २६ | | |

सेवेसी विज्ञापना. काल सध्याकाल च्यार घटिका दिवसास राजश्री सेनाधुरधर डेरीयातून निघून तोफ येक मार्ग डोंगरात राहिली होती ती चढवावयास गेले होते, ते दोन प्रहर तीन घटिका रात्रपर्यंत तोफा वर चढवून दिल्ही आणिखी दोन घटिका तेथेच लागल्या. तीन प्रहर रात्रीस डेरियास आले. आज प्रात.कालीच स्नान करून मोर्चात गेले तेथे राजश्री भाऊ व राजश्री आपा व राजश्री मखारामपत पानसी येसे आले. त्याणीं याचे मोर्चे पाहिले धुरधरानी भाऊस पुढे काय करावें कसे करावें हें पुसलें,

त्यांणीं उत्तर केले आपण सर्व जाणत आहेत आपल्यास सांगावे लागत नाहीं त्या गोष्टीनें श्रम वगैरे होऊन येईल ही गोष्ट आधी करावी म्हणून माऊन्हीं सांगितले त्याउपर स्नान संध्या करून, निरोप घेऊन त्रिवग माघारे गले पुरंधर चार घटिका दिवसपर्यंत तेथें होते त्या उपरी उभयतां पुत्र व सासा भोजनास लस्करांत डेरीयास आले कालच्या तळावरून आज कूच करून संकराजी घोरपडे यांच्या तळावर येऊन राहिले आहेत मोंगलांचे कूच होऊन सापन्यान्याच्या तळावर राहिले आहेत भोजन करून तृतीय प्रहरीं निद्रा करून उठल्यावर मोंगलाकडे जातात किंवा काय विचार करितात तो पाहून सेवेसी लिहून पाठवीन हे विज्ञापना

## ३६८

रु. नं ८८ श्री १७८७
फा नं १५
पत्र नं १८

सेवेसी विज्ञापना, राजश्री सेनासाहेबसुभा यांस पुत्र जाहला त्या समई माहूरास श्री देवीच्या दर्शनास मुलास घेऊन जावें असा नवस होता त्याजकरितां माहूरची जागा नबाबाकडे आहे त्याची परवानगी पाहिजे यास्तव या यशवंतराव यांस जाते समई सांगितले होते त्यावरून त्यांणीं नबाबांच्या कानावर घालून किल्लेदारास पत्र पाठऊन दिल्हे देवीच्या दर्शनास यात्रेस त्यास येऊ देणें मुजरत करणें म्हणून व नबाबांनीं येक मध्य माणूस या कामाविसी माहुरास पाठविला आहे त्यावरून देवीचा नवस फेडावया-करितां सौ चिमाबाई राजश्री परसोजी भोसले यांस घेऊन परकड मुना तिथी वगैरे व कन्या गंभी घेऊन निघाली समागमे कारभारी रा भवानी काळोचे पुत्र येशवंतराव पांचशे स्वार व गारदी दिल्हे राजश्री सेनाबहादूर व राजश्री वेंकोजी भोसले यांस दिल्हे. वरकड स्वारीचा सरंजाम हत्ती पालख्या गाड्या डेरे ल्याहिमा मातबरीप्रमाणें दिल्हा आहे छ १२ रोजी निघून नगर बाहेर राहिली आज मार्ग कास गेली आहेत यावयास येक दीड मास लागेल येथें राजश्री मनापुरंधर व राजश्री सेनासाहेबसुभा सानंद व कारभारी सर्व आहेत सेनापुरंधर यांची धाकटी स्त्री सौ कमलजाबाई व कन्या मान्याबाई जाट दाघी आहेत वरकड कुटुंब याजबरोबर घेऊन दिल्हे आहे सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

## ३६९

रु. नं ८८ श्री तारीख १० मे १७८९
फा नं १५
पत्र नं १५

विज्ञापना येसीजे छ २४ रोज बुधवारी प्रातःकाळी या सेनासाहेबसुभा यांणीं स्नान देवपूजा करून स्वारीचे जाणे मुतसद्दीमंडळीसुद्धां माहालीस जाले तेथे स्नान करून थोरले माहाराजांचे समाधीपुढें येक मोहोर ठेऊन पूजा केली गंगेस रुपया ठेऊन व पांच रुपये इनाम खिजमतगारास दिल्हा नंतर तेथील वेदमूर्तीं करून माहागांवी वेदमुर्ती रा सदाशीवभट दिक्षीत यांचे येथे जाणे होऊन स्वल्प प्रकारीं बहुत मागणे जाली तेथून मेजमानी घेऊन केतापुरास चिटणिसांचे येथे जाणे घडून वर्तें घेतली त्याजवर स्वारीचे येणे सत्वर सायंकाळपर्यंत डेरेयास जाले येकादशीची देवपूजा आदी भान जाल्यानंतर जाली फराळ केला यांत नागपुरीहून जासुदाची खबर आली त्यांत वर्तमान होते कीं छ १ रोज वैशाख रविवार तिसरे प्रहरीं चिमाबाई मोहिते इचा काळ जाला ! त्यावरून सेनासाहेबसुभा यांसी अतीशय खेद जाला शोकाचे निवारण केल्याणी खेद शांत न होये मुतसद्याचे न आयकेत तेव्हां रा यशवंत नाना उपाध्ये येऊन बहुत रितीनें समाधान केलें परंतु खेद दूर होईना भान मात्र कायम केले आज आकरावा दिवस आहे येथे भानानें शुध्द जाले प्रसंगी रणसिंग मोहितेही होते रा सामाजी मोहित्याकडे वर्तमान लिहून सातान्यास रवाना केले सारांश सेनासाहेबसुभा फार करून खेदांत आहेत तपसीलवार वृत्त मागाहून सेवेसी लिहिण्यात येईल सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना छ मजकूर मागील प्रहर रात्र राहतां रवाना केलें

टीप—वरील तीन पत्रें मल्हाररावजींचीं

## ३७०

रु. नं ८८ श्री ता १ सप्टेंबर १७८९
फा नं १५
पत्र नं १९

विज्ञापना नागपुरीहून खबर आली कीं छ २८ बिम्बाजी साबाजी भोसले पाटांत च्यार घटका दुःख होऊन मृत्यु पावले पुणीयाहून ही खबर आकस्मात आली त्याज वरून नबाब वगैरे मंडळी हाहून आदेशा करीत जाते की

सिवाय जादा मूल्य पावला नाही । बगालाचा लता आहे आसो परंतु रघोजी भोसले याची बाब तुटली दोलत भूल जाली म्हणावी ऐसा मजकूर बोलत होते. रघोजी भोसले सेना-साहेबसुभा श्रीमंताचा व आपला निरोप घेऊन पुणीयाहून गेलीयानतर आग्राप येत पत आले नाही. बगाजीपत मलायतखान याजकडे पाठविले होते. त्याशी बोलत नाग-पुरास गेले. विठलपत सुभेदार याम आजा केली की नाडे सात लाख टके खानमजकूर याजपासून वसूल करावे. बगाजीपत याजवरून नाग भले की तुम्ही लिहिन तुरुन्त आमिचा नाही मलायतखान याचा म्हणोन मागती खान-बहादूर याजकडे पतमशागनिले जातील या प्रो वर्तमान आहे. पतमार याजवर इतराजीही आहे ऐसे बाजार-आवाई वर्तमान आहे. सेवेसी श्रुत होये हे विज्ञापना तेग-जंग यास छ ११ निजामजी मशारनिल्मुलुक याणी आपले घरी ज्याफत केली त्यांचे समागमे शमशिया व जंग आजम व सरबुलदखान व गुलाम इमामखान व चिरंजीव जंग मजकूर याचे यास जवाहीर दागिने व वस्त्र दिल्ही. मशीरमुल्क याचे पुत्राची कन्या आहे. तेगजंग याचे पुत्रास घ्यावी ऐसी वदता आहे निश्चय होईल तेव्हा लग. सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

## ३७१

रु. नं. ८८ श्री ६ नोवेंबर १७८९
फा. न. १५
पत्र नं. ३२

विनती यैसी जे. हाजरनीनी मधेस्तास सागून पाठविले की मिस्तर कीनवी इग्रज व रावजीची हाजूरात मुलाकात व्हावी याचा दिवस कोणता तो त्यास पुसून करार करावा. मधेस्तानी आम्हास विचारीले आम्ही जाब दिल्हा की आपण जो ठरावितील तो. त्यावरुन छ ११ माहे सफर शनवार करार केला. त्या प्रों आठ घटका दिवस आला ते समई आम्ही तयार होऊन दरबारास गेलो कीनवी (इग्रज) आला च्यार इसमे गोरे त्याजसमागमे होते ते दरबारात नबाबाचे समक्ष त्या चौघाच्या आमच्या आगास आग भेटणे जाले. नतर आम्ही नबाबाचे उजवे बाजूस बसलों. ते डावे बाजूस बसले. त्यास बसावयाची परवानगी आहे. उभे राहात नाही. बसून टोप्या हातीं घेतात डोईस घालीत नाहींत हे आदब मोठी आहे. उपरात दोन घटका हजरीतीनीं आम्हासीच भाषण केले. दरमीयान काही जवाहीर आणून पाहीले. काही बागाची तयारी ते बाग पाहिले नजरा वगैरे नबे लोक आले गेले त्याचे मुलाजमती या प्रकारे दोन घटका जाल्यानतर त्यास पानदान देऊन रुकसत दिल्हे. इग्रेज नजर काये करितात, इतके दिवसात त्याणी तोफातरीक काये गुजरली, याणी त्यास काये दिल्हे हे समजोन लिहिता. हाजूर उभे राहात नाहींत बसतात. परंतु टोप्या काढून बसतात इतके आधीक. नबाबाली येक घडियाल हेदराबादी कारीगिराकडून (त)यार करविले त्यास किलीने चालू करावयाचे प्रयोजन पडत नाहीं. बगैर किलीचेच घडीयाल चालते ते आणून कीनवीस दिल्हे. अशा तऱ्हेचे घड्याल विलायतेतही अद्याप तयार होत नाही म्हणोन नबाब बोलिले त्यास कीनविनेही रुकार दिल्हा दुसरे लहान घड्याल रुपयायेवढे आणिखी येक इग्रजास दिल्हे. रा छ १७ माहे सफर हे विनती.

## ३७२

रु. न ८८ श्री १७९०
फा. न १७
पत्र न. ३७

विज्ञपना येसीजे. राजश्री गोविंदराव बापू व गोविदराव भगवत यासी बोलण्यात आणिले की आपला इशारा गेला त्याप्रमाणे फौज गगथडीस रवाना जाली. येसे असता आपली याप्रमाणे बोलणी होतात. मोठ्यास तो वचनीं सभाळावे लागते. जरी येविशईची पत्रे फौजप्रकर्णी नागपूरास गेल्यास आपले चितात काये समजतील हें आपणच आपले चितात समजावे मोहसन आलीची बहि-वाट दरम्यान आणून आद्यापवर बोलतात येक साला निगा करितो. बाकी सन ११९९ची व मागील हैदराबादेस गेल्यावर येक येका माहालातची रुजुवात होऊन आल्या-नतर चौ महिन्यानीं निगा करू. त्यात स्वारीखर्च व माहालातची तसनस जे जाली आसेल तें कुल मजरा घ्यावी येसे आहे यात जीव कोणता रुदवाती होणेयास बाधली वर्षेच गुजरतील. तेव्हा हे होणेच दुरापास्त आहे. निशेचे प्रकारास दिवस घेणे हे यात मात्र आहे याप्रमाणें सेवकानी बोलण्यात आणिले उतर सादर होईल त्याप्रमाणें वर्तणूक घडेल हे विज्ञापना.

पाठविलें व पावलें लिहिला मजकूर कळो आला व सरकार पत्रावरूनही सविस्तर समजलें श्रीमंत मेजमानसाहेबांस पत्र व मसिनस वाचून दाखविलें त्यास आज्ञा हेच जाली की तुम्ही येथें असतानाच जासूदनापूरचा बाबसाल पहला होता याचे उत्तर सरकारांतून कैसे जालें। तुमची रवानगी हे समजान कामने निकडीनें फली या पत्रापूर्वी सुचनाही तुम्हास लिहीली आहे सरकारांतून तुमचे नावे रावश्री बापुरावजी यांजपासी पत्र लेहून दिलें ते तुम्हास पावलेंच असेल सांप्रत तुम्हाकडून येवढा आज्ञा तो कानडे व दुवेजी कडेस श्रीमंतांनी भरणा दिला येवढा मजलीनें कबूल करावा, गरीब गुरीब असाम्या आहेत त्या साम्या त्याच्या पावल्या साडचिठीच्या माध्यात म्हणजे येथें बोलण्यास चांगलें बरकत साहूकारलोक निरोचे दरमीयान उठऊन आले त्याजपासून उगवा व्हावा दोन्ही आप येविसीचे श्रीमंतांनी लिहून तावडतोब पत्राची रवानगी सांडणी स्वारासमागमे मुजरा केली आहे त्यास सरकारआज्ञेप्रो लिहिण्याचा भाव समजोन करणे सरकारपत्रावरून सव समजेल येथून आमके लिहीलें हें मात्र कोणास समजूं नये गरीब गुरीब रयेत सावून देयाची बरकत साहू मागसे निसेची आहेत त येवढा अमल होये तो वरी आग्रहत असावेत जलदी करावी फार काय ल्याहावे बहुत काय लिहीणें हे विनंती

## ३७७

द. नं ८८ श्री १०९२
फा नं १५
पत्र नं २२

सेवेसी विज्ञापना येसे जे मपीरुलमुल्कबहादूर यांणी रावश्री रामचंद्र दाग भासल्याकडून वकीलीचे कामावर आले आहेत त्यासमवेत गोविंदराव यांजबरोबर यकरंगान येऊन पाल्मऊन, त्यासी सलुक्त करून, त्यांजला गोविंदराव भूप यांजला दरबारात न पाठवितां पतमजकूर यांजला हुजुरचे दरबारांस घेऊन जाऊन, नबाब बेगानअली यांचे समक्ष त्यांजकडून मजकूर बोलविला की, आमच्या पक्षाची पत्रें गुप्ताही लिहीत आहे आणि रावश्री उमयेतां गोविंदराव यांजकडूनही लिहून देवीत आहे त्याजवरून मपीरुलमुल्क बाहादूर यांणी पतमजकूर यांची तारीफ हुजुरांचे रुजू फर्मा की, पतमजकूर बहूत हुशार, दूरंदेश, चाणाक्ष फक्कडगार आहेत बगाजीपत यांजपेक्षां यांची हुशारी आधीक आह्ळान आहे त्याजवरून हजरतींही उत्तर केलें की आतां जो मजकूर नमूद जाला आहे याचा फैसला जाल्या आणि कजिया तुटला म्हणजे यांची दाणाई ध्यानास येईल बाबसाल फडशांत आलीया हुजुरांहून सरफराजीही मजूर आहे त्याजवरून पतमजकूर यांची पत्रें व उभयेतांची पत्रें भोसल्यास जाणार की, आमलदखल करून घ्यावा बाकी निघल त्याची नीशा करून देसात सलाबतखान यांजपासून घ्यावें, येसा मजकूर बातीत आहेत पाहावे मपीरुलमुल्क यांणी येक नवा ठरावीला होता की, मीर पोलादजंग व त्यांजबरोबर आपला योरला पुत्र व मारामल, आपला रिसाला, साहेबीन त्यांस रवाना बरामंत करावे आपल्या पुत्रास वदीस घालावें त्यास नबाबास अर्ज केला त्यास हजरतींही उत्तर केलें की, मीर पोलादअली यांजला मुलास पाठवावे त्यापेक्षां आलीज्याबहादूर यांजला का मुक्रर करू नये आलीज्याबहादूर यांचे नांव घेताच तो मजकूर यांणी साहून दिला आतां पत्रापत्री काये बाबसाल होईल सो पाहावा यांसो येथील बोलण्याचे भाव आहेत मोकतात येक करितात येक चाल आहे हे विज्ञापना

## ३७८

द. नं ८८ श्री १०९२
फा. नं १५
पत्र नं २१

सेवेसी विज्ञापना येसीज सलाबतखान यांचा व भोसल्यांस पगार लाखाचा हिशेब जाला त्यास बमुलाचे व्याज आतां व्याज मुद्दल हुंडणावळ काय मिळून सवीस लाख रुपये कले आहेत त्या पौणे अकरा लाख रुपये वसूल आतला आहे याजवर सलाबतखान यांजला मोहर करून मागत आहेत त्यास खानमजकूर यांणी मोहर करून दिल्ही नाही याजमुळें खानमजकूर यांचे व भोसल्यांचे अंतर्गत यांजला आले आहे हें वर्तमान मपीरुल(मुल्क) बहादूर यांजला कळलें त्याजवरून खानमजकूर याजवर महरबानगीसी दाम्यपितात हुजुरांतही अर्ज केला की, खानमजकूर हजुरच्या हुकमासिवाये भोसल्याचा हिशेब फडशा न केला त्यांणी हिशेब मनमाने त्याप्रमाणें केला आहे आजपर्यंत खानमजकूर भोसल्यास मिळाला आहे

मुंबईचे बातमीस भोसल्यांशी सिलसिला याजमुळे संशय प्राप्त म्हणेन तुम्ही लिहीलें त्यास ये गोष्टीचे संशयाचे कारण कांहीं नाहीं मासदाण्याचे आदोस्तव पावेतर येऊन फौज जमा करणार परंतु मसलत पुढे आणी माग फौज जमा करणे ठीक नाहीं असे समजोन माघारे जावे नागपुरापुढें जाऊन मुकाम करून फौज जमा करुन बंगाल्यास जावें म्हणोन येथून त्यांस लिहिलें आहे रियाकरपत येऊन घाफतपूवक बोलणे जाहलें असतां मुंबईची बातनी बातव आहे

३८९

ह नं १२ श्री १०८०
का नं ८
पत्र नं १२१

(वरील अर्धे पत्र फाटलें आहे)

(व)र्तमान गणांच कलकत्यिाउपर आपण येजमानाकडे जाऊन वादीनें पत्र आपण वाचून मसून वाचून गणावर्ली त्याणी कल्पना घतली हावी ते निवृत करून चांगले लिहीलें आहे नरा मार्ग आहे तो लिहील आहे म्हणून सव फार करुन उभयतांही संतोष पावले त्याची उत्तरें तपसीलें लिहून सेवेसी प्याजयाकरितां सानकोपंताकडे पाठविली आहेत पत्रे मजकूर वास्तविली तपसीलेकरून मनसबे लिहीलें आहेत प्रवीस जाहस्यावर घ्यानास येतील सरासर १ मुजरस्याराया पाठविली सेनाधुरंधर यांस त प्रविष्ट करी पाहून संतोषेकरून पठन ठेविली नवी एक तन्हा आहे आमेकरून स्मरणपूर्वक पाठविली ती आम्हास सवा घर्डा मीघ आहे म्हणून ठेविली तेव्हां बोलले जे ही सरोसर पाश्यची असे घाडे आग्रामनल नाहीं घाडे सरोसर माण्यची असे आणून द्या तेव्हां उत्तर सिल्लें जे सच्यो घोडा माझ्या पाहाण्यांत येय मवात आमी तर्म नाहींत तथापी वेर्यालच्च घोडे असावे असे मानस आसल्यास आपलें माणे तेय पडेल त्या कामी आपण मजवात आर्स घाडें (तेथ) आसल्यास मिळेल आसल्यापेक्षा घाडे आधीक नाहीं (माउ,पर राजश्री सेनासाहेबसुभा तेथ हात त्याणी सरासर आपल्यास पाठी म्हणून मार्गायली त्या उपर राजश्री ग्सराजी मोवलेही बयलच घाडे पुत्र हाते त्याणी सरासर आरसल्यास पाठी म्हणून मागितली सरोसर येक आली, मागमार उभयतां, येर्नास दिसदीपर्नि येराचे चित्त लीन होते म्हणून तसीच ठेविली मजकूर सागितले जे यक सरोसर आणून दिल्ही तुम्ही, आणी आम्हास उभयतांचे समाधान राखणें, तेव्हां कस करावे ' मी उत्तर केलें जे, ही सरोसर आपल्याजच आली आहे आपण ठेवावी आणीखी आपण म्हणतील तसें घडेल म्हणून सांगितलं त्यावरुन मग उत्तर केले नाहीं घोड्याविसी सेनाधुरंधर याणी पर्यात मजकूर लिहील आहे त्यावरुन निवेदन होईल सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

३९०

ह. नं १२ श्री ता १०८१
का नं ८
पत्र नं ४३

सेवेसी विज्ञापना इमामुद्दौला काशीहून निघोन कलकत्यास गेला म्हणून वर्तमान येथें आलें हात व गेला नाहीं काशीतच आहे असेही वर्तमान सावकारी मागसें येत गर्ली त्याचे सांगणे ऐकिलें तैसे सेवेसी लिहित गलों प्रस्तुत वेणीरामाच्या लिहिन्यांत आहे जे इमजाची की बंगाल्याहून आली विस्वा आमानयास पुढें सामोरा च्यार पांच मजली काशीहून गेला होता जाऊन भिवीस घेऊन आला त वर्तमान इकडे गेला तेव्हां गेल्याचे आले फिरोन आला तेव्हां काशीतच आहे म्हणून आले पत्र बातनीचें यार्ये सर तथ्य कळवे आतां पर्शी हें सांधत लिहीलें आहे यावरून जाण्यायेण्याचें समजलें सं सेवेसी श्रुत होय हे विज्ञापना

३९१

ह. नं १२ श्री डिसेंबर १७७४
का नं ८
पत्र नं ४

सेवेसी विज्ञापना कलकत्याहून राजाराम मुकुंद यांची पत्रे सवा महिन्याची आली त्यांत मजकूर त्याणें याणी येथून कलकत्याकडील वर्तमान लिहून पाठवण म्हणून लिा हाते त्यावरुन लिहिला आहे कलकत्यास विलायतेहून तीन इंग्रज साहेब आले आहेत गेन इंग्रज जहाजावरून उतरून कलकत्यांत किल्यांत गेले आहेत वे तथच आहेत येक जहाजावरून उतरत नाहीं वा जहाजावरच आहे

त्याजवळ लखोटा आहे. त्याजवर इमादुदौला याणीच लखोटा फोडून पत्र वाचावें असे लिहीले आहे याजकरिता तो लखोटा कलकत्याचा कारभारी मागत नाहीं. व आले आहेत ते कारभारी याजवळ देत नाहींत. तिवे इग्रज आले आहेत ते उगेच आहेत. कारभारी कारभार करीत आहे. तिघेजण कारभारी यासी काही म्हणत नाहींत याप्रो वर्तमान लिहीले आहे वरकड मजकुर आपण लौकरच निधून हिरदेराम व जानक यासी घेऊन येतो. या प्राती जमीदारानी कासीकडील जमीदाराचे वर्तमान आईकून दगा केला आहे याजकरिता किलेजात आहे त्याचा बंदो-बस्त करून येतो म्हणून वर्तमान आहे. शेवेसी श्रुत होय हे विज्ञापना.

**टीप**—वरील चार पत्र मल्हारजींची.

काहीं न होऊन माझे निरंणच घडेल तर ज्यास दिला दम धरून आणीक महीना गवर्नार यां दोनचार वर्षे दाब पन्नीस हजार रुपये नजरेत येतील देईन. निदा नाहीं, येसे हे काम आहे. वरती गजश्रींचे देणे नाहीं इतके उद्योग आणि माहाग. मी धरली तुम्ही सांभाळावे. बहुत काय लिहिणे कृपा लोभ कीजे हे विनंती. आस्ता कारणे धोत्रजोडा बुटदार आहे पावल्याचे उत्तर यावे.

राजश्री रावजी व भाऊ यास कृतानेक नमस्कार विनंती. उपरी राजश्री आपास लिहिले आहे त्याजवरून [illegible] वाजीबा सागता करील हे विनंती.

लग्न जाहाल्यावर जेष्ठ मासी जरूर यावे म्हणून आमत्रण लाऊन ठेवावे. वराडचा पेच निवारण जाहाल्याविना येणे सला चागली नाहीं हें सागून याचे येणे या समईचे उपकार ठेवण्याचे आहे हे मना करावे, याचे उपकार यासमईचे आपल्याकडे घेऊ नयेत. यासमई आपण न यावे म्हटले असताही नवाबाच्या भेटी होतील याजकरिता हे येतच आहेत. आपण न यावे म्हटलें असता हे आल्यास आपल्याकडे याच्या येण्याचा उपकार नाही. नवाबाच्या व स्वामींच्या भेटी होतील तेव्हा याची गरज काही दिसत नाहीं, याचे व नबाबाचे आतून चागले आहे. नवाबाच्या भेटीसमई हे जवल असल्यास आपल्यास कितीक घरकृत्याच्या अडचणी येतील. हे जवल नसल्यास काही सकोच पडणार नाही. आपण याजखेरीज नवाबाची भेट घेऊन सलामसलत ठरावणे ती ठराऊन घ्यावी हे चागले आहे. याचा उपयोग नवाबाच्या (व आपल्या भेटी) होतील तेव्हा काहीं दिसत नाही. भोसल्यास जरब ठेवावयास जागा पुढे राहील असे आहे याजकरिता हली धुरधरानी सध्या तेथे येऊन काम सरकारचे काही दिसत नाही यास्तव विनती लिहिली आहे. जर करिता धुरधर याचें येणें यासमई उपयोगी पडतें असे असल्यास येतच आहेत परतु उपकार मोठे दाखवितील मिथ्या रूप, खरेपणा काहींच नाही असे आहे. याजकरिता मर्जीस विनती आल्यास सनदा द्यावयाची आज्ञा व्हावी. सनदा देऊन बलवतराव निरोप मागतील तर निरोप द्यावा. निरोपसमई जेष्ठमासी धुरधर यास घेऊन येणे म्हणून सागून ठेवावे व धुरधर यास पत्रही मर्जीस आल्यास लिहून सेवकाकडे पाठवावे जे, वराडातील बखेडा आहे तो खातरजमेने विल्हेस लावावा इतक्यात रिकामे दिवस सापडल्यास लग्नकार्य उरकून घेऊन जेष्ठ मासीं यावयाचे करावें म्हणून पाठवावे. काणे जिवाजीपत याच्या कामाचे बलवतराव याजसमागमे नागपुरास बिदा न करावें, आपल्याजवल ठेऊन घ्यावे पुढे धुरधर आल्यावर मर्जीप्रमाणे जिवाजी पताचा बदोबस्त करून घ्यावा जेष्ठमासी आल्यावर जसी मसलत याच्या डोईवर ठेवणे तसी ठेवावी. जेष्ठमासीं याचे येणें तेथे घडल्यास याजवर जरब पुर्ती राहील. हली मोगलाच्या भेटीकरिता आपण असावे या भावेकरून जाऊन आपला उपकार दाब ठेवणार जे, आम्ही स्वराज्याचा व मोंगलाचा तह होतो त्यावेलेस आपले काम सोडून स्वराज्याकरिता येऊन पोहचावे हा दाब ठेवणार, इतका उपकार याचा घ्यावयायोग्य मसलतही सध्या प्राप्त जाहाली नाही. याजकरिता याचा उपकार न घेऊन आपला उपर याजवर ठेवणे तर जेष्ठ मासी बलाऊन घ्यावे, चारपाच महिने ठेऊन घ्यावे धुरधर यास पत्र पाठविल्याने आपला दस्तायैवज गुततो म्हणून ध्यानात येईल तर पत्र न पाठवावे, बलवतराव याजवल बोलावे ते लिहितील व सरसरीत पत्र लिहावें जे बलवतराव याजवल बोलण्यात आले आहे हे लिहितील त्याजवरून कलेल याप्रो यावे या पत्राची उत्तरे लौकर आलियास कार्यावर पडतील यशवतराव भवानी हैदराबादेस होते ते निरोप घेऊन आले. नवाबानी गुदस्ता बलवतराव भवानीपत मुनसीजवळ **व्यकोजी भोसले यांच्या नांवाचा तैनातजाबता करून दिल्हा परतु जागीर दिल्ही नव्हती. यदा यशवतरांव याजबा जागीर द्यावयाचा करारनामा पाठऊन दिल्हा** आहे तो घेऊन मारनिले आले. **जागीर भद्राचल पालोच म्हणून संस्थान बस्तरच्या सरदेस आहे** तेथें पहिला सस्थानीक पालेगार येलम्या राहात होता नवाबाचा अमल नव्हता. ती जागा जाबितजग याणे मोठ्या हिकमतीने सोडविली त्यापासून जाबितजगाकडेच होती. जाबितजग वारल्यावर येतेशामजग यास निरमलेंतून काढला तेव्हा सारी जागीर नवाबानी घेतली त्याजबा ती जागा नवाबाकडे आली वसुली तीन लक्षपर्यंत आहे पला दूर बहूत आहे ती जागीर नेमली आहे. नवाबाच्या घराचा सिरस्ता कबूलकतबा घ्यावा तेव्हा जागीर द्यावी असा आहे त्यास कबुलात लिहून पाठवावी म्हणजे जागीरीच्या (पुरवणी) श्री सनदा करून पाठवून देऊ म्हणून नवाबाचा निरोप घेऊन आले आहेत. आठ दिवस जाहाले, हा कालवर कबुलात लिहून दिल्ही नाहीं याच्या चितात साबाजी भोसले यास जागीर वराडात दारवे वगैरे माहाल होते ते नवाबानी द्यावे म्हणजे कबुलात लिहून देऊन सनदा आणवाव्या म्हणून मागती पत्रे बगाजीपताकडे पाठविली आहेत उत्तरे आल्यावर कलेल तसे लिहून पाठवीन. हशमतजग याची व विठल बलाल वराडचे सुभेदार याची भेट जाहाली सुदामतप्रो दोहीकडील अमल चालता करावा याप्रो ठराव होऊन मामलनीचे काम चालीस लागले आहे. अलजपुरकराकडील ही मामलनींत बखेडा नाही सुदामत चालीस लागले आहे सिबदी मात्र नेमणुकीपेक्षा जाजती ठेविली आहे टुमाजी कोली याचा भाऊ व लेक चाकरीस ठेविला आहे. कोलीमजकूर गावेल वगैरे याचे किले आहेत त्यास माहित आहे, याजमुलें यास सगय पडला आहे वरकड आलजपुरकराचा गुंता किमपी नाहीं, मिथ्यारूप अडबर करून हे लिहितात,

